# श्रीनारद भक्तिसूत्रे

( विवरण )



लेखक-म.वि.केळकर

# श्रीनारद रचित भक्तिसूत्रे

(विवरण)

लेखक : म. वि. केळकर



त्रिदल प्रकाशन गिरगांव, मुंबई ४०० ००४

**श्रीनारद रचित भक्तिसूत्रे**

**प्रथमावृत्ती :** श्रीदत्तात्रेय जयंती, शके १९२४, १९ डिसेंबर २००२



**प्रकाशक :**
श्रीमती स्नेहल टिळक
त्रिदल प्रकाशन
राणी बिल्डिंग,
प्रार्थना समाजजवळ,
गिरगाव, मुंबई - ४०० ००४
दूरध्वनी : २३८५०१९२.

**मुद्रक :**
श्री. विश्वास गोखले
श्रीपाद प्रेस,
नवी अमृतवाडी,
मुंबई - ४०० ००४.

**अक्षरजुळणी :**
अक्षय फोटोटाइपसेटर्स
१, चित्रकूट सोसायटी,
डॉ. आंबेडकर मार्ग,
ठाणे (प) - ४०० ६०१

**मुखपृष्ठ :**
श्री. राजाभाऊ मराठे

किंमत
१२० रुपये

ज्यांनी आपल्या शुद्ध आचरणाने सन्मार्गावर राहण्याची
सदैव प्रेरणा दिली त्या प्रेमळ मातापित्यांच्या
ती. भागीरथीबाई व ती. विनायकराव केळकर
यांच्या
आणि
ज्यांच्या मार्गदर्शनामुळे अध्यात्माकडे वळलो
ते थोर साधक ती. मा. कृ. (भाऊसाहेब) परांजपे
यांच्या
पुण्यस्मृतीस कृतज्ञतापूर्वक अर्पण.



# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

न गुरोरधिकं तत्त्वं न गुरोरधिकं तपः।
तत्त्वज्ञानात्परं नास्ति तस्मै श्रीगुरवे नमः॥

जयाचा जनीं जन्म नामार्थ झाला। जयानें सदा वास नामांत केला।
जयाच्या मुखीं सर्वदा नामकीर्ती। नमस्कार त्या ब्रह्मचैतन्य मूर्ती॥

श्रीनारद भक्तिसूत्रांवरील श्रद्धेय हनुमानप्रसाद पोद्दार यांचे 'प्रेम-दर्शन' हे पुस्तक मी १९८७ साली वाचले. नारदांची सूत्रे व त्यांचे त्यांनी केलेले विवरण मला अतिशय आवडले. त्याच्या आधीच्या वर्षी म्हणजे १९८६ मध्ये आश्विन-कार्तिकातील काकड आरतीच्या वेळी मालाडला पू. बाबांनी (प्रा. के. वि. बेलसरे) नारद भक्तिसूत्रांपैकी काही सूत्रांवर प्रवचने केली होती, पण ती ऐकण्यास मी गेलो नव्हतो. त्या पूर्वीही एकदा त्यांची या सूत्रांवर प्रवचने झाली होती. त्या वेळच्या प्रवचनांच्या फक्त १९७८ सालच्या कॅसेट्स मला मिळाल्या. १९८६ पासून १९९० पर्यंत प्रत्येक वर्षी पू. बाबांनी या सूत्रांवर काकड आरतीच्या वेळी प्रवचने केली पण त्यांपैकी फार थोडी प्रवचने ऐकण्याचा लाभ मी घेऊ शकलो. त्या वेळी एका प्रवचनात पू. बाबा म्हणाले होते की ही सूत्रे श्रीमहाराजांना (सद्गुरु श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज) अतिशय आवडत असत. ते ऐकून मला आनंद झाला; कारण वर म्हटल्याप्रमाणे १९८७ मध्ये मी ती प्रथम वाचली तेव्हा मला ती आवडली होती. त्यामुळे जे श्रीमहाराजांना आवडते तेच आपल्याला आवडते असे वाटले. त्यानंतर संधी मिळेल तेव्हा नारद भक्तिसूत्रांवरील पुस्तके मिळवून मी त्यांचा अभ्यास सुरु केला. त्याचबरोबर मनात असा विचार आला की पू. बाबांनी या विषयावर केलेली प्रवचने काही श्रोत्यांनी ध्वनिमुद्रित केलेली आहेत ती ऐकावयास मिळाली तर माझ्या समजण्यात मोलाची भर पडेल.

मालाडचे श्री. बाबूराव पंचविशे (मास्तर) पू. बाबांची सर्व प्रवचने कॅसेटस् ऐकून त्यावरुन लिहून ठेवत होते. पू. बाबांची ज्ञानेश्वरीवरील प्रवचने पू. बाबांच्या परवानगीने ते मला वाचावयास देत असत, म्हणून मी त्यांना नारद भक्तिसूत्रांवरील प्रवचने द्यावयाची विनंती केली. कोणताही अनमान न करता त्यांनी त्यावेळी १९८९ व १९९० सालची प्रवचने वाचावयास दिली. डॉ. आर्. व्ही. देशपांडे यांनी त्यांच्याकडे असलेल्या या विषयावरील प्रवचनांच्या काही कॅसेटस्च्या कॉपीज तयार करुन दिल्या. पुढे माझे लेखन सुरु झाल्यावर डॉ. जी. एस्. दसरदार

आणि त्यांचे चिरंजीव डॉ. बी. जी (उदय) दप्तरदार यांनीही त्यांच्याकडे असलेल्या सर्व कॅसेटस् मला दिल्या. मदतीचा हात पुढे करणाऱ्या या सर्वांचा मी आभारी आहे. प्रवचनांच्या सर्व कॅसेटस् ऐकून त्यांची टिपणे केल्यानंतर एक गोष्ट प्रकर्षाने लक्षात आली की पू. बाबांची सूत्रांच्या विवरणाची पद्धत इतर पुस्तकांतील विवरणापेक्षा वेगळी आहे. विषय स्पष्ट होऊन श्रोत्यांचे साधन वाढावे अशा दृष्टिकोनातून, विशेषतः श्रीमहाराजांचे जीवन आणि शिकवण दृष्टीसमोर ठेवून त्यांनी ही सूत्रे समजावून दिलेली आहेत. केवळ भक्तितत्त्व न सांगता ते व्यवहारात कसे आणावे यावर त्यांनी भर दिला आहे.

पू. बाबांशी दर शुक्रवारी संध्याकाळी काही साधकांच्या झालेल्या चर्चा आठवतील तशा मी लिहून ठेवल्या होत्या. त्या चर्चांचे संपादन करून मी लिहिलेले अध्यात्म संवाद भाग १ ते ४ डिसेंबर १९९८ ते डिसेंबर २००० या काळात प्रसिद्ध झाले. या सर्व भागांना वाचकांकडून माझ्या अपेक्षेपेक्षा चांगला प्रतिसाद मिळाला. त्यामुळे पू. बाबांच्या प्रवचनांचा मुख्य आधार घेऊन श्रीनारद भक्तिसूत्रांवर लिहावे असा विचार मनात आला म्हणून माझ्या स्नेह्यांशी मी याबाबत चर्चा केली. त्यांनी मला प्रोत्साहन दिले म्हणून या विषयावर लिहिण्याचा निश्चय झाला. लेखनास सुरुवात करताना पू. बाबांच्या प्रवचनांना प्राधान्य देऊन शिवाय या विषयावरील इतर ग्रंथांचा उपयोग करावयाचे ठरविले आणि शके १९२३ च्या चैत्र शुद्ध प्रतिपदेस लेखनास सुरुवात केली. मी या विषयावर लिहीत आहे हे समजल्यावर माझ्या काही मित्रांनी व माझे मोठे बंधू श्री. चिंतामणि (बापू) यांनी या विषयाशी संबंधित पुस्तके मला उपलब्ध करून दिली. त्यांचा मी आभारी आहे. लेखन जसजसे होत होते तसतसे मी ते पूर्वी अध्यात्म संवादात सहभागी असलेल्या श्री. कवीश्वर, श्री. वसंतराव खरे, डॉ. जी. एस्. दप्तरदार, डॉ. रवीन्द्र ठोसर, डॉ. एस्. ए (बाळासाहेब) खापर्डे व श्री. माधवराव निक्ते या माझ्या मित्रांना वाचून दाखवीत होतो. वाचनाच्या बैठकाही या मित्रांच्या घरीच होत असत. त्याचप्रमाणे गोंदवल्यासही श्री. नागराज, श्री. रत्नाभ व नारायण जोशी व कु. विदुला गद्रे या साधकांना काही लेखन दाखविले होते. ती. आई व प्रा. श्रीपादराव बेलसरे यांनीही सर्व हस्तलिखित वाचले. या सर्वांनी केलेल्या बहुमोल सूचनांचा मला उपयोग झाला. त्यांच्यापैकी डॉ. जी. एस् दप्तरदार आज आमच्यामध्ये नाहीत याचा खेद होतो. या सर्वांनी दिलेल्या प्रोत्साहनामुळे व मदतीमुळेच लेखन पूर्ण होऊ शकले. या सर्वांचा मी ऋणी आहे.

श्रीनारद भक्तिसूत्रांचे हे विवरण मुख्यतः पू. बाबांच्या प्रवचनांवर आधारलेले असल्यामुळे साहजिकच त्यात सद्‌गुरु श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांच्या चरित्राला, बोधवचनांना व शिकवणुकीला प्राधान्य आहे. विवरणात जेथे जेथे महाराज अथवा श्रीमहाराज असा उल्लेख आहे तेथे तेथे तो सद्‌गुरु श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराजांचा आहे हे वाचकांनी कृपया लक्षात ठेवावे. लेखनासाठी उपयोगी पडलेल्या कॅसेट्स व ग्रंथांची यादी शेवटी दिली आहे. या सर्वांचे ऋण मी मान्य करतो. नारदानी या भक्तिसूत्रांमध्ये भक्तीच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकला आहे. सूत्रांचा पदच्छेद व अर्थ देताना व्याकरणाच्या रूपांनुसार शब्दशः अर्थ केला तर तो बोजड होईल म्हणून व्याकरणाला चिकटून न रहाता थोडे स्वातंत्र्य घेऊन अर्थ सोपा करण्याचा प्रयत्न केला आहे. शिवाय माझे संस्कृत व्याकरणाचे ज्ञान तोकडे असल्यामुळे अर्थ देताना चुका झालेल्या असण्याची शक्यता आहे. वाचकांनी अशा चुका नजरेस आणून द्याव्या आणि आपला अभिप्राय कळवावा अशी विनंती आहे. प्रत्येक सूत्राचे विवरण इतर सूत्रांचा संदर्भ न पहाता स्वतंत्रपणे स्पष्ट व्हावे असा प्रयत्न केल्यामुळे काही ठिकाणी पुनरुक्ति झाली आहे. या पुस्तकात दुसऱ्यांचे अनुभव सांगितलेले असून स्वतः लेखक त्याबाबतीत अनभिज्ञ आहे. जे ऐकले व वाचले ते सार रूपाने सांगण्याचा हा प्रयत्न आहे. त्यामुळे यात जे काही चांगले आहे ते संतांचे व चुका माझ्या असा हा एकंदर प्रकार आहे.

पू. बाबांचा व ती. आईंचा मी ऋणी आहे आणि ते ऋण राहू देण्यातच माझे हित आहे. त्याचप्रमाणे प्रा. श्रीपादराव बेलसरे यांचाही मी आभारी आहे. मित्रवर्य श्री. राजाभाऊ मराठे, श्री. विश्वास गोखले आणि अक्षय फोटोटाइपसेटर्सचे फडके बंधू यांनी पुस्तक चांगले व्हावे म्हणून सजावट, मांडणी, मुखपृष्ठ, छपाई इत्यादी कामे आपलेपणाने उत्तम रीतीने केली याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. त्रिदल प्रकाशनच्या श्रीमती स्नेहल टिळक आणि त्यांचे सहकारी यांनी 'अध्यात्म संवाद' प्रमाणे हे पुस्तकही सुबक स्वरूपात आणि माफक किंमतीत उपलब्ध करून दिले म्हणून मी कृतज्ञता व्यक्त करतो.

*- म. वि. केळकर*

बी-३८, कमलपुष्प सोसायटी,
बांद्रा रेक्लमेशन (पश्चिम)
मुंबई - ४०० ०५०.
दूरध्वनी : २ ६४२९६६०.
दिनांक २१ नोव्हेंबर २००२.
Email : kelkar.mavi@gmail.com

# श्रीनारद भक्तिसूत्रे

## विषय प्रवेश :

आपण ज्या समाजात राहातो त्या समाजाला आर्थिक आणि सामाजिक पार्श्वभूमीबरोबरच एक सांस्कृतिक पार्श्वभूमी असते. ह्या सांस्कृतिक पार्श्वभूमीला आपण किती महत्त्व देतो यावर आपली जीवनमूल्ये ठरतात. आज वैज्ञानिक प्रगतीमुळे जीवनात अनेक सुखसोयी निर्माण झाल्या आहेत. ज्या गोष्टी पूर्वी राजेरजवाड्यांना आणि अन्य धनाढ्यांना उपभोगासाठी उपलब्ध असत त्या आता सामान्य माणसांनाही मिळू शकतात. नवनवीन वस्तूंची निर्मिती करून देहाला अधिकाधिक सुख देण्यासाठी देशात व परदेशात उत्पादन करणाऱ्यांची चढाओढ चालू आहे. टी.व्ही., ऑडिओ सिस्टिम्स, फ्रीज, एअर कंडिशनर, दागदागिने, कपडेलत्ते यांची खरेदी गरजेपेक्षाही शेजाऱ्यांकडे जे आहे ते माझ्याकडेही असले पाहिजे या विचाराने लोक करत आहेत. पाश्चात्यांचा भोगवाद आपण स्वीकारत आहोत. या भोगवादाची परिणती चंगळवादात झाली आहे. उत्पादक नवनव्या वस्तूंची प्रलोभने निर्माण करीत आहेत. या वस्तू जवळ असणारेही दु:खी आहेत कारण त्यांच्याजवळ बरेच काही असले तरी अजून बरेच काही नाही असे त्यांना वाटते आहे. हव्यास वाढतो आहे, तुलना वाढते आहे. ज्यांना चैनीच्या वस्तू खरेदी करणे परवडत नाही ते दु:खी आहेत आणि त्या खरेदी करता याव्या म्हणून वाममार्गाने द्रव्य मिळवण्याकडे त्यांची प्रवृत्ती होत आहे. जुनी सचोटीची जीवनमूल्ये मोडीत निघत आहेत. देहाचे सुख हेच सर्वस्व वाटू लागले आहे. अशा परिस्थितीत आपण आज ज्या जीवनमूल्यांचा स्वीकार करतो आहोत त्यांमुळे आपल्याला खरोखरच समाधान मिळणे शक्य आहे का याचा विचार करणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे नवी जीवनमूल्ये शाश्वत सुख देऊ शकत नसली, देहाचे सुख माणसाला जास्त असमाधानी करत असले तर शाश्वत सुख कसे मिळू शकेल याचाही विचार करावा लागेल.

देहाला लाभणाऱ्या नश्वर सुखाला भारतीय संस्कृती महत्त्व देत नाही. भौतिक सुख हे सर्वस्व नव्हे; तेच सर्वस्व वाटले असते तर माणूस आणि इतर प्राणी याच फरक राहिला नसता. माणूस हा विवेकशील प्राणी आहे. सार आणि असार किंवा नित्य व अनित्य यांचा विचार करून जे नित्य आहे त्याची प्राप्ती

करून घेण्याचा प्रयत्न तो करतो. त्याच्या या प्रयत्नातूनच निरनिराळी तत्त्वज्ञाने व धर्म उदय पावले. वेदउपनिषदांच्या कालापासून भारतीय ऋषींनी शाश्वत सुखाचा मार्ग दाखविला आहे. वेगवेगळ्या ऋषींना जी दर्शने झाली त्यानुसार कोणी ज्ञानयोग सांगितला, कोणी कर्मयोग सांगितला तर कोणी प्रेमयोग किंवा भक्तिमार्ग सांगितला. मार्ग भिन्न दिसले तरी सर्वांचे प्राप्तव्य एकच आहे. शिवमहिम्नस्तोत्रात म्हटले आहे

त्रयी साङ्ख्यं योगः पशुपतिमतं वैष्णवमिति
प्रभिन्ने प्रस्थाने परमिदमदः पथ्यमिति च।
रुचीनां वैचित्र्यादृजुकुटिलनानापथजुषां
नृणामेको गम्यस्त्वमसि पयसामर्णव इव॥

(सर्व वेदविद्या, सांख्यशास्त्र, योगशास्त्र, शैवागम, वैष्णवशास्त्र, अशा वेगवेगळ्या शास्त्रांमध्ये हेच श्रेष्ठ, हेच हितकर अशा समजुतीने रुचिवैचित्र्यामुळे नानाप्रकारच्या मार्गांनी उपासना करणाऱ्या सर्व मानवांना आपल्या उपासनांच्या योगाने साक्षात वा परंपरेने, जसा आकाशातून भूमीवर पडलेल्या पाण्यांना सरळ वा वक्र मार्गांनी सागर हाच एक प्राप्तव्य असतो, तसा तूच एक परमेश्वर मिळवावयाचा आहेस.)

ज्ञानमार्गाचे आचरण करावयास सशक्त बुद्धीची गरज असते. त्यामुळे सर्वसामान्य माणसाला त्या मार्गाने जाणे शक्य नसते. योगमार्गही खडतर आहे. म्हणून सर्वसामान्य माणसांना भक्तिमार्गावर पाऊल ठेवणे सोपे वाटते. माणूस हुशार असो वा अडाणी, तो कोणावर तरी कशावर तरी प्रेम करत असतो. त्याचे स्वतःवर, स्वतःच्या देहावर प्रेम असते. ही प्रेमभावना परमेश्वराकडे वळली की भक्तीचा उदय होतो. आईचे तिच्या मुलावरचे प्रेम जसे सहज असते तशी भक्तीही सहज होते. पण त्यासाठी भक्ताच्या जीवनपद्धतीचा स्वीकार करावा लागतो. भक्ती ही कला आहे तसे ते शास्त्रही आहे. भक्ती म्हणजे काय, ती कशी करावी, ती करताना काय टाळावे, कशाचा स्वीकार करावा हे अनेक साधुसंतांनी सांगितले आहे. भागवत महापुराणात भक्तीच सांगितलेली आहे. व्यास महर्षींनी वेदांचे भाग केले, ब्रह्मसूत्रे रचली, महाभारताची रचना केली; पण इतके करूनही त्यांच्या मनाला शांती लाभली नाही. महाभारतासारखी शोकांतिका सांगितल्यानंतर कोणाही सहृदय माणसाचे मन अस्वस्थ होणे साहजिक आहे. व्यास सरस्वती नदीच्या तीरावर असे विमनस्क अवस्थेत बसलेले असताना तेथे नारदमुनी आले. व्यासांनी त्यांना आपल्या

असमाधानाचे कारण विचारले तेव्हां नारद म्हणाले की हे महामुने, आपण मानवचरित्र सांगितले त्याने, शांतीचा लाभ कसा होणार? त्यासाठी आपण भगवंताचे गुणगान करा. म्हणून मग व्यासांनी भागवताची रचना केली आणि त्यांना शाश्वत समाधानाचा लाभ झाला. भक्तीसंबंधी भागवतात सविस्तर वर्णन आहे. तथापि ज्या नारदांनी व्यासांना उपदेश केला त्यांनीच केवळ ८४ सूत्रांमध्ये भक्तिशास्त्र सांगितले असून ही सूत्रे श्रीनारद भक्तिसूत्रे या नांवाने प्रसिद्ध आहेत. या सूत्रांचे विवरण करण्यापूर्वी नारदांविषयी थोडी माहिती असणे आवश्यक आहे.

**नारद** : रामायण, महाभारत आणि पुराण ग्रंथांमध्ये नारद हे एक अद्वितीय पात्र आढळते. पीतांबर परिधान करून, गळ्यातील वीणेमधून सुस्वर वाजवत प्रसन्न मुद्रेने आणि भक्तीने नारायणाच्या नामात धुंद होऊन ते तीन्ही लोकात संचार करतात. ते त्रिकालज्ञानी आहेत तसेच आत्मज्ञानीही आहेत. देव, दानव व मानव यांना त्यांच्याबद्दल आदर आहे. दुःखी कष्टी जीवांबद्दल त्यांच्या हृदयात अनुकम्पा आहे. सर्वांना भक्तिमार्गावर आणण्यास ते तत्पर आहेत. मात्र यासाठी त्यांनी अवलंबिलेले मार्गही मोठे अनोखे आहेत. देवांचा अहंकार नाहीसा करण्यासाठी ते त्यांच्यामध्ये भांडणे लावतात. देवींचा मत्सर पाहून ते त्यांच्यामध्ये कलागती लावतात म्हणून कळीचा नारद असा त्यांचा उल्लेख आढळतो. वाटमारी करणाऱ्या वाल्या कोळ्याला ते उपदेश करतात. ध्रुव आणि प्रल्हाद यांचे गुरु होतात. कलागती लावतांना त्यांचा हेतु अहंकार, मत्सर, लोभ इत्यादी विकारांपासून सर्वांनी मुक्त व्हावे, दुःखी जनांना आनंद मिळावा हाच असतो. अशा ह्या नारदांचे श्रीमद्भागवताच्या पहिल्या स्कन्धाच्या पाचव्या व सहाव्या अध्यायात पूर्वचरित्र दिलेले आहे.

नारद सांगतातः पूर्वकल्पामध्ये माझा एका दासीच्या पोटी जन्म झाला. माझी आई एका वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मणाच्या घरी काम करत असे. हा ब्राह्मण राहात होता तेथे एकदा चातुर्मासात राहाण्यासाठी काही योगी महात्मे आले. माझ्या आईने मला त्यांची सेवा करण्यास सांगितले. त्यावेळी मी केवळ पाच वर्षांचा होतो. पण तेव्हांही मी मनाने चंचल नव्हतो. बालसुलभ खेळांमध्ये न रमता, ते महात्मे मला सांगत ती सर्व कामे मी करीत असे. शांतपणे त्यांची चाललेली भगवत्चर्चा लक्ष देऊन ऐकत असे. त्यांची जेवणे झाली की त्यांच्या पानात राहिलेले अन्न त्यांची अनुज्ञा घेऊन खात असे. यामुळे माझे पाप नष्ट झाले. श्रीकृष्णाच्या कथेची मला लागलेली गोडी पाहून त्या महात्म्यांनी माझ्यावर

अनुग्रह केला. त्यामुळे माझी भक्ती दृढ झाली. भगवंताचे निर्मल यशगान संपूर्ण चातुर्मास श्रवण केल्यामुळे माझ्या हृदयातील रजोगुणाचा व तमोगुणाचा नाश करणाऱ्या सात्त्विक भक्तीचा उदय झाला. माझ्या भक्तीमुळे प्रभावित होऊन त्या महात्म्यांनी चातुर्मास संपल्यावर तेथून निघण्यापूर्वी साक्षात् भगवंतानी सांगितलेले गुह्यतम ज्ञान मला दिले व त्यामुळे भगवंताच्या मायेचा प्रभाव मला माहीत झाला. संसाराचे बंधन वाटू लागले. तथापि मी आईचा एकुलता मुलगा असल्यामुळे आणि तिचे माझ्यावर अतिशय प्रेम असल्यामुळे तिला सोडून कोठेही जाऊ शकत नव्हतो. अशा परिस्थितीत एका रात्री गाईची धार काढण्यासाठी माझी आई घराबाहेर गेली असतांना तिला साप चावला आणि तिचे निधन झाले. मी पोरका झालो. तथापि भगवंत प्राणिमात्रांचे कल्याण करतो अशी माझी दृढ धारणा झाली असल्यामुळे हा भगवंताचा अनुग्रह आहे असे मानून मी घर सोडले आणि उत्तर दिशेने निघालो.

अनेक नगरे, नद्या आणि पर्वत ओलांडून मी एका निबिड अरण्यातील नदीच्या तीरावरच्या पिंपळाच्या झाडाखाली बसलो आणि त्या महात्म्यांनी सांगितले होते त्याप्रमाणे हृदयस्थ परमात्म्याचे ध्यान करू लागलो. भगवत् प्राप्तीच्या उत्कट इच्छेमुळे नेत्रातून अश्रू वाहात असतांना हळूहळू हृदयामध्ये भगवंत प्रकट झाले. आनंदसमुद्रात पोहत असतांना मी देहभान विसरलो. एकाएकी ते मनोहर रूप अंतर्धान पावले. पुन्हा ते दर्शन व्हावे म्हणून मी खूप प्रयत्न केला तेव्हां आकाशवाणी झाली की केवळ तुझी भक्ती दृढ व्हावी म्हणून मी तुला दर्शन दिले; आता ह्या जन्मात तुला माझे दर्शन होणार नाही. भगवंताचे सांगणे शिरोधार्य मानून मग मी ईर्ष्या अहंकार इत्यादींचा त्याग करून भगवंताचे गुणवर्णन करीत देहपात होईपर्यंतचा काल व्यतीत केला. जेव्हां कल्पांत झाला तेव्हां ब्रह्मदेवांच्या श्वासातून मी त्यांच्या हृदयात प्रवेश केला. सहस्र युगे गेली. ब्रह्मदेवांनी जेव्हां पुन्हा जगाची निर्मिती केली तेव्हां त्यांच्या श्वासातून मी पुन्हा जन्मलो म्हणून मी ब्रह्मदेवांच्या मानसपुत्रांपैकी एक आहे. आता भगवंताची माझ्यावर असीम कृपा आहे. त्यांचे मंगल गुणगान करू लागलो की ते आता मला दर्शन देतात. भागवत सांगते "अहो देवर्षिर्धन्योऽयं यत्किर्तिं शार्ङ्गधन्वनः। गायन् माद्यन्निदं तंत्र्यां रमयत्यातुरं जगत्॥ देवर्षि नारद खरोखर धन्य होत. कारण आपल्या मधुर वीणेचा झंकार करीत श्रीहरीच्या यशकीर्तीचे गान करतांना ते स्वतः धुंद होतात आणि त्याचबरोबर दुःखी लोकांना आनंद देतात.

**सूत्ररचना व भक्तिसूत्रे :** भक्तीचे शास्त्र जाणून घेऊन भक्तीचे सुलभपणे कसे आचरण करता येते हे शिकविण्यासाठी नारदांनी भक्तिसूत्रांची रचना केली आहे. कोणत्याही ज्ञानशाखेचा विस्तार झाला की ते ज्ञान लक्षात ठेवण्यास सोपे व्हावे म्हणून त्याची सूत्रबद्ध रचना केली जाते. उदाहरणार्थ रसायन शास्त्रात अशी सूत्रबद्ध मांडणी केलेली आढळते. प्राचीन कालात वेदवाङ्मयाची आणि उपनिषदादींची मांडणी केली गेली. गृह्यसूत्रे, धर्मसूत्रे, पतंजलींची योगसूत्रे, पाणिनींची संस्कृत भाषेच्या व्याकरणाची अष्टाध्यायी इत्यादी सूत्रग्रंथांचा येथे उल्लेख करता येईल. अशा प्रकारच्या सूत्रग्रंथात सामान्यतः चार अध्याय असतात. सूत्र कसे असावे ?

अल्पाक्षरमसन्दिग्धं सारवद्विश्वतोमुखम्।
अस्तोभमनवद्यं च सूत्रं सूत्रविदो विदुः॥

सूत्र हे अल्पाक्षर म्हणजे थोड्या शब्दांचे, स्पष्ट व असंदिग्ध विचार मांडलेले, म्हणजे सारवान, ज्याचा अनेक अंगांनी अर्थ करता येतो असे प्रक्षेपरहित आणि दोषरहित प्रतिपादन करणारे असावे असे सूत्रवेत्ते सांगतात. सूत्रे सुटसुटीत असल्यामुळे ती पाठ करणे सोपे असते. त्यांच्यामुळे विषयाचा क्रम लक्षात येतो व त्यामुळे विषयाचे चांगले ज्ञान होते. तथापि विषयाचे ज्ञान करून न घेता केवळ सूत्रे पाठ केली तर मात्र विषयाचे चांगले ज्ञान होईलच असे नाही. विषयाचा विस्तार झाल्यावर सूत्रे रचली जातात पण नंतर त्यांचा अर्थ स्पष्टपणे समजण्यासाठी त्यांवर भाष्ये लिहिली जातात!

अन्य अनेक सूत्रग्रंथांपेक्षा नारदांची भक्तिसूत्रे वेगळी आहेत. इतर सूत्रग्रंथांप्रमाणे त्याचे चार अध्याय नाहीत. त्यांची अध्यायवार विभागणी नंतरच्या टीका किंवा भाष्य लिहिणारांनी केलेली आहे. इतर सूत्रग्रंथांपेक्षा नारदभक्तिसूत्रांची भाषा सोपी सरल व अर्थवाही आहे. नारदांपूर्वी गर्ग व शांडिल्य यांनीही भक्तिसूत्रे रचिली होती. गर्गांची सूत्रे कालोघात नाहीशी झाली. शांडिल्यांच्या भक्तिसूत्रात भावापेक्षा बुद्धीला जास्त आवाहन असल्यामुळे नारदांच्या भक्तिसूत्रांइतकी ती लोकप्रिय नाहीत. त्यांचा अभ्यास तुलनेने फार थोडे लोक करतात. शाश्वत सत्याचे सम्यग् दर्शन घडविणाऱ्या अध्यात्मग्रंथास दर्शन म्हणतात. नारदभक्तिसूत्रे ही या अर्थाने दर्शनग्रंथ म्हणता येईल. नारदांचे विचार आत्मसात करावे आणि मुकुलित स्वरूपातील हे भक्तिशास्त्र आचरणात कसे आणावे याचा आता आपण विचार करणार आहोत. आपण निरनिराळे उत्सव, जयंत्या, पुण्यतिथ्या करतो पण त्यात भगवंताचे किंवा आपल्या गुरूंचे

प्रेम किती असते? समारंभात आणि लोकांनी आपली तारीफ करावी यातच आपण मग्न असतो. आरती करतांना, भजने गातांना भावापेक्षा तालसुरातच आपण गुंग होतो. त्यामुळे त्यातील प्रेम निघून जाते आणि केवळ बाह्य देखावा किंवा कवच उरते. आरती करतांना, जप करतांना भगवंताच्या प्रेमाने डोळ्यात अश्रू यावे. अंतःकरणात तो भाव असावा. मी खोटा असलो तरी भगवंत खरा आहे. त्याच्या अस्तित्वाची जाणीव निर्माण झाली पाहिजे. त्यासाठी शरणागती हाच मार्ग आहे. शरणागती ही अवस्था आहे. ती येण्यासाठी भगवंताची सर्वज्ञता, सर्वशक्तिसमन्वितता यांसारख्या गुणांवर श्रद्धा पाहिजे. भगवंतासमोर मी दीन आहे. मी आहे हा असा आहे. माझे दोष मला काढता येत नाहीत आणि भगवंता! तू उदारांचा राजा आहेस. आता मी तुला सोडणार नाही अशी त्याची आळवणी करावी. ही भक्ती कशी करावी ते नारदांनी सांगितले आहे.

## अध्यात्मविद्या :

अध्यात्मविद्या अनुभवप्रधान असल्यामुळे भक्तीसंबंधीचे ज्ञान कोण सांगतो याला महत्त्व असते. भौतिक ज्ञानामध्ये ज्ञान सांगणारा कोण आहे यापेक्षा त्याने सांगितलेले किती बरोबर आहे याला जास्त महत्त्व असते. त्यामुळे ते सांगणाऱ्याच्या एक व्यक्ती म्हणून असणाऱ्या समाजातील स्थानाला तसे महत्त्व नसते. आध्यात्मिक ज्ञान जीवनाच्या सर्व अंगांना व्यापून असते. त्यामुळे आध्यात्मिक ज्ञान सांगणाऱ्या माणसाच्या जीवनात ते उतरलेले दिसावे अशी समाजाची अपेक्षा असते आणि तसे ते प्रत्यक्षात दिसले नाही तर अशा माणसाची किंमत समाजात कमी होते. उदाहरणार्थ, लोकांना भक्तीसंबंधी उपदेश करणारा माणूस स्वतः द्रव्यलोभी असला तर त्याचे वर्तन लोकांना चुकीचे वाटते आणि त्याच्या उपदेशाचा प्रभाव पडत नाही. अध्यात्म आत्मज्ञानविषयक असल्यामुळे त्याला स्वानुभवाची बैठक लागते. अशी बैठक नसलेल्या माणसाचे सांगणे, लिहिणे हे केवळ शब्दपांडित्य ठरते. म्हणूनच पंडितांनी लिहिलेल्या ग्रंथांपेक्षा संतांनी लिहिलेल्या ग्रंथांचा जनमानसावर जास्त प्रभाव पडलेला दिसतो. संत आणि विचारवंत यांमध्ये हा मोठा फरक आहे. संतांना आलेले आध्यात्मिक अनुभव हे वास्तविक शब्दांपलीकडचे असतात; तथापि शब्दांनी जितपत सांगणे शक्य असते तितके सांगण्याचा ते प्रयत्न करतात. त्यामुळे पंडित व विचारवंत आणि संत यांमध्ये एक मोठा फरक दिसून येतो. पंडित किंवा तत्त्वज्ञानी विचारवंत जे ज्ञान सांगतात त्या मानाने

व्यक्ती म्हणून त्यांची उंची कमी असते. याउलट संत जे शब्दांनी सांगतात त्याला अनुभवाचे पाठबळ असल्यामुळे त्यांचे व्यक्तिमत्व उत्तुंग असते. एकनाथ महाराजांसंबंधी लिहिताना आचार्य विनोबा म्हणतातः "नाथांचे भागवत जरी निःसंशय महान्, तरी नाथांचे चरित्र त्याहूनहि महान् आहे. सामान्यतः माणसांचें असें नसतें. माणसाचा शब्द त्याच्या जीवनाहून नेहमी उंच असतो. पण नाथांची स्थिति याच्या उलट दिसली" (एकनाथांचीं भजने - परंधाम प्रकाशन, पवनार १९८४. प्रस्तावना पृष्ठ २)

**भक्तिशास्त्राची गृहीतके** : कोणत्याही शास्त्राचा अभ्यास करताना त्या शास्त्राची व्याप्ती, त्याची मर्यादा आणि गृहीतके मान्य करूनच पुढे जावे लागते. उदाहरणार्थ, युक्लीडच्या भूमितीतील रेषा, सरळ रेषा, बिंदू इत्यादींसंबंधीची गृहीतके मान्य करूनच भूमितीचा अभ्यास करता येतो. भक्तिशास्त्राचीही काही गृहीतके आहेत. भक्तिशास्त्र समजण्यासाठी प्रथम या गृहीतकांचा थोडक्यात विचार केला पाहिजे. ही गृहीतके अशी : (१) मी आहे. (२) ईश्वर आहे. (३) जगत् आहे. यांपैकी पहिले व तिसरे सर्वांना मान्य असते पण ईश्वर आहे हे सर्वांनाच मान्य नसते. ज्यांना हे गृहीतक मान्य नाही त्यांच्यासाठी भक्तिशास्त्र नाही हे सुरुवातीसच लक्षात घेणे चांगले; कारण ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करणे हा भक्तिशास्त्राचा उद्देश नाही. ईश्वर आहे या गृहीतकावर ज्यांची श्रद्धा आहे त्यांना ईश्वराची भक्ती कशी करावी ते भक्तिशास्त्र सांगते. ह्या शास्त्राचा अभ्यास करताना प्रत्यक्ष (Perception), अनुमान (Inference) आणि शब्द किंवा आप्तवाक्य (Authority) या तीन प्रमाणांचा आपण उपयोग करतो.

ईश्वर केवळ 'आहे'. त्याचे हे 'आहे'पण सत् शब्दाने सांगता येते. ईश्वर जड नाही. तो चेतन आहे. तो ज्ञानमय आहे. यासाठी तो चित्रूप आहे असे सांगतात. शिवाय तो पूर्ण आहे. त्याच्यामध्ये सामावले जात नाही असे काही नाहीच. म्हणून तो आनंदस्वरूप आहे. म्हणून ईश्वर सच्चिदानंद आहे. आचार्य शंकरांनी त्याचे सर्वज्ञ आणि सर्वशक्तिसमन्वित या दोन पदांनी वर्णन केले आहे. हे ईश्वरासंबंधी झाले. आता मी कसा आहे? मी अनुभवांचे केंद्र आहे. ईश्वर माझ्यासारखा आहे. मी आहे याबद्दल जसा मला संशय नाही तसा ईश्वर आहे याबद्दलही मला संशय नसेल तेव्हांच ईश्वराची भक्ती करता येईल. तथापि ईश्वर आणि मी यांमध्ये भेदही आहे. ईश्वर ज्ञानस्वरूप आहे तर मी अज्ञानी आहे. आपण अज्ञानी आहोत हेही माणसाला सामान्यपणे कळत नाही. म्हणून ज्याला मी अज्ञानी आहे हे कळते त्याला एका दृष्टीने ज्ञानीच म्हटले पाहिजे.

अज्ञानी असूनही मला कळते असे माणसाला वाटते. अध्यात्माच्या बाबतीत तर आत्मज्ञान हा अभेदाने येणारा अनुभव असल्यामुळे मला ज्ञान झाले असे सांगणाराच तेथे उरत नाही. म्हणून जो मला आत्मज्ञान झाले असे सांगतो तो खरा अज्ञानीच होय असे उपनिषदांनी म्हटले आहे. 'यस्यामतं तस्य मतम्, मतम् यस्य न वेद सः' रामदासही मनोबोधात म्हणतात, "म्हणे जाणता तो जनीं मूर्ख आहे" कारण "अतर्कासि तर्की असा कोण आहे?" ईश्वर पूर्ण आहे तर मी अपूर्ण आहे. त्यामुळे मला जसे ज्ञान व्हावे असे वाटते तसेच मला पूर्ण व्हावे असे वाटते. आहे त्यात आणखी काहीतरी भर पडली की मी पूर्ण होईन असे मला वाटते आणि हा सर्व वासनांचा आणि कर्माचा उगम आहे. माणसाला आनंद पाहिजे असतो; दुःख नको असते; कारण माणसाची आनंदरूप ईश्वराकडे ओढ आहे. माणसाचे जगातील असणे संबंधमय आहे. त्याच्या जन्मापासून एक संबंधांचे जाळे अस्तित्वात येते. आई-वडील, भाऊ-बहीण, काका, मामा इत्यादी अनेक नातेसंबंध जसे आपोआप निर्माण होतात, त्यासाठी प्रयत्न करावा लागत नाही, तसे जाणता अजाणता काहीशा प्रयत्नाने माझी भाषा, माझे मित्र, माझा धर्म, माझा समाज, माझे राष्ट्र इत्यादी संबंध निर्माण होतात. या संबंधांपैकी एक म्हणून माझा जेव्हां ईश्वराशी संबंध येतो तेव्हां भक्त व भगवंत असा संबंध निर्माण होतो. ज्यांना ईश्वराचे अस्तित्व मान्य नाही त्यांच्या बाबतीत हा संबंध संभवत नाही. ईश्वराशी प्रेमाचा संबंध ठेवणे म्हणजे भक्ती हे मान्य केले म्हणजे हा प्रेमसंबंध कोणता असावा असा प्रश्न उभा राहतो. ईश्वर हा स्वामी व मी त्याचा दास, ईश्वर माझा पिता किंवा माता व मी त्याचे मूल, ईश्वर माझा प्रियतम व मी त्याची प्रियतमा असे वेगवेगळे संबंध प्रस्थापित करता येतात. वास्तविक मी आणि ईश्वर वेगळे नाहीच कारण तो हृदयस्थ आहे. तथापि भक्त्या निर्मितं देवं अद्वैतादपि सुंदरम् असे असल्यामुळे भक्ताचे वर्णन करताना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "जीव परमात्मा दोन्ही। बैसोनि ऐक्यासनीं। जयाचा हृदयभुवनीं। विराजती॥ ज्ञानेश्वरी १२.१५३॥" भगवंताशी असलेल्या सर्व संबंधांपैकी स्वामी आणि दास हा खरोखर उत्तम संबंध आहे. मारुतीचे वर्णन करताना रामदास त्याचा उल्लेख 'रामदासी अग्रगण्यु' असा करून स्वतःला रामदास म्हणवितात तर ज्ञानेश्वर महाराजही स्वतःला निवृत्तिदास म्हणवितात.

आता जगासंबंधी विचार करू. जगत् एकसारखे बदलते आहे. ते स्थल, काल आणि निमित्त म्हणजे कार्यकारणभावाच्या चौकटीत बंदिस्त आहे.

कालाच्या प्रवाहामध्ये जगात एकसारखे बदल होत असतात; म्हणजे एकसारख्या विविध घटना घडत असतात. कोणतीही घटना कोठे घडली, केव्हां घडली व का घडली असे प्रश्न निर्माण होतात. घटना चांगली की वाईट ते आपण सामान्यतः तिच्या आपणावर होणाऱ्या परिणामांवरून ठरवीत असतो. पण घटना केवळ घडते. तिचा चांगली किंवा वाईट असा अंगभूत गुण नसतो. उदाहरणार्थ, प्रचंड भूकंप होऊन किंवा महापूर येऊन हजारो माणसे जेव्हां मृत्युमुखी पडतात आणि घरादारांचा विध्वंस होतो तेव्हां त्या घटनेंचे भयानक घटना असे आपण वर्णन करतो. पण खरे म्हणजे निसर्गात प्रतिक्षणी घडणाऱ्या अनेक घटनांपैकी ती एक असते. इतर प्राणी आणि माणूस यांमधील महत्त्वाचा फरक असा की कोणतीही घटना का घडली याचा मनुष्य विचार करतो व कार्यकारण संबंध शोधून काढतो. आणखी एक बाब अशी की प्रत्येक माणूस जगात रहात असूनही स्वतःला बाकीच्या जगापासून वेगळा समजत असतो. त्यामुळे जगाशी व जगातील माणसांशी, वस्तूंशी, प्राणिमात्रांशी असणारे त्याचे संबंध चांगले किंवा वाईट असतात. त्यामुळे सर्वांशी अविरोध जगणे हा जीवनाचा आदर्श ठरतो. प्रत्येक घटनेमागे काही कारणें असली तरी त्या सर्व कारणांमागे असणाऱ्या कारणाला आदिकारण म्हणतात. ज्ञानेश्वरीला सुरुवात करताना ज्ञानेश्वर महाराज या आदिकारणाला 'ॐ नमो जी आद्या' असे वंदन करतात. भक्तीचे तत्त्वज्ञान जाणून घेतांना या आदिकारणावर श्रद्धा असणे आवश्यक आहे. जगात घडणारी प्रत्येक गोष्ट अंतिमतः त्या आदिकारणामुळे म्हणजे भगवंताच्या इच्छेने घडते आहे हे ज्याने मानले त्याच्या भक्तीला सुरुवात झाली.

म्हणून पुढे दिलेली गृहीतके मान्य करून आपण नारदभक्तिसूत्रांचा अभ्यास करू.

(१) मी आहे. (२) जगत् आहे. (३) ईश्वर आहे. (४) माझा व जगाचा संबंध आहे. (५) ईश्वराचा जगाशी संबंध आहे. (६) ईश्वराचा माझ्याशीही संबंध आहे. (७) ईश्वर सर्वशक्तिमान आहे तर मी अल्पशक्ती आहे. (८) ईश्वर ज्ञानी आहे तर मी अज्ञानी आहे. (९) ईश्वर सर्वकर्ता आहे तर मी अल्पकर्ता आहे म्हणून (१०) ईश्वराशी असलेला माझा संबंध माझ्या बाजूने जिवंत ठेवण्यासाठी ईश्वराची इच्छा तीच माझी इच्छा झाली पाहिजे.

* * *

# अध्याय पहिला
# परमभक्तीची व्याख्या व स्वरुप

## १.१ परमभक्तीची व्याख्या

महर्षि नारदांना तीन्ही लोकांमध्ये मान होता. देव, दानव व मानव त्यांची पूजा करत असत. त्यांचे संक्षिप्त चरित्र आपण विषयप्रवेशात पाहिले. येथे नारद शब्दाचा अर्थ पाहू. नारं, परमात्मविषयकं ज्ञानं ददाति इति नारदः असे शब्दकल्पद्रुमात म्हटले आहे. नार म्हणजे परमात्म्याविषयीचे ज्ञान. ते जो देतो तो नारद. यावरून भगवंताचे गुणगायन करत तीन्ही लोकात संचार करण्याचा नारदांचा हेतू स्पष्ट होतो. हरिवंशात आणि विष्णुपुराणात मात्र नारद म्हणजे नारं, नरसमूहं द्यति, खण्डयतीति म्हणजे लोकांमध्ये भांडणे लावून देणारा, कलहप्रिय असा अर्थ दिलेला आहे. तथापि भांडणे लावताना त्यामुळे भांडणारांचे अंतिम हित साधले जावे हाच भांडणामागे त्यांचा उद्देश असे, हे सर्वांना मान्य आहे. कंसाला देवकीची मुले मारण्याचा सल्ला देताना किंवा शनीच्या छातीवर पाय ठेव असे रावणाला सांगताना, या आसुरी शक्तींचा नाश करून लोकांचे जीवन सुखमय करावे हाच त्यांचा हेतू होता. आत्मज्ञान करून घेणे हे प्रत्येक माणसाचे आद्य कर्तव्य आहे असे त्यांना वाटत होते. वीणेच्या सुराबर भगवन्नाम संकीर्तन करताना ते नादब्रह्मात स्वतःला विसरून जात असत. नारदांबद्दल श्रीकृष्ण उग्रसेनाला सांगतातः नारद कसे आहेत तर -

"अध्यात्मविधितत्त्वज्ञः क्षान्तः शान्तो जितेन्द्रियः।
ऋजुश्च सत्यवादी च तस्मात् सर्वत्र पूजितः॥
कल्याणं कुरुते बाढं पापमस्मिन् न विद्यते।
न प्रीयते परानर्थैः तस्मात् सर्वत्र पूजितः॥
कृतश्रमः कृतप्रज्ञो ज्ञानतृप्तः समाहितः।
नित्ययुक्तोऽप्रमत्तश्च तस्मात् सर्वत्र पूजितः।"

त्यांच्या ठिकाणी अहंकार नाही. अहंकाराने उन्मत्त झालेल्यांच्या बद्दल दया वाटून ते त्यांचा अहंकार नाहीसा करण्याचा प्रयत्न करतात. ते एकाच वेळी ज्ञानी, योगी आणि भक्त आहेत. तथापि भक्तीचा आनंद त्यांच्या जीवनात ओतप्रोत दिसतो. त्यामुळे साहजिकच त्यांनी भक्तिसिद्धान्त समर्पक सूत्रांमध्ये सांगितलेला आहे.

## सूत्र पहिले

**अथातो भक्तिं व्याख्यास्यामः ॥१॥**

**पदच्छेद अर्थः अथ = आताः अतः = यापुढे. भक्तिम् = भक्तिविषयक व्याख्यास्यामः= व्याख्या, विवरण करणार आहोत.**

**भावार्थः आता यापुढे आम्ही भक्तिविषयक विवरण करणार आहोत.**

**विवरणः** सूत्रग्रंथांची विषय मांडण्याची एक विशिष्ट पद्धत आहे. शब्दांच्या अनेक अर्थांपैकी सूत्रग्रंथांच्या मूळ विषयाशी सुसंगत असे योग्य ते अर्थ घेऊनच सूत्रांचा अर्थ समजून घ्यावा लागतो. **अथ** म्हणजे आता. पण सूत्रग्रंथांची सुरुवात करताना अथ या शब्दाने अनेक भाव सूचित होतात. 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' असे बादरायणांचे पहिले ब्रह्मसूत्र आहे. पतंजलींनी 'अथ योगानुशासनम्' असे अष्टांगयोगाचे पहिले सूत्र दिले आहे. अथ म्हणताना आता एक अतिशय महत्त्वाचा विषय आपण सांगत आहोत अशी सूत्रकर्त्या ऋषींची भूमिका असते. पण त्याचबरोबर कोणत्याही अध्यात्मविषयक ग्रंथाची सुरुवात ॐ किंवा अथ या मंगलसूचक शब्दाने करतात. ज्ञानेश्वर महाराज 'ॐ नमोजी आद्या' अशी ज्ञानेश्वरीची सुरुवात करतात. उपनिषदांतील शांतिमंत्रांची सुरुवात ॐकारानेच होते. ॐ काराप्रमाणे अथ शब्दही मंगल सुचवितो. ''ॐकारश्चाथ शब्दश्च द्वावेतौ ब्रह्मणः पुरा। कण्ठं भित्वा विनिर्यातौ तस्मात् मांगालिकावुभौ॥'' पूर्वी ब्रह्मदेवाच्या कंठातून ॐकार व अथ शब्द आले म्हणून ते मंगलाचे सूचन करतात. शंकराचार्यांनी अथ शब्दाचा अर्थ सत्पात्र अधिकारी झाल्यानंतर पुढील सूत्रांचा अभ्यास करावा असे ब्रह्मसूत्रांच्या भाष्यात सांगितले आहे. ब्रह्मसूत्रातील ज्ञानमार्गाचा अधिकारी साधनचतुष्टय संपन्न असला पाहिजे असे त्यांनी म्हटले आहे.

साधनचतुष्टय : (१) नित्यानित्यविवेक म्हणजे जगात नित्य म्हणजे शाश्वत काय आहे व अनित्य काय आहे हे जाणणे. (२) हे जाणल्यानंतर जे अनित्य आहे त्याचा त्याग म्हणजेच या लोकीच्या व परलोकातील फलभोगांसंबंधी ते अनित्य असल्यामुळे वैराग्य निर्माण होणे - इहामुत्रफलभोगविराग (३) (अ) शम म्हणजे मनाचा निग्रह (आ) दम म्हणजे इंद्रियांचा निग्रह (इ) श्रद्धा म्हणजे गुरु व वेदवाक्यांसंबंधी आत्यंतिक विश्वास (ई) उपरम म्हणजे विधियुक्त सर्व कर्मांचा त्याग (उ) तितिक्षा म्हणजे द्वंद्वसहिष्णुता. तक्रार न करता सर्व सहन करणे, आणि (ऊ) समाधान म्हणजे चित्ताची एकाग्रता हे

सहा गुण शमदमादिषट्क म्हणून ओळखले जातात, आणि (४) मुमुक्षुता म्हणजे मोक्षाची इच्छा. हे साधनचतुष्टय आत्मसात केल्यानंतर माणूस ब्रह्मज्ञानाचा अधिकारी होतो.

कोणत्याही शास्त्राचा अभ्यास करावयाचा असेल तर जो अभ्यास करावयाचा आहे त्याची अभ्यास करणाऱ्याला आवड पाहिजे. तसेच ज्या पातळीवरचा अभ्यास करावयाचा असेल त्याच्या आधीच्या पातळीपर्यंत त्या विषयाची माहिती असली पाहिजे. अभ्यास करण्याची, त्यासाठी होणाऱ्या कष्टांची तयारी पाहिजे आणि धारणाशक्ती पाहिजे. उदाहरणार्थ, प्राथमिक शाळेतील विद्यार्थ्याला एकदम पदवी परीक्षेचे गणित शिकवू म्हटले तर ते शक्य होणार नाही. म्हणून कोणत्याही शास्त्राचा अभ्यास करावयाचा असेल तर त्यासाठी अधिकारी व्यक्ती लागते. ब्रह्मज्ञानासाठी साधनचतुष्टयसंपन्न माणूस असला पाहिजे हे आपण पाहिलेच. मग भक्तिशास्त्राचा अधिकारी कोणाला म्हणावे? श्रीरामकृष्णांनी म्हटले आहे की भक्ति-लाभ होण्यासाठी आन्तरिक व्याकुलतेची अत्यंत गरज आहे. मला भगवंत हवा, दुसरे काहीही नको असे ज्याला अंतःकरणापासून तीव्रतेने आणि सतत वाटू लागते त्याला भक्तीचा अधिकारी म्हणता येईल. जोपर्यंत मनात भोगवासना आहेत तोपर्यंत ईश्वर दर्शनासाठी प्राण व्याकुळ होणार नाही. याचाच अर्थ असा की भक्तीसाठी जात, वर्ण, कुल, लिंग, वय, संपत्ती, लोकमान्यता इत्यादी कोणतीही अट नाही. यासंबंधी पुढे नारदांचे एक सूत्र (सूत्र ७२) येईलच. भगवद्गीतेच्या नवव्या अध्यायात भगवंत सांगतात, ''अपि-चेत् सुदुराचारो भजते माम् अनन्यभाक्। साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥३०॥'' म्हणजे पूर्वी अत्यंत दुराचरणी असला तरी तो जर अनन्यभक्त होऊन माझी भक्ती करील तर तो साधूच मानला पाहिजे; कारण त्याची वागणूक आता चांगली झाली आहे. याच अध्यायात भगवंत पुढे सांगतात की पार्था, माझा आश्रय घेऊन स्त्रिया, वैश्य, शूद्र, फार काय चाण्डाल आणि पापयोनी असतील तर ते सुद्धा पापमुक्त होऊन अत्युच्च अध्यात्मश्रेय प्राप्त करू शकतील. अर्जुना, ध्यानात ठेव की माझा आश्रय घेतलेला भक्त कधीही नाश पावत नाही. या संबंधात ज्ञानेश्वर महाराज सांगतात, ''यालागीं दुष्कृती जऱ्ही जाहला। तरि अनुतापतीर्थीं न्हाला। न्हाऊनि मजआंतु आला। सर्वभावें ॥४२०॥ तरि आतां पवित्र तयाचेंचि कुळ। अभिजात्य तेंचि निर्मळ। जन्मलेया फळ। तयासीच जोडलें ॥४२१॥... म्हणोनि कुळ जाति वर्ण। हें आघवेंचि गा अकारण। एथ अर्जुना माझेपण।

सार्थक एक ॥९.४५६॥" भगवंताच्या भक्तशिरोमणींमध्ये ज्ञानेश्वर महाराज, एकनाथ महाराज, गोरोबा कुंभार, सांवता माळी, सेना न्हावी, नामदेव, तुकाराम, चोखोबा इत्यादी जातिव्यवस्थेच्या उतरंडीतील संत आहेत; मुक्ताबाई, जनाबाई, मीराबाई, वेणाबाई यांच्यासारख्या स्त्रिया आहेत; वाल्या कोळ्यासारखे वाटमारी करणारे आहेत, प्रल्हादासारखे दैत्यपुत्र आहेत, अजामीळासारखे पापी आहेत, इतकेच नव्हे तर गजेन्द्रासारखे पशूही आहेत!

व्याख्यास्यामः व्याख्या म्हणजे टीका किंवा विवरण, निरुपण, स्पष्टीकरण.

आम्ही आता भक्तीचे विवरण-भक्तीसंबंधी निरूपण करीत आहोत असे नारद सांगतात. वृत्तपत्रांचे संपादक आमचे असे मत आहे असे लिहितात; तसा मोठेपणा घेण्यासाठी नारदांनी आम्ही असे बहुवचन वापरलेले नाही. नारद निरहंकारी होते आणि त्यांच्या काळी प्रचलित असलेल्या भक्तीसंबंधीच त्यांनी सांगितलेले आहे. ते सांगताना त्यांच्याहीपूर्वी भक्तीसंबंधी ज्यांनी निरूपण केले आहे त्यांचाही त्यांनी या सूत्रात समावेश केलेला आहे. म्हणून सूत्रांचे कर्तृत्व केवळ त्यांचे स्वतःचे न मानता त्याचे श्रेय ते पूर्वसूरींनांही देतात.

भक्तीची व्याख्या नारद दुसऱ्या सूत्रात सांगतात.

## सूत्र दुसरे

**सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा ॥२॥**

**सा = ती (भक्ती). तु = केवळ. अस्मिन् = ह्या (परमेश्वराच्या) ठिकाणी परम = अतिशय. प्रेमरूपा = उत्कट प्रेम असणारी.**

**केवळ आपल्या इष्टदेवतेच्या ठिकाणी नितांत प्रेमभाव अशा स्वरूप लक्षणाची ती परमभक्ती आहे.**

**विवरण** : सामान्यतः ज्या विषयाच्या प्रतिपादनासाठी सूत्रे रचलेली असतात त्या विषयाची व्याख्या दुसऱ्या सूत्रात देण्याची सूत्रकारांची पद्धत असते. उदाहरणार्थ, पतंजलींनी दुसऱ्या सूत्रात "योगः चित्तवृत्तिनिरोधः" अशी योगाची व्याख्या केली आहे. नारदानीही या सूत्रात भक्तीची व्याख्या दिली आहे.

कोणत्याही विषयाच्या व्याख्येत त्या विषयाचे प्रधान लक्षण यावे लागते. विषय चांगला माहीत असल्याखेरीज आणि त्याची व्याप्ती व स्वरूप यांचे सखोल ज्ञान असल्याखेरीज निर्दोष व्याख्या करता येत नाही. व्याख्या करताना एका प्रश्नाचे उत्तर देताना त्यातून दुसरा प्रश्न निर्माण होण्याची भीती असते.

उदाहरणार्थ, भक्त कोणाला म्हणावे ते सांगताना समर्थ रामदासानी 'विभक्त नव्हे तो भक्त' असे म्हटले आहे. पण ही नकारात्मक व्याख्या झाली. एखाद्या माणसाबद्दल तो चांगला नाही असे म्हटले तर म्हणजे तो कसा आहे याचा उलगडा होत नाही. म्हणून व्याख्या सुस्पष्ट असली पाहिजे.

भक्तीमध्ये भक्ताचे भगवंतावर नितांत प्रेम असते. भगवंत आहे आणि मी आहे. म्हणजे ज्याची भक्ती करावयाची तो आणि जो भक्ती करणार आहे तो या दोहोंबद्दल मला संशय नाही. या जगात कर्म करूनच मी भक्ती करावयाची आहे. भगवंताची सेवा करावी असे मला वाटत असेल तर त्यासाठी भगवंताला जे आवडते ते देणे महत्त्वाचे आहे. परमेश्वराला माझ्याकडून निष्काम निरतिशय प्रेमाची अपेक्षा आहे पण मी मात्र काही हेतू मनात धरून त्याची सेवा करतो. त्याला आवडते ते न देता मला आवडते ते त्याला देतो. मोठमोठ्या मंदिरातील पुजारी पूजा करताना ते केवळ एक सोपवलेले काम म्हणून करत असतात. पूजेचे उपचार करताना देखील त्यांच्या मनात विषय चिंतन - ऐहिक लाभच असतो. पूजापाठ हे भक्तीचे बहिरंग तर ते करताना भक्ताच्या हृदयात उचंबळणारे प्रेम हे भक्तीचे अंतरंग होय. म्हणून खरी भक्ती म्हणजे काय ते समजण्यासाठी हे सूत्र महत्त्वाचे आहे.

सा म्हणजे ती भक्ती अस्मिन् म्हणजे भगवंताच्या ठिकाणी परमप्रेमरूपा म्हणजे अतिशय प्रेममय आहे. परमप्रेमरूपा म्हणजे अतिशय खोल प्रेम असलेली अशी ती भक्ती आहे. माझ्यामध्ये अतिशय खोल माझी जगण्याची वासना आहे. भगवंताबद्दल या वासनेइतके खोल प्रेम वाटू लागले की भगवंताचे परमप्रेम आहे असे म्हणता येईल. असा भक्त मी तुझ्याकरता जगतो असे भगवंताला म्हणेल. भगवंतावर प्रेम करणे ही कृती आहे. म्हणून त्यासाठी भगवंत सगुण, साकार, चिन्मय पाहिजे. 'द्वावेव ब्रह्मणे रूपं मूर्तं चामूर्तंच.' अमूर्ताची, निर्गुणाची भक्ती कशी करणार? त्यामुळे ज्या धर्मात मूर्तिपूजा नाही त्या धर्मात भक्त क्वचित होतात. सगुणाचे लक्षण नाम व रूप. भगवंताच्या नामाची आवड निर्माण झाली आणि अंतःकरणात त्याचे रूप ठसले की भक्ती सुरू होते. भगवंताची सारखी आठवण होऊ लागली की भक्त नामस्मरणात रंगून जातो आणि त्याला प्रिय असलेले भगवंताचे रूप त्याला डोळ्यासमोर दिसू लागते. तुकाराम महाराज त्यांचा अनुभव सांगतात, "आवडे हें रूप गोजिरें सगुण। पाहतां लोचन सुखावले ॥ १ ॥ आतां दृष्टीपुढें ऐसाचि तूं राहे। जों मी तुज पाहें पांडुरंगा ॥ २ ॥ लांचावलें मन लागलीसे गोडी। तें जीवें न सोडी ऐसें झालें ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही मागावी

लडिवाळी। पुरवावी आळी मायबापा ॥ ४॥'' तुकाराम महाराजांचा हट्ट पांडुरंगाने पुरविला आणि ''जेथें जातो तेथें तूं माझा सांगाती। चालविसी हाती धरूनिया॥'' असे त्यांच्या प्रत्ययास आले नामदेवांनी दाखवलेला नैवेद्य विठ्ठलाला खावा लगाला. कृष्णप्रेमनी नैवेद्य दाखवून ठेवलेल्या हलव्यातला हलवा (शिरा) श्रीकृष्णाने खाल्ला. पण याहीपेक्षा आश्चर्यकारक गोष्ट म्हणजे श्रीमहाराज (ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज) आजारी होते तेव्हां थोरल्या राममंदिरातील मूर्तीच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. ईश्वर सर्वशक्तिमान खरा, पण तो आपल्या भक्तांच्या आधीन होतो. तो स्वतंत्र आहे म्हणूनच वाटेल तेव्हां परतंत्र होण्याचे त्याला स्वातंत्र्य आहे. भागवतात श्रीकृष्ण सांगतात ''अहं भक्तपराधीनो ह्यस्वतन्त्र इव द्विज। साधुभिर्ग्रस्तहृदयो भक्तैर्भक्तजनप्रियः॥ भागवत ९.४.६३॥'' भक्त गुरूची अथवा परमेश्वराची भक्ती करतो म्हणजे त्यांना जे आवडते ते नामस्मरण, अन्नदान इत्यादी तो करू लागतो. पण तरीही त्याच्या मनात शंका असते की मी जे करतो ते त्यांच्यापर्यंत पोचते की नाही? गुरु जर देहधारी असतील तर कदाचित त्यांना विचारता येते किंवा ते आपण होऊन सागंतात पण ते देहात नसले तर किंवा परमेश्वराच्या बाबतीत प्रतिसाद येणे व तो समजणे कठीण जाते. 'श्रीमहाराज माणूस नाहीत आणि पांडुरंग दगड नाही' असे ब्रह्मानंद महाराज म्हणाले तेव्हां त्यांना देहापलीकडचे अस्तित्व आणि चैतन्य जाणवत होते.

प्रेमासंबंधी दोन गोष्टी सांगता येतील. (१) प्रेमविषयाची सारखी आठवण आणि (२) प्रेमविषयाचा सतत ध्यास. एखाद्या बाईचे एकुलते एक मूल दुर्दैवाने गेले तर त्याचे फोटो, खेळणी, कपडे पाहून तिला त्याची एकसारखी आठवण येते. ते मूल हसायचे कसे, रुसायचे कसे, हट्ट कसा करायचे हे तिला वरचेवर आठवते. त्याप्रमाणे भगवंताचे स्मरण झाले की भक्त त्याच्या लीला आठवून त्याचे गुणगान करू लागतो. गुरुदेव रानडे एकदा सांगलीच्या राजेसाहेबांना घेऊन इंचगिरीला गेले होते. तेथे निंबर्गी महाराजांच्या समाधीशेजारी त्यांचे शिष्य आणि गुरुदेवांचे गुरु भाऊसाहेब उमदीकर कोठे बसत, कोठे उभे राहून कीर्तन करीत, कोठे बसलेले असताना त्यांनी काय सांगितले इत्यादी आठवणी अर्धा पाऊण तास सांगत होते. तेथून परत निघतांना भाऊसाहेब ज्या जागेवर बसून निरूपण करीत असत तेथील माती त्यांनी कपाळाला लावली! म्हणजे प्रेमात किंवा भक्तीत प्रेमविषयाच्या, गुरूंच्या अथवा भगवंताच्या लीला आठवतात. पण ज्यांच्याजवळ भक्ती नाही त्यांनी काय करायचे? भक्तीमुळे

जसे लीलांचे चिंतन होते तसे भगवंताच्या आणि आपल्या गुरूंच्या लीलांचे चिंतन केले तर भक्ती निर्माण होते असा साधकांचा अनुभव आहे; मात्र त्यासाठी चिकाटी पाहिजे. आणि म्हणूनच श्रवणाचे महत्त्व आहे. लीला ऐकेन त्या भगवंताच्या, डोळ्यांनी रूप पाहीन त्या मनमोहन भगवंताचे, सुवासिक फुले गोळा करीन त्याला अर्पण करण्यासाठी, स्पर्श त्याच्या पादुकांना करेन, वाचेने त्याचे नाम घेईन आणि त्याच्या लीला सांगेन. माझे विचार, माझ्या भावना, कल्पना, स्मृती इत्यादी सर्व त्याचे स्मरण राहावे हाच प्रयत्न करतील. पण हे सर्व करत असताना त्याचा प्रतिसाद कसा समजायचा? रूपाचे ध्यान एकसारखे सर्वकाळ करणे शक्य नसते. पण कोणत्याही स्थितीत मनाचे समाधान टिकू लागले तर समजावे की ही त्याची कृपा आहे. त्याचे अस्तित्व कसे आहे? तो सर्वव्यापी आहे. म्हणजे माझ्यामधेही आहे. तो पूर्ण आहे त्यामुळे त्याच्या बाबतीत असमाधान संभवतच नाही. माझ्या हृदयातले असमाधान कमी होऊ लागले की ओळखावे की तो अंतःकरणात प्रगट होऊ लागला आहे. "प्रगटे हृदयींची मूर्ती। भावशुद्धी देखोनिया॥" म्हणून चित्तशुद्धीचे महत्त्व.

आज मला ईश्वराचे दर्शन होत नाही कारण आमच्या दोघांमध्ये अविद्येचा पडदा आहे. माझे मन हजार ठिकाणी चिकटलेले आहे. हेच आवरण. हे असंख्य ठिकाणी चिकटलेले मनही शुद्ध नाही, स्वार्थी आहे. माझे प्रेम देखील स्वार्थी, व्यवहारी आहे. या संदर्भात श्रीमहाराज एक गोष्ट सांगत. एक प्रेमळ जोडपे होते. त्यांच्यापैकी गृहस्थ आजारी पडून एकाएकी वारला. बाईला अतिशय दुःख झाले. तिने आपले कपाळ जमिनीवर आपटले. शेवटी प्रेत नेण्याची वेळ आली तेव्हां तिने आपल्या मुलाला जवळ बोलावले आणि प्रेत उचलण्यापूर्वी त्यांच्या बोटातली अंगठी काढून ठेव म्हणून सांगितले. याच्या उलट खऱ्या, निस्सीम, अनन्य प्रेमासंबंधी ज्ञानेश्वर महाराज सांगतात, "गांवा गेलिया वल्लभु। पतिव्रतेचा विरहक्षोभु। भलतेसणी हानिलाभु। न मनीं जेवीं॥" - ज्ञानेश्वरी १६.७९॥ तिच्या मनात परगावी गेलेल्या तिच्या नवऱ्याखेरीज दुसरा विचार नसतो. इतर नफा नुकसानीकडे तिचे लक्षच नसते. भगवंत माझ्या हृदयात असला तरी आज मला त्याची जाणीव नाही. म्हणजे तो माझ्यापासून दूर गेल्यासारखाच आहे. त्याची भेट व्हावी अशी तळमळ लागली की माझे विचार, भावना, कल्पना, स्मृती इत्यादी भगवंताने व्यापले जातील. आणि हीच परमप्रेमा भक्ती होय.

माणसाचे आपल्या देहावर प्रेम असते. श्वासोच्छ्वासात अडथळा आला तर त्याचा जीव कासावीस होतो. म्हणून श्रीमहाराज सांगत की प्राण गेला तरी नाम सोडू नये. सर्वात शेवटी म्हणजे प्राण गेल्यावर नाम सुटावे. प्रेम कसे असावे याचा आदर्श म्हणून पुढे एकविसाव्या सूत्रात नारदानी व्रजगोपींचे उदाहरण दिले आहे. त्या स्वतःला भगवंताच्या निःशुल्का दासी (मोबदला न घेता दास्य करणाऱ्या) म्हणवत असत. त्यांना कृष्णापासून काही नको होते; फक्त कृष्णच पाहिजे होता म्हणून माणसाला जसे जागृती, स्वप्न व झोप या तीन्ही अवस्थात स्वतःचे भान राहाते तसे तीन्ही अवस्थात भगवंताचे भान राहिले पाहिजे. कबीर सांगतात,

प्रेम प्रेम सब कोइ कहे प्रेम न जानत कोय।
आठ पहर झूमत रहे प्रेम कहावइ सोय॥

माजलेला हत्ती जसा मस्त असतो तसे बाकीच्या सर्व गोष्टी विसरून चोवीस तास प्रेमामध्ये मस्त राहाणे हे खरे प्रेम होय. दुसऱ्या एका साखीमध्ये कबीर सांगतात,

जहां प्रेम तहँ नेम नहिं, तहां न बुधि व्यवहार।
प्रेम मगन जब मन भया, कौन गिने तिथिवार॥

प्रेमाला कोणतीही अट नाही. नामात स्वतःचा विसर पडू लागला की समजावे की आपल्या भगवंतावरील प्रेमाची पोच मिळाली. भगवंताला किंवा आपल्या गुरूंना जे आवडते ते आपल्याला आवडू लागणे हा प्रतिसाद आहे. त्याचप्रमाणे नीतिमत्तेचे आचरण, सुसंस्कृतपणा, निःस्वार्थीपणा आतून आवडू लागणे हा प्रेमाचा प्रतिसाद आहे. हे परमप्रेम आपल्या प्रचीतीस कसे येईल? 'विधवेसी एक सुत। तेथें अहर्निश चित्त॥, असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे. व्यवहारात अनेक ठिकाणी चिकटलेले आपले चित्त प्रयत्नपूर्वक गोळा करून भगवंताकडे लावावे. हे कसे करावे ते गुरु आपल्याला सांगतात. त्यासाठी सुरुवात म्हणून केवळ नातेवाइकांवर प्रेम न करता इतर लोकांवरही प्रेम करावे. निःस्वार्थी बनावे, अन्नदान करावे. म्हणजे आपल्या गुरूंना ज्या गोष्टी आवडतात त्या करण्यास सुरुवात करावी.

या सूत्रातील अस्मिन् हे इदम्‌चे सप्तमीचे एकवचन आहे. नारदांनी ईश्वर शब्द न वापरता ह्याच्या ठिकाणी असे म्हटले आहे म्हणजे त्यांनी निर्गुण व सगुण दोहोंचाही समावेश केला आहे आणि आपल्या इष्ट दैवतासंबंधी उपासकांना पूर्ण मोकळीक दिली आहे, सगुण उपासनेपेक्षा निर्गुणाची उपासना

जास्त कठीण आहे. शिवाय ती केल्यामुळे सगुणाच्या उपासनेपेक्षा काही जास्त लाभ होतो असेही नाही. भगवद्गीतेच्या १२ व्या अध्यायात भगवंत सांगतात, "क्लेशोऽधिकरस्तेषामव्यक्तासक्त चेतसाम्॥" ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "वांचूनि योगाचेनि बळें। अधिक कांही मिळे। ऐसें नाहीं आगळें। कष्टचि तया॥" - ज्ञानेश्वरी १२.५९॥

काहींच्या मते अस्मिन् म्हणजे ह्या ठिकाणी म्हणतांना नारद ते ठिकाण म्हणजे हृदय दाखवीत आहेत. कारण परमेश्वर सर्व प्राणिमात्रांच्या हृदयात राहातो, "ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति॥" - १८.६१ असे भगवंतानी भगवद्गीतेत सांगितले आहे.

तु म्हणजे केवळ. हे अव्यय महत्त्वाचे आहे. भक्ती परमप्रेमरूपा आहे असे म्हणताना तिच्याखेरीज अन्य सर्व प्रेमाचे व भक्तीचे प्रकार गौण आणि विचारात न घेण्यासारखे आहेत असे या पदाने जोर देऊन स्पष्ट केले आहे.

## सूत्र तिसरे

**अमृतस्वरूपाच ॥३॥**

**ती परमप्रेमरूपा भक्ति अमृतस्वरूपाची सुद्धा आहे.**

**विवरण :** मागील सूत्रात भक्ती परमप्रेमरूपा आहे म्हटले तर या सूत्रात अमृतस्वरूपा म्हटले आहे. रूप आणि स्वरूप यांमध्ये सूक्ष्म भेद आहे. रूप शब्दाने वस्तूचा आकार, रंग, वजन इत्यादी बाह्य गुणधर्मांचा बोध होतो आणि वस्तूच्या अंगभूत स्थायीभावाचे लक्षण (Intrinsic quality) स्वरूप शब्दाने समजते. साधक भक्ती करू लागला की त्याचे आचार, विचार, राहाणी, पोशाख इत्यादींमध्ये झालेला बदल इतरांना समजतो पण त्याच्या प्रेमभक्तीची गोडी त्यालाच समजते. त्या बाबतीत इतरांना कल्पनाही करता येत नाही. परा भक्ती साध्य झालेला भक्त ती भक्ती अमृतस्वरूपाची असल्यामुळे स्वतः अमृतस्वरूप होतो.

अमृतस्वरूपा म्हणजे मृत्युवर्जित. मृत्यू हा कालाचा निदर्शक आहे. भक्ति अमर आहे. तिला आदि नाही आणि अंत नाही. ती काळापलीकडे आहे म्हणजे एका अर्थी सच्चिदानंदस्वरूप आहे. परमप्रेमरूपा भक्ती करणारा परमात्मस्वरूप होतो. तो अ-मृत होतो, ब्रह्मत्व पावतो.

भक्तीचा आनंद हा दैवी आनंद आहे. प्राकृत आनंदाला दुःखाची बाजू असते. माणसाचे जीवन सुख-दुःख, लाभ-हानी, हर्ष-शोक इत्यादींनी युक्त

म्हणजे द्वंद्वात्मक आहे. पण भक्ती हे अमृत आहे, मोक्ष आहे. तथापि खऱ्या भक्ताला मुक्तीपेक्षा भक्तीच आवडते. तुकाराम महाराज म्हणतात, "नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव। मी भक्त तूं देव ऐसें करी॥" ते जेव्हां "प्रेम अमृताची धार। वाहे देवाहीसमोर॥" असे म्हणतात तेव्हां भगवत्प्रेमाच्या रसमयतेचा अनुभव सांगतात. रसो वै सः असे उपनिषदांनी भगवंताचे वर्णन केले आहे. ज्याने नामामृताची गोडी चाखली त्याला दुसरे काहीही गोड वाटणार नाही. "रामरसाचिया चवी। आनरस रुचे केवी॥" नामदेव महाराजही देवाला तुझे नाम अमृताहून गोड आहे असे म्हणतात.

भगवंताच्या प्राप्तीचे साधन म्हणून माणूस भक्ती करू लागतो. पण पुढे विशेषतः सत्संगती लाभली तर तो त्यात असा काही मस्त होतो की साधन म्हणून सुरू केलेले नामच साध्य होते. मग त्याला सायुज्यमुक्ती देखील नको असे वाटू लागते. "अद्वैतीं तों नाहीं माझें समाधान। गोड हे चरणसेवा तुझी॥" असे तुकाराम महाराज विनवितात तर एकनाथ महाराज म्हणतात, "भक्ती प्रेमाविण ज्ञान नको देवा। अभिमान नित्य नवा तयामाजीं ॥ १ ॥ प्रेम सुख देईं प्रेम सुख देईं। प्रेमेंविण नाहीं समाधान ॥ २ ॥"

केवळ ज्ञानी असलेला माणूस अहंकारी होतो पण भक्तीतून जेव्हां ज्ञान जन्मते तेव्हां ती भीती राहात नाही. म्हणून भक्ती अमृतस्वरूप, आनंदस्वरूप आहे. केव्हांही, कोठेही, काही कारण नसताना भक्ताचा हा आनंद टिकून राहातो. ह्या आनंदाचा स्थल, काल निमित्ताशी संबंधच नाही; तो या सर्वांच्या पलीकडचा आहे. लौकिक वासना म्हणजे मृत्यु; पण पराभक्तीमुळे लौकिक वासना समूळ नाहीशा होऊन भक्त अमर होतो. म्हणून भगवंताविषयी अनन्य प्रेम हेच अमृत आहे. भगवंताशी एकरूप झालेल्या भक्ताला पुन्हा जन्म नाही. भगवंताचा संयोग हे अमरत्व आहे असे नारद सांगतात.

अशा या परमप्रेमाचा लाभ झाल्यावर भक्ताची स्थिती काय होते ते नारद आता पुढील सूत्रात सांगत आहेत.

## सूत्र चौथे

**यल्लब्ध्वा पुमान् सिद्धो भवति, अमृतो भवति, तृप्तो भवति ॥४॥**

**यत्=जे. लब्ध्वा=लाभल्यानंतर. पुमान्=पुरुष-मनुष्य. सिद्धो=सिद्ध. भवति=होतो. अमृतो भवति=अमर होतो. तृप्तो भवति=तृप्त होतो.**

**जे (परमप्रेम) मिळाल्यावर मनुष्य सिद्ध होतो (अंतिम पारमार्थिक ध्येय साध्य करतो) मृत्युभयापासून मुक्त होतो कारण जन्ममरणाच्या फेऱ्यातून तो सुटतो. तो तृप्त होतो, कृतार्थ होतो.**

**विवरण** : येथे यत् हे यद् ह्या सर्वनामाच्या नपुंसकलिंगाचे एकवचन आहे. म्हणून त्याचा संबंध भक्तीशी न जोडता परमप्रेमाशी जोडला पाहिजे. भक्तीचा लाभ झाल्यावर असे म्हणावयाचे असते तर नारदांनी या लब्ध्वा असे म्हटले असते. म्हणून ह्या सूत्रात परमप्रेमाचा - अतिशय गाढ प्रेमाचा लाभ झाल्यानंतर भक्ताची स्थिती कशी होते ते सांगितले आहे. ह्या प्रेमाचा लाभ कसा होतो? काही भाग्यवंतांनी अनेक जन्म भगवंतावर प्रेम केले असेल तर तीच वासना घेऊन ते जन्माला येतात. ज्ञानेश्वर महाराज, एकनाथ महाराज, समर्थ रामदास, श्रीमहाराज अशा संतांच्या बाबतीत भगवंताचे प्रेम उपजत असते. तुकाराम महाराजांसारखे संत संसारतापाने पोळून परमार्थाकडे वळतात. तथापि त्यांनीच म्हटल्याप्रमाणे "प्रेम न ये सांगतां बोलतां दावितां। अनुभव चित्ता चित्त जाणें॥". हे थोर संतांचे झाले. पण जे नुकतेच भक्तिमार्गाकडे वळले आहेत, नामस्मरण, भजन, कीर्तन, पूजा इत्यादी गोष्टी भगवंताशी प्रेमाचा संबंध जोडण्याच्या हेतूने करीत आहेत त्यांनाही ईश्वर मदत करतो. उपासना कशी करावी ते तुकाराम महाराजांनी सांगितले आहे. "प्रेम देवाचें देणें। देहभाव जाय जेणें। न धरावी मनें। शुद्धी देशकाळाची॥" भगवंताने परमप्रेमाची देणगी दिली की भक्ताचा देहभाव नाहीसा होतो. मी देह आहे ही भ्रांती नाहीशी होते. ज्यांचा देहभाव गेला आहे आणि ज्यांच्या ठिकाणी असे परमप्रेम निर्माण झाले आहे त्यांचे चित्त सर्वकाळ हरिचिंतनात मग्न असते. त्यांना देशकालाचा विसर पडतो. म्हणून भक्ताचे प्रयत्न आणि भगवंताची कृपा या दोहोंचा संयोग झाला की भगवंताच्या ठिकाणी परमप्रेमाची प्राप्ती होते. ईश्वराची कृपा केव्हा होईल हे कसे सांगता येईल? पण ती व्हावी, भगवंताचे दर्शन व्हावे अशी तीव्र तळमळ साधकाला पाहिजे. मग भगवंत प्रसन्न होतो. संध्याकाळी रानातून परत आलेल्या गायीला तिच्या पाडसाचे हंबरणे ऐकून जसा पान्हा आवरत नाही तशी भगवंताची अवस्था होते. कठोपनिषदात म्हटले आहे की "नायं आत्मा प्रवचनेन लभ्यो, न मेधया, न बहुना श्रुतेन। यमेवेष वृणुते तेन लभ्यः" (ह्या आत्म्याचा - हृदयस्थ परमेश्वराचा प्रवचनाने, बुद्धिसामर्थ्याने अथवा श्रवणाने लाभ होत नाही. ज्याच्यावर तो कृपा करतो त्यालाच त्याचा लाभ होतो.)

म्हणूनच ज्ञानेश्वर महाराजांनीही ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायाच्या सुरुवातीस गुरुकृपादृष्टीस वंदन केले आहे. परमप्रेमाची प्राप्ती झाल्यानंतर माणूस-पुमान् सिद्ध होतो.

**पुमान्** - नारदांनी सूत्रामध्ये भक्त असे न म्हणता पुमान्-मनुष्य असे का म्हटले आहे ते पाहिले पाहिजे. माणूस म्हणून जो जन्माला आला त्याला मुक्तीचा अधिकार आहे असे श्रीमहाराज म्हणत असत. येथे माणूस असा उल्लेख करताना नारदांनी भक्तीसाठी जात, लिंग, वर्ण, वय, संपत्ती, सामाजिक दर्जा यांसारखी कोणतीही अट सांगितलेली नाही. कोणीही माणूस भक्ती करू शकतो आणि एकनिष्ठ भक्ताला मुक्ती देणे हा भगवंताचा स्वभावधर्म आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. "अपि चेत् सुदुराचारो भजते माम् अनन्यभाक्। साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः॥" भगवद्गीता ९.३०॥ असे भगवंतानीही म्हटलेले आहे म्हणून नारदांनी येथे वापरलेला पुमान् म्हणजे माणूस हा शब्द योग्य आहे. नारद फक्त मनुष्यासंबंधीच सांगत आहेत. पण मधुसूदन सरस्वती म्हणतात की सर्व जीवांना मुक्तीचा अधिकार आहे. प्रपन्नगीतेमध्ये भक्त परमेश्वराची प्रार्थना करीत आहे की "कीटेषु पक्षिषु मृगेषु सरीसृपेषु। रक्षः पिशाच मनुजेष्वपि यत्र यत्र। जातस्य मे भवतु केशव त्वत्प्रसादात्। त्वय्येव भक्तिरचलाऽव्यभिच्यारिणी च॥" भक्त भगवंताची प्रार्थना करीत आहे की कीटक, पक्षी, प्राणी, सर्प, राक्षस, पिशाच, माणूस अशा कोणत्याही योनीमध्ये मला जन्म प्राप्त झाला तरी हे केशवा तुझ्या कृपेने माझी तुझ्यावरील भक्ती दृढ आणि एकनिष्ठ राहू दे. भक्त सिद्ध आणि अमृत झाला की त्याला अशी प्रार्थना करावी लागत नाही पण त्या पदाला पोचेपर्यंत मात्र "त्वय्येव भक्तिरचलाऽव्यभिचारिणी च" असेच कोणताही साधक मागेल.

**सिद्धो भवति** - सिद्धमधे मूळ सिध् हा धातु आहे. त्याचे सिद्ध हे भूतकालवाचक धातुसाधित होते. सिद्ध शब्दाचे कोशामध्ये अनेक अर्थ दिलेले आहेत. उदाहरणार्थ, ठराविक प्रक्रियेनंतर रसायन किंवा औषध सिद्ध होते. परमप्रेमरसात भिजलेला भक्त सिद्ध होतो. स्वयंपाक शिजवून खाण्यासाठी योग्य झाला की स्वयंपाक सिद्ध झाला म्हणतात. रामकृष्ण परमहंसांनी म्हटले आहे की साधक प्रथम बैरलेल्या तांदुळांसारखा असतो. म्हणजे अहंकार नाहीसा झालेला नसल्याने तो कठीण असतो. पण भगवंताच्या भेटीची तळमळ लागली, ध्यास लागला आणि केवळ आपल्या प्रयत्नाने भगवंत भेटणे शक्य नाही अशी खात्री झाली की अहंकार नाहीसा होऊन तो भगवंताला शरण जातो आणि

पश्चात्तापाच्या उष्णतेने तो चांगल्या शिजलेल्या भातासारखा सिद्ध-नरम होतो. सिद्ध झालेला भक्त नम्र असलाच पाहिजे. त्याचे अंतःकरण लोण्यासारखे मऊ होते. सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी तो नम्र होतो. अवघ्या जगात एका भगवंताबाचून दुसरे काही त्याला दिसत नाही. ज्ञानेश्वर महाराज सांगतात, "जें जें भेटे भूत। तें तें मानिजे भगवंत। हा भक्तियोगु निश्चित। जाण माझा॥" ज्ञानेश्वरी १०.११८॥

ज्यांना तपश्चर्येमुळे वा योगसाधनेमुळे लघिमा, गरिमा यांसारख्या अष्टसिद्धी प्राप्त होतात त्यांनाही सिद्ध म्हणतात. पण सिद्धो भवति म्हणताना येथे नारदांना हा अर्थ अभिप्रेत नाही. भक्तांना साधनकालात या सिद्धी प्राप्त झाल्या तरी ते त्यांना ध्येयप्राप्तीमधील अडथळा मानून त्यांच्यापासून दूर राहातात. आमच्याकडून सेवा घ्या म्हणून त्या भक्तांच्या मागे लागतात. सिद्धींच्या मोहाला साधक बळी पडला तर काही काळ त्याला लोकमान्यता मिळते. सिद्धींचा उपयोग आपण स्वार्थासाठी न करता लोकांचे आजार, दैन्य, दारिद्र्य दूर करण्यासाठीच करतो आहोत असे तो आपल्या कृतीचे समर्थनही करतो. पण साठलेली संपत्ती संपते त्याप्रमाणे साधनामुळे प्राप्त झालेल्या या शक्तीही नाहीशा होतात आणि साधकाची आध्यात्मिक दृष्ट्या दीनवाणी अवस्था होते. अशा स्थितीत तो स्वतःशी प्रामाणिक असेल तर आपली चूक समजून पुन्हा भगवंताकडे वळतो आणि प्रामाणिक नसेल तर भोंदूगिरी करून उत्तरोत्तर हीन अवस्थेत जातो. शिष्याची अशी स्थिती होऊ नये म्हणून गुरु त्याला वेळोवेळी जागे करतात. पण शिष्य मात्र गुरुआज्ञेचे पालन करण्याविषयी तत्पर असला पाहिजे. श्रीमहाराज म्हणाले की एक घोडा रस्त्याने जाताना एका विशिष्ट ठिकाणी बुजत असे, म्हणून घोडेस्वाराने एक युक्ती केली. ते ठिकाण येण्यापूर्वीच त्याने घोड्याला टाच मारली. घोडा भरधाव निघाला आणि ज्या ठिकाणी तो बुजत असे ते ठिकाण लक्षात न येताच तो पुढे निघून गेला. त्या घोडेस्वाराप्रमाणे मीही माझा शिष्य सिद्धी प्राप्त होण्याच्या टप्प्यावर आला की त्याच्या साधनाला असा वेग देतो की आपल्याला सिद्धी प्राप्त झाल्या याचा त्याला पत्ताही लागत नाही.

समर्थ रामदासांनी माणसांचे बद्ध, मुमुक्षु, साधक व सिद्ध असे चार विभागात वर्गीकरण केले आहे. यांपैकी बद्ध हा भोगवासनांनी बांधलेला असतो. परमेश्वराचा विचारही त्याच्या मनात कधी येत नाही. मी खरा आहे, जग खरे आहे आणि हे जग माझ्या उपभोगासाठी आहे अशी त्याची धारणा असते. पण

दुर्दैवाने त्याच्यावर संकटे कोसळली तर संसारदुःखांनी आणि तापत्रयांनी पोळलेला बद्ध या संसारात सुख नाही असा निश्चय होऊन, दुसरीकडे कोठे सुख आहे का? दुःख निवृत्तीचा काही मार्ग आहे का? याचा शोध घेऊ लागतो. काही बद्ध इतरांची दुःखे पाहूनही हा शोध घेऊ लागतात. संसारबंधनातून सुटावे आणि मोकळे व्हावे असे वाटू लागले की बद्धाचा मुमुक्षु होतो. यानंतर संत आणि सद्ग्रंथ यांचा शोध घेऊन त्यांच्या शिकवणुकीनुसार मनापासून साधन करू लागला की तो साधकदशेकडे वाटचाल करू लागतो. ज्याला ईश्वरदर्शन अथवा आत्मज्ञान झाले आहे पण अद्यापि ते हुकमी आणि स्थिर झालेले नाही त्याला समर्थांनी साधक म्हटले आहे, तथापि असा श्रेष्ठ साधक होण्यापूर्वी मुमुक्षूला खूप साधन करावे लागते. सुरुवातीला असे होते की ध्येय ठरलेले असते पण साधन जमत नाही कारण पुरेसे वैराग्य आलेले नसल्यामुळे प्रपंचही महत्त्वाचा वाटतो. सत्संगतीमुळे साधन करावे अशी तळमळ निर्माण होऊ लागली की प्रपंचाचे महत्त्व कमी होऊ लागते. उत्तरोत्तर ही तळमळ इतकी वाढते की जगात ध्येयप्राप्तीखेरीज दुसरे कशालाही महत्त्व राहात नाही. गुरुदेव रानडे अलाहाबादला युनिव्हर्सिटी प्रोफेसर होते तेव्हा डॉ. राधाकृष्णन् एका कॉन्फरन्ससाठी अलाहाबादला गेले होते. कॉन्फरन्सच्या ठिकाणी त्यांना सकाळी साडेनऊ वाजता जावयाचे होते म्हणून त्यापूर्वी ते गुरुदेवांना भेटायला त्यांचे घरी गेले. ते गेले त्यावेळी गुरुदेव आत एका खोलीत जप करत बसले होते म्हणून ते दिवाणखान्यात थांबले. जप करताना गुरुदेवांना कोणी हाक मारीत नसे. डॉ. राधाकृष्णन् थोडा वेळ तेथे थांबले व त्यांना उठवू नका, माझ्यापेक्षा त्यांचा जप महत्त्वाचा आहे असे म्हणून कॉन्फरन्सला गेले. नंतर गुरुदेवांना हे सांगितल्यावर ते म्हणाले, बरोबर, महाराजांनी सांगितलेला जप इतर कशाहीपेक्षा महत्त्वाचा आहे. ''बळेंचि अवघा त्याग कीजे। म्हणौनि साधक बोलिजे।'' असे समर्थांनी म्हटले आहे. भगवद्दर्शनात साधक स्थिर झाला की तो सिद्ध होतो. नारदांनी सांगितलेला सिद्धही सर्वकाळ ईश्वराशी जोडलेला असतो. ''संशयरहित ज्ञान। तेंचि साधूचें लक्षण। सिद्धाआंगीं संशय हीन। लागेल कैसा।'' असे समर्थांनी दासबोधात म्हटले आहे. ज्ञान कशाला म्हणावयाचे? ते सांगतात ''ऐक ज्ञानाचें लक्षण। ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान। पाहावें आपणासि आपण। या नांव ज्ञान॥''

**अमृतो भवति** - मागे तिसऱ्या सूत्रात भक्ति अमृतस्वरूपा आहे, अमर आहे असे सांगितले. या सूत्रात पराभक्ती सिद्ध झालेला भक्त अमृत होतो म्हटले

आहे. समुद्र मंथनातून निघालेल्या चौदा रत्नांपैकी अमृत हे एक रत्न होते. त्याचे प्राशन करणारा अमर होतो याचा अर्थ त्याची मृत्यूची भीती नाहीशी होते. हे मधुर पेय कितीही घेतले तरी आणखी घ्यावे असे वाटते आणि ते घेणारा अखंड आनंदात निमग्न असतो. भक्त अमृत होतो याचा अर्थ तो आतबाहेर प्रेममय झालेला असतो. त्याच्या दृष्टीमध्ये प्रेम असते, वाणीमध्ये प्रेम असते. त्याच्या स्पर्शाने, त्याच्या बोलण्याने किंवा त्याच्या केवळ पहाण्याने समोरच्या माणसाचे अस्वस्थ मन शांत होते. हा संतांचा गुण आहे. कडक उन्हातून विशाल वटवृक्षाच्या सावलीत जाणारा वाटसरू जसा थंड होतो तसे संसारतापाने त्रस्त झालेले लोक संतांजवळ गेले की केवळ त्यांच्या सान्निध्यानेच शांत होतात. "तुका म्हणे सुख पराविया सुखें। अमृत हें मुखीं स्रवतसे॥" दुसऱ्यांच्या सुखामुळे संत सुखी होतात, तसे दुःखी जीव पाहिले की त्यांच्या दृष्टीतून करुणा पाझरते आणि मग धीर देणारे शब्द त्यांच्या तोंडातून येतात. म्हणून संतांविषयी ज्ञानेश्वर महाराज सांगतात, "पुढां स्नेह पाझरे। मागां चालती अक्षरें। शब्द पाठीं अवतरे। कृपा आधीं ॥१३.२६३॥ ...तैसें साच आणि मवाळ। मितले आणि रसाळ। शब्द जैसे कल्लोळ। अमृताचे" ॥१३.२७०॥ त्यांचे बोलणे सत्य आणि मृदु, मोजके आणि रसपूर्ण असते. जणू काही ती अमृताची लहरच असते. म्हणून संतांची संगत मिळणे म्हणजे अमृताची प्राप्ती होणे होय. भक्त सिद्ध झाला की तो स्वतः अमृत बनतो, संतपदवीला पोचतो.

**तृप्तो भवतिः** - तृप्त हे तृप् धातूचे भूतकालवाचक धातुसाधित आहे. सगळ्या जीवनाचे मर्म तृप्तीत आहे. माणूस अपूर्ण आहे पण त्याची पूर्णत्वाकडे ओढ आहे. भुकेल्या माणसाची अन्नाने तृप्ती होते. देहबुद्धीच्या भूमिकेवरचा हा तृप्तीचा अनुभव तात्पुरता असला तरी तृप्तीचा अनुभव म्हणून महत्त्वाचा आहे. दृश्य जगतात माणसाची पूर्णत्वाची ओढ वासनांच्या रूपाने अवतरते. अमुक मिळाले की मी पूर्ण होईन, सुखी होईन असे माणसाला वाटते. ईश्वर पूर्ण आहे म्हणून आनंद आहे. माणूस ह्या पूर्णत्वाच्या, आनंदाच्या शोधात असतो. बाह्य विषय कितीही मिळाले तरी स्वभावतःच ते अपूर्ण असल्यामुळे त्यातून पूर्णता येणे शक्य नाही हे ठसले की माणूस अंतर्मुख होतो आणि साधनात तो जसजसा प्रगत होतो तसतसा हा आनंद, ही पूर्णता बाहेरून आणावयाची नसून आपल्या आतच आहे याचा त्याला अनुभव येऊ लागतो. शेवटी भगवंताची कृपा होऊन भगवंताच्या दर्शनात म्हणजेच आत्मदर्शनात तो

स्थिर झाला की पूर्ण होतो, तृप्त होतो, कृतकृत्य होतो. त्याची वासनांची धाव समूळ नाहीशी झालेली असते. असा भक्त शांतीचा, तृप्तीचा महासागर होतो. आता काहीही मिळवावयाचे राहिलेले नसते. मग प्रारब्धवशात् दुःखाचे प्रसंग आले तरी त्याची तृप्ती, शांती ढळत नाही. भगवद्गीता सांगते, "यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः। यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते" ॥६.२२॥ (परमात्मप्राप्तिरूप लाभ झाल्यामुळे त्याहून अधिक दुसरा कोणताही लाभ तो मानीत नाही आणि परमात्मप्राप्तिरूप अवस्थेत असलेला तो फार मोठ्या दुःखानेही विचलित होत नाही.)

## सूत्र पाचवे

**यत्प्राप्य न किञ्चिद्वाञ्छति न शोचति न द्वेष्टि न रमते नोत्साही भवति ॥५॥ यत्=जे (परमप्रेम) प्राप्य=मिळाले असता. न किंचित् वांछति=कशाचीही थोडीसुद्धा इच्छा करीत नाही. न शोचति (कोणत्याही कारणास्तव) शोक करीत नाही. न द्वेष्टि= (कोणाचाही) द्वेष करीत नाही. न रमते=(कोणत्याही लौकिक गोष्टींमध्ये) रमत नाही-आसक्त होत नाही. न उत्साही भवति= (कोणत्याही गोष्टीचा) हव्यास धरीत नाही.**

**भगवंताच्या परमप्रेमाचा लाभ झाल्यानंतर तो श्रेष्ठ भक्त कोणत्याही वस्तूची इच्छा करीत नाही, कशाचाही शोक करीत नाही, (कोणाचाही) द्वेष, वैर करीत नाही, कोणत्याही (लौकिक) गोष्टींमध्ये रमत नाही-आसक्त होत नाही आणि (विषयभोगांच्या प्राप्तीचा) हव्यास धरीत नाही.**

**विवरण : यत् प्राप्य -** चौथ्या सूत्रात परमप्रेमाचा लाभ झालेल्या भक्ताची अवस्था सांगितली आहे. त्या सूत्रात लब्ध्वा ह्या लभ् धातूच्या भूतकालवाचक धातुसाधिताची योजना करून परमप्रेमाचा लाभ होणे भक्ताच्या साधनापेक्षा भगवंताच्या कृपेवरच जास्त अवलंबून असते हे नारदांनी स्पष्ट केले आहे. परमप्रेम लाभल्यावर भक्त व्यवहारात कसा वागतो ते या सूत्रात सांगितले आहे. त्यामुळे साधकाने अभ्यास कसा करावा याचे मार्गदर्शनही या सूत्रात मिळते. मागच्या सूत्रात भक्तीचे पर्यवसान काय होते ते सांगितले आहे तर प्रस्तुतचे सूत्र अभ्यासासाठी आहे. या सूत्रातील शब्द योजनेवर भगवद्गीतेच्या १२ व्या अध्यायातील १७ व्या श्लोकाचा प्रभाव दिसतो. तेथे भगवंत म्हणतात. "यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति। शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे

प्रियः ।।'' म्हणजे जो (कधी) हर्षित होत नाही, (कोणाचाही) द्वेष करीत नाही, (कशाचाही) शोक करीत नाही (व) कसलीच कामना करीत नाही, जो शुभ अथवा अशुभ अशा सर्व कर्मांच्या फलांचा त्याग करतो (असा) तो भक्तियुक्त मनुष्य मला प्रिय आहे. आपण पाहिले की वासनांचा उगम आपल्या अपूर्णतेच्या जाणिवेत आणि अहंकारात आहे. पूर्ण वासनारहित व पूर्ण निःस्वार्थी झालेला भक्त काय करतो, कसा वागतो ते या सूत्रात सांगितलेले आहे.

**न किञ्चित् वाञ्छति** - किंचिदपि न वांछति म्हणजे कोणतीही किंवा कोणत्याही वस्तूची इच्छा करीत नाही असे सर्वसाधारणपणे म्हणता येईल. तथापि इच्छा आणि वांछा यांमध्ये थोडा फरक आहे. आपल्या चित्तामध्ये सतत वृत्तींचा प्रवाह चालू असतो. यापैकी काही वृत्तींमध्ये काही मिळावे असे वाटत असते तर काही वृत्तींमध्ये काही तरी टळावे असे वाटत असते. सुख मिळावे आणि दुःख टळावे असे वाटते. श्रीमहाराज या वासनांना हवे - नकोपण म्हणतात. माणसाच्या प्रत्येक वासनेचे कृतीत रूपांतर होतेच असे नाही. चित्तातून एखादी वृत्ती उठते पण पुढच्याच क्षणी ती क्षीण होते. काही वृत्ती मात्र बळकट असतात. त्या माणसाचा ताबा घेतात. म्हणजेच वृत्तीचे उर्मीमध्ये रूपांतर होते व ती उर्मी क्षीण झाली नाही अथवा प्रयत्नपूर्वक दाबता आली नाही तर माणसाकडून प्रत्यक्ष कृती होते. वांछा म्हणजे केवळ इच्छा नसून त्या इच्छेमध्ये तळमळ असते. अमुक मिळाले की मी सुखी होईन असे वाटून त्याची तळमळ लागते, त्याशिवाय चैन पडेनासे होते. ज्याला भगवंताचे परमप्रेम मिळाले त्याच्या ठिकाणी कोणत्याही गोष्टीविषयी तळमळ किंवा तीव्र इच्छा निर्माण होत नाही. कारण भगवंताच्या प्रेमापुढे बाकीच्या सर्व गोष्टी त्याला तुच्छ, कःपदार्थ वाटू लागतात.

श्रीमहाराजांचे एकनिष्ठ भक्त श्री. भाऊसाहेब केतकर यांना तुम्हाला देवाचे दर्शन व्हावे असे वाटत नाही का असा प्रश्न केल्यावर ते म्हणाले, ''महाराज भेटले, आतां काय मिळवायचं राहिलं आहे!'' हे न किंचित् वांछति. मी नाम घेतो; आता काही मिळवायचे राहिले नाही असे वाटले पाहिजे. यालाच गीता कृतकृत्य म्हणते. जे करायचे होते ते करून झाले. आता करायचे असे काही राहिले नाही. साधकाने असे वागायला शिकले पाहिजे. एकदा गुरूंच्या किंवा ईश्वराच्या पायांवर डोके ठेवले की माझे काम झाले असे वाटले पाहिजे. हीच खरी निष्ठा. ''तुम्हीं घ्यावें नाम, करीन तुमचें काम'' असे आश्वासन श्रीमहाराजांनी दिले आहे. म्हणून तुम्ही मला ज्या स्थितीत ठेवले आहे ते

तुमच्या इच्छेने आहे. ती अप्रतिम स्थिती आहे; याच्यापेक्षा चांगली स्थिती असणे शक्य नाही असे वाटले पाहिजे. भोक्तेपण जाण्यासाठी प्रथम कर्तेपण गेले पाहिजे. कर्ता मी नाही. कर्ता माझा गुरु अथवा भगवंत आहे असे वाटू लागले की अहंकार क्षीण होतो. तसे पाहिले तर अहंकार कमी झाल्याखेरीज माणसाला मी कर्ता नाही असे वाटत नाही. म्हणून कर्तेपण जाणे आणि अहंकार क्षीण होणे या दोन्ही गोष्टी परस्परावलंबी आहेत. ईश्वराच्या दर्शनातच शाश्वत सुख आहे हा भाव वैराग्याखेरीज येत नाही. म्हणून न किंचित् वांछतिमध्ये वैराग्याचा अंतर्भाव आहे. वैराग्य निर्माण झाले म्हणजे भोगवस्तूंविषयी किंचित् म्हणजे थोडीदेखील तळमळ, इच्छा राहात नाही.

**न शोचति** - यात मूळ धातु शुच् म्हणजे शोक करणे हा आहे. न शोचति म्हणजे शोक करीत नाही. पूर्वी उल्लेख केलेल्या गीतेच्या १२ व्या अध्यायातील १७ व्या श्लोकातही हेच पद आहे. वर्तमानकाळातील अप्रिय गोष्टींबद्दल माणूस दुःख करतो, भविष्यात काय घडेल याची चिंता करतो आणि भूतकाळात होऊन गेलेल्या गोष्टींबद्दल शोक करतो. म्हणजे माणसाच्या दुःख, चिंता आणि शोक या भावना काळाशी निगडित आहेत. साधक भक्तीमध्ये जसजसा प्रगत होत जातो तसतशी त्याची देहबुद्धि कमी होऊ लागते, आणि काळाचाही विसर पडू लागतो. देहाचा आणि काळाचा विसर पडू लागला की होऊन गेलेल्या गोष्टींनी तो व्यथित होत नाही. जे घडून गेले ते शोक केल्याने बदलत नाही. म्हणून कृष्णमूर्ती म्हणतात की माणूस विनाकारण भूतकाळाचे ओझे स्वतःवर लादून घेतो. समर्थ रामदास म्हणतात :

मना मानसीं दुःख आणूं नको रे। मना सर्वथा शोक चिंता नको रे।

विवेकें देहेबुद्धि सोडूनि द्यावी। विदेहीपणें मुक्ति भोगीत जावी॥ मनाचे श्लोक-१२

मी कर्ता आहे, मी देह आहे या कल्पनांचा विवेकपूर्वक त्याग केला की भक्त स्थलकालनिमित्ताच्या पलीकडे जातो. तो जीवन्मुक्त होतो. साहजिकच त्याचा भूतकाल कसाही असला तरी त्याला त्याचा लेप होत नाही. मग शोक कशाचा करणार? पापी माणसाला श्रीमहाराज सांगत की आजपर्यंत झालेले पाप श्रीरामाच्या चरणी वाहा आणि पुन्हा असे करणार नाही अशी शपथ घे; तुझ्या पूर्वीच्या पापाची जबाबदारी मी घेत आहे.

शोक व पश्चात्ताप यांमध्ये फरक आहे. होऊन गेलेल्या दुःखद घटनांचा माणूस शोक करतो तर पश्चात्तापामध्ये सुधारणेचे बीज असते. ख्रिश्चन धर्मात

पश्चात्ताप महत्त्वाचा मानतात. करू नये ते केले, वागू नये तसा वागलो, बोलू नये ते बोललो असे तीव्रतेने वाटू लागले, म्हणजेच पश्चात्ताप झाला आणि माणूस सत्पुरुषाला शरण गेला तर तो सत्पुरुष त्याला सुधारणेचा मार्ग दाखवतो. पश्चात्ताप झालेला माणूस भगवंताची अनन्यभावाने भक्ती करू लागतो आणि वाल्या कोळ्याचा वाल्मीकि ऋषी होतो. पश्चात्तापाचे महत्त्व ज्ञानेश्वर महाराज सांगतात. "यालागीं दुष्कृती जऱ्ही जाहला। तरि अनुतापतीर्थीं न्हाला। न्हाऊनि मजआंतु आला। सर्वभावें॥ तरि आतां पवित्र तयाचेंचि कुळ। अभिजात्य तेंचि निर्मळ। जन्मलेया फळ। तयासीच जोडलें॥ ज्ञानेश्वरी ९.४२०,२१॥ अनुतापरूपी तीर्थात ज्याने स्नान केले त्याला नंतर शोकही उरत नाही. मग इहलोकीचे अथवा स्वर्गातले भोग मिळावे, किंबहुना मोक्ष मिळावा अशीही इच्छा राहात नाही. भगवंताची इच्छा तीच माझी इच्छा, त्यातच आपले हित आहे असा त्यांचा दृढनिश्चय झाला की जे जे घडते ते ते परमात्म्याची लीला आहे असे लक्षात येऊन ते सर्वकाळ संतुष्ट असतात. शोक, मोह, लोभ, द्वेष इत्यादी भावांना वा विकारांना त्यांच्या पवित्र हृदयांत थारा मिळत नाही.

**न द्वेष्टि** - यामध्ये मूळ धातु द्विष् आहे. याचा अर्थ द्वेष करणे. द्वेषाचे मूळ स्वार्थ आहे. स्वार्थामुळे स्पर्धा निर्माण होते. व्यवहारात जोपर्यंत स्पर्धा निरोगी असते तोपर्यंत म्हणजेच काही मर्यादेपर्यंत स्पर्धा समाजाच्या प्रगतीला हितकारक ठरते. पण त्यातूनच पुढे स्पर्धा करणाऱ्यांच्या मनात एकमेकांविषयी असूया आणि नंतर द्वेष निर्माण होतात. अशा प्रकारे केवळ व्यवहारातच स्पर्धेतून द्वेष निर्माण होतो आणि वाढतो असे नाही; परमार्थातही साधकांना एकमेकांबद्दल द्वेष वाटू लागतो. आज अनेक संतमहंतांचे आखाडे पाहिले तर त्यांच्यामध्ये परस्परांबद्दल प्रेम वाटणे दूरच राहो, उलट द्वेष असतो. कुंभमेळ्यात स्नानाला कोणत्या आखाड्यातील साधूंनी आधी जावयाचे यावरूनही त्यांच्यामध्ये मारामाऱ्या होतात. प्रेमाप्रमाणे द्वेषालाही शक्ती लागते. म्हणून शक्तिसंचय झाला आणि स्वार्थ व अहंकार क्षीण झालेले नसले तर द्वेष वाढू लागतो.

नारद भगवंताचे प्रेम ज्यांना लाभले अशा भक्तांविषयी सांगत आहेत. ज्यांना सर्व भूतमात्रांच्या ठिकाणी भगवंत दिसू लागला त्यांना सर्वांविषयी प्रेमच वाटते. साहजिकच असा भक्त कोणाचाही द्वेष करीत नाही. "निज प्रभुमय देखहिं जगत, का सन करहिं विरोध॥" परमार्थातही कोणाला पुढे न्यावयाचे

कोणाला मागे ठेवावयाचे हे परमात्मा ठरवतो. जे आपले आहे ते आपणाला मिळणारच अशी त्याची खात्री असते. त्यामुळे तो कोणाचा द्वेष करीत नाही आणि कशाचा शोक करीत नाही. "पैं आपुलें जें साचें। तें कल्पांतींही न वचे। हें जाणोनि गताचें। न शोची जो॥" ज्ञानेश्वरी १२.१९२॥ त्यामुळे तो भगवत्प्रेमात तल्लीन होतो.

**न रमते** - यामध्ये मूळ धातु रम् आहे. याचा अर्थ आनंदित होणे, उल्हसित होणे किंवा रंगणे असा आहे. आपल्याला ज्याची आवड असते त्यामध्ये आपले मन सहज रमते. उदाहरणार्थ, संगीताची आवड असणारा माणूस चांगले गाणे ऐकताना त्यात रंगून जातो. ज्याला भगवंताचे परमप्रेम लाभले, जो नामस्मरणात रंगून गेला त्याचे मन विषयभोगात रमत नाही. "रामरसाचिया चवी, आनरस रुचे केवी।" अशी त्याची अवस्था होते. ज्याच्या वासना क्षीण झालेल्या नाहीत तोच सुखदु:खाचे हेलकावे खात असतो. शाश्वत सुखाचे अमृत ज्याने चाखले त्याचा जीव इतर कशातही रमत नाही.

**नोत्साही भवति** - भगवंताचे परमप्रेम लाभलेला भक्त इतर कशानेही उत्साहित किंवा उत्तेजित होत नाही. वास्तविक तो इतर लोक ज्या जगात राहातात त्याच जगात राहातो. पण इतर लोकांना जसा धन, मान, सत्ता इत्यादींचा हव्यास असतो तसा त्याला या गोष्टींचा हव्यास राहात नाही. कारण या गोष्टींची अनित्यता व व्यर्थता त्याला पटलेली असते आणि या सर्वांपेक्षा श्रेष्ठ असलेल्या प्रेमाचा त्याला लाभ झालेला असतो. जोपर्यंत माणूस लौकिक वासनांमध्ये गुंतलेला असतो तोपर्यंत त्या वासना तृप्त करण्यासाठी तो धडपडत असतो. मी कर्ता आहे असे त्याला वाटत असते. त्यामुळे पाहिजे त्या गोष्टी मिळविण्यासाठी तो धैर्याने आणि उत्साहाने खटपट करत असतो व त्या गोष्टी मिळाल्या की त्यांचा उपभोग घेताना तो उल्हसित होतो. सात्त्विक कर्त्याचा कर्तृत्वभाव नाहीसा झाल्यावर फलाशारहित कर्म करतांना उत्साह असतोच पण परमप्रेमाची प्राप्ती झाल्यावर त्याचा कोणत्याही गोष्टीविषयी हव्यास राहात नाही. श्रीज्ञानेश्वर महाराज अशा भक्तीची स्थिती सांगतात :

"जो आत्मालाभासारिखें। गोमटें कांहींचि न देखे।
म्हणोनि भोगविशेखें। हरिखेजेना॥
आपणचि विश्व जाहला। तरि भेदभावो सहजचि गेला।
म्हणोनि द्वेषु ठेला। जया पुरुषा॥

पैं आपुलें जें साचें। तें कल्पांतींही न वचे।
हें जाणोनि गताचें। न शोची जो॥
आणि जयापरौतें कांहीं नाहीं। तें आपणपेंचि आपुलां ठायीं।
जाहला यालागीं जो कांहीं। आकांक्षी ना॥ ज्ञानेश्वरी १२.१९० ते १९३

## सूत्र सहावे

**यज्ज्ञात्वा मत्तो भवति, स्तब्धो भवति, आत्मारामो भवति ॥६॥**

**यत् ज्ञात्वा= जे (परमप्रेम) जाणले असता. मत्तो भवति= मस्त होतो. स्तब्धो भवति= स्तब्ध (मूक) होतो. आत्मारामो भवति= आत्मसुखात मग्न होतो.**

**(भक्तीमध्ये ज्ञानाचाही समावेश होतो. भक्तीला ज्ञानाचे अधिष्ठान असावे लागते असे काही आचार्यांचे मत आहे. भक्ती ज्ञानविरोधी नसते. भक्तिशुद्ध चित्तात ज्ञान प्रगटते. म्हणून नारद या सूत्रात सांगतात की) ज्याने परमप्रेम जाणले आहे असा भक्त त्या भक्तीमध्ये मस्त होतो, मौन होतो आणि आत्मसुखामध्ये मग्न होतो.**

**विवरण:** चौथ्या सूत्रातील सिद्ध, तृप्त या भूतकालवाचक धातुसाधितांप्रमाणे ह्या सूत्रातही मत्त, स्तब्ध या भूतकालवाचक धातुसाधितांची योजना नारदांनी केली आहे. पाचव्या सूत्रात भक्ताच्या क्रियेवर भर दिलेला आहे तर चौथ्या आणि सहाव्या सूत्रात भक्तीचे पर्यवसान सांगितलेले आहे.

ज्ञानमार्गाने जाण्यासाठी अशाश्वत आहे ते बाजूला सारून साधकाला साधनचतुष्टयसंपन्न व्हावे लागते. त्यामुळे अशा अधिकारसंपन्न निवडक माणसानाच ज्ञानमार्ग शक्य होतो. पण श्रीमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे माणूस म्हणून जन्माला आलेल्या प्रत्येकाला भक्तीचा अधिकार आहे. भक्ताला सर्व जग ईश्वरमय दिसू लागते. सगुणोपासनेने व नामस्मरणाने चित्त शुद्ध झाले, आपल्या आणि इतरांच्या जीवनात जे जे घडते ते ते भगवंताच्या अथवा सद्गुरूंच्या इच्छेने घडते हे मनात ठसले की आत्मवत् सर्वभूतेषु अशी त्याची अवस्था होते. तो सर्वांच्या हृदयातील भगवंत पाहू लागतो. गोस्वामी तुलसीदास म्हणतात, "सीय राममय सब जग जानी। करउँ प्रनाम जोरि जुगपानी॥" सर्व जगात भगवंतच भरलेला आहे ही जाणीव होऊन भगवंताच्या परमप्रेमाचा लाभ झाला की सुरुवातीला त्या भक्ताची स्थिती कशी होते ते ह्या सुत्रात सांगितलेले आहे.

**मत्तो भवति** - मत्त हे मद् धातूचे भूतकालवाचक धातुसाधित आहे. मत्त म्हणजे झिंगलेला, बेहोष झालेला, Intoxicated. माणूस जेव्हा झिंगतो, बेहोष होतो तेव्हा ती Toxic condition म्हणजे एक प्रकारची विषबाधाच असते. त्यामुळे त्याची शुद्ध जाते. दारूची नशा स्थूल शरीराला व्यापते तर भगवन्नामामृताची नशा सूक्ष्म शरीराला व्यापते. दारूची नशा काही काळानंतर उतरते तर नामाची नशा सर्वकाळ टिकून राहाते. गुरु नानक म्हणतात, ''भांग तमाखू धत्तुरा उतर जात परभात। नाम खुमारी नानका चढी रहै दिनरात।'' म्हणजे भांग, तंबाखू किंवा धोतऱ्याचे बी यांच्या सेवनाने येणारी नशा ते रात्री सेवन केलेले असेल तर सकाळी उतरते. म्हणजे फार थोडा काळ ती टिकते पण नानकाला नामस्मरणाने चढलेल्या नशेची खुमारी (गोडी - hangover) रात्रंदिवस टिकून राहाते. चोवीस तास ते नामामृताच्या नशेत मस्त राहातात. भगवंताच्या प्रेमाने सूक्ष्म शरीर व्यापल्यामुळे भक्ताच्या भावना, कल्पना, विचार, स्मृती इत्यादी सर्व मनोव्यापार प्रियतम भगवंताने अथवा सद्‌गुरूने व्यापलेले असतात. त्यामुळे जगातील लौकिक व्यवहाराकडे त्याचे लक्षच नसते. त्या व्यवहारांचे त्याला आकलनही होत नाही इतका तो भगवत्प्रेमात मस्त असतो. कृष्णदास नांवाचे एक व्यापारी श्रीमहाराजांचे भक्त होते. ते श्रीमहाराजांना नेहमी म्हणत की महाराज, मला नामात मस्त ठेवा. श्रीमहाराजांनाही त्यांची ही प्रार्थना आवडत असे. ह्या बेहोष अवस्थेचे वर्णन करताना तुकाराम महाराज म्हणतात, ''अनुहार्दीं गुंतलों नेणें बाह्य रंग। वृत्ती येतां मग बळ लागे॥'' वृत्ती येतां म्हणजे मन व्यवहारात आणण्यासाठी फार कष्ट होतात. श्रीरामकृष्णांची भावसमाधीत अशीच अवस्था होत असे. आईला (कालीमातेला) ते हाका मारू लागले की तेथे असणाऱ्या कित्येकांना त्यांना वेड लागले आहे असे वाटत असे. ते वेडच पण भगवत्प्रेमाचे दिव्य वेड होते. ज्याला असे वेड लागते तो भाग्यवान! भगवत्प्रेमाचे उधाण आले की भक्ताची दृष्टी वेगळीच होते असे श्रीमहाराज म्हणत. तथापि ही अवस्था पचली की तो भक्त सामान्य माणसासारखाच दिसू लागतो, वागू लागतो. त्यामुळे मग सत्पुरुष ओळखणे अवघड असते. भगवत्प्रेमाचा भर आला की भक्त वेड्यासारखा वागतो मात्र जो वेड्यासारखा वागतो तो भक्तच असतो असा गैरसमज करून घेऊ नये.

भगवंताच्या प्रेमात मस्त झालेल्या भक्ताचे वर्णन कबीरांनी अतिशय समर्पक दोह्यांमध्ये केले आहे. वानगीदाखल येथे काही दोहे देत आहे. ते म्हणतात,

(१) छिनहि चढ़ै छिन उतरै, सो तो प्रेम न होय।
अघट प्रेम पिंजर बसै, प्रेम कहावै सोय॥

भगवत्प्रेमाचा पूर आला की तो ओसरत नाही. भक्त सर्वकाळ त्यामध्ये डुंबत राहातो.

(२) प्रेम प्रेम सब कोइ कहै, प्रेम न चीन्हे कोय।
आठ पहर भीना रहै, प्रेम कहावै सोय॥

(३) जहाँ प्रेम तहँ नेम नहिं, तहाँ न बुधि व्यवहार।
प्रेम मगन जब मन भया, कौन गिनै तिथिबार॥

प्रेमामुळे काळाचे भान नाहीसे झाले की तिथी वार इत्यादींकडे कोण पहाणार?

(४) प्रेम छिपाया ना छिपे, जा घट उपजा होय।
जो पै मुख बोले नहीं, तो नैन देत हैं रोय॥

प्रेमानंदाने उन्मत्त झालेला भक्त मौनात जातो पण त्याच्या डोळ्यातून वाहू लागलेले प्रेमाश्रू त्याचे प्रेम प्रकट करतात.

**स्तब्धो भवति -** स्वस्थ होतो. गती थांबते व मौन होतो. सुरुवातीला परमात्मा केवळ होता. नंतर तो जगत्‌रूपाने प्रकट झाला. केवळ असण्यापासून होणे आणि होण्यापासून पुन्हा असणे ही क्रिया अखंड चालू असते. Being becomes Becoming and Becoming disappears into Being. होणे हे कर्ममय आहे आणि असणे ही स्वाभाविक अवस्था आहे. भगवंताच्या प्रेमाने भक्त मस्त झाला की त्याचे कर्म थांबते. काही करावे अशी इच्छाच त्याला होत नाही. कोणाशी बोलावे असेही वाटत नाही आणि अशा प्रकारे भक्तीचे पर्यवसान मौनात होते. सगळीकडे मीच भरलो आहे असा अनुभव आला की मीच माझ्याशी काय बोलणार? या अवस्थेच्या पुढे जाऊन भक्ती पक्व झाली की सत्पुरुष लोकांना उपदेश करण्यासाठी बोलतात. पण नाथांनी म्हटल्याप्रमाणे तरीही त्यांचे मौन भंगत नाही. त्याला ते महामौन म्हणतात. भक्ती सिद्ध झाली म्हणजे काही करायचे आहे अशी वृत्तीच चित्तातून उठत नाही. हेच स्तब्ध होणे; कृतकृत्य होणे. तो नाम घेतो, तथापि काही करायचे राहिले आहे, मिळवायचे राहिले आहे असे त्याला वाटत नाही. आधीच्या मत्त अवस्थेची स्तब्ध अवस्थेत परिणती होऊन तो त्रिगुणातीत होतो. आणि

**आत्मारामो भवति -** अज्ञान नाहीसे होऊन ज्ञान व्हावे असे माणसास वाटते. त्यामुळे तो ज्ञान मिळविण्यासाठी धडपडत असतो. जगाचे ज्ञान आणि

स्वतःचे ज्ञान असे ज्ञानाचे दोन प्रकार आहेत. जगाचे कितीही ज्ञान मिळाले तरी त्याने पूर्णता येत नाही आणि त्यामुळे समाधानाची प्राप्ती होत नाही. कितीही ज्ञान झाले तरी काहीतरी अज्ञात राहते. स्वच्या ज्ञानाची स्थिती याच्या उलट आहे. स्वच्या ज्ञानात ज्ञेय, ज्ञाता आणि ज्ञान ही त्रिपुटी नाहीशी होते. प्रेमरूपा भक्तीचे पर्यवसान अशा ज्ञानात म्हणजे आत्मज्ञानात होते. पराभक्ती लाभल्यामुळे भक्त मत्त होतो, स्तब्ध होतो व आत्मानंदात बुडून जातो. आत्मारामो भवति.

आराम म्हणजे बाग. बागेत शांतता असते, प्रसन्नता असते. त्यामुळे माणूस अस्वस्थ असला तरी तो बागेत थोडा वेळ बसला तर त्याची अस्वस्थता जाऊन मन प्रसन्न होते. तथापि ही प्रसन्नता तो बागेत असतो तोपर्यंतच टिकते. याच्या उलट भक्ताची बाग, त्याचा आराम त्याच्यामध्येच असतो. त्यामुळे त्याचा संतोष, त्याची प्रसन्नता देहावर अथवा बाह्य परिस्थितीवर अवलंबून नसते. तो आत्म्यातच रमलेला असतो. 'आत्मनि एव आत्मनः तुष्टः' असे स्थितप्रज्ञाचे लक्षण भगवद्गीतेत सांगितलेले आहे. भक्तीचे पर्यवसानही आत्मतुष्टीतच होते आणि भक्त आत्मसुखाच्या अत्यानंदात राहतो. या ब्रह्मैक्यभावाचे वर्णन करतांना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ''जे ऐसेनि सुखें मातले। आपणपांचि आपण गुंतले। ते मी जाणे निखळ ओतले। सामरस्याचे ॥५.१३७॥ ते आनंदाचे अनुकार। सुखाचे अंकुर। कीं महाबोधें विहार। केले जैसे॥५.१३८॥

सारांश, माणसाच्या जीवनाला बुद्धी, वासना आणि प्रेम अशी तीन अंगे आहेत. (१) बुद्धी ज्ञान मिळविण्याची खटपट करते. तथापि जोपर्यंत माणूस दृश्याचे ज्ञान करून घेत असतो तोपर्यंत ते ज्ञान अशाश्वत असल्यामुळे त्यातून माणसाला पूर्ण समाधान मिळू शकत नाही. उदाहरणार्थ, आज लावलेला शोध काही वर्षांनी चुकीचा ठरतो. म्हणून अशा विद्वत्तेला महत्त्व न देता ती बाजूला सारतात. समर्थ रामदास म्हणतात, ''नको शास्त्र अभ्यास व्युत्पत्ति मोठी। चढे गर्व ताठा अभीमान पोटीं॥'' म्हणून भगवंत सांगतात, ''म्हणोनि थोरपण पऱ्हांचि सांडिजे। व्युत्पत्ति आघवी विसरिजे। जैं जगा धाकुटें होइजे। तैं जवळीक माझी॥ज्ञानेश्वरी ९.३७८॥ (२) वासनातृप्तीतून क्षणभर आनंद झाला तरी भोगामुळे वासना निर्मूळ न होता अधिकच फोफावतात. (३) माणसाला प्रेमाचा अनुभव आहे. प्रेमाच्या संबंधात समरसता असते. पण दृश्यातून मिळणारे दृश्याचे प्रेम अपूर्ण असते कारण प्रेमवस्तू अशाश्वत असते. म्हणून

माणसाला प्रपंचात पूर्ण सुख मिळत नाही. अशाश्वत संसाराऐवजी शाश्वत भगवंतावर प्रेम करणे म्हणजे भक्ती. ही भक्ती जेव्हां अनावर होते तेव्हां ती परमप्रेमरूपा किंवा पराभक्ती होते.

प्रेमाची तीन लक्षणे सांगता येतील. प्रेमामुळे माणसाचे अंतःकरण प्रेमवस्तूने भरून जाते. चित्त प्रेममय झाले की स्वप्नेदेखील प्रेमवस्तूचीच पडू लागतात. माणूस स्वकेंद्रित असतो. पण प्रेम अहंकारात शिरले की माझे काहीही होवो पण माझा प्रियतम सुखी राहो असे भक्त म्हणतो. बुद्धी केवळ प्रेमवस्तूचाच विचार करू लागते. माझे वागणे भगवंताला आवडेल ना असा विचार तो करू लागतो. शेवटी बुद्धी भगवद्विचाराने भरून जाते. मग तो जे जे करतो ते ते भगवंतासाठीच करतो. हेच अनुसंधान. अशा रीतीने भक्त भगवत्प्रेमात रंगला की त्याचे पर्यवसान काय होते ते सांगताना नारद म्हणतात की तो तृप्त होतो व त्यामुळे त्याच्या हातून घडणाऱ्या कर्मांमागे कोणतीही वासना नसते. तो पूर्णपणे निर्वासन, सिद्ध होतो म्हणजे पूर्णतेला जातो, ईश्वराशी तादात्म्य पावतो. मग भगवंताची इच्छा तीच त्याची इच्छा होते. त्याचे कालाचे भान नाहीसे होते, वासना शांत झाल्यामुळे प्रवृत्ती नाहीशी होते, भोगांचा हव्यास राहात नाही व तो अखंड भगवंताच्या अनुसंधानात राहातो.

अशा प्रकारे या सुरुवातीच्या सहा सूत्रांत नारदांनी पराभक्तीची व्याख्या करून ती साध्य झाल्यावर तिचे पर्यवसान काय होते ते सांगितले आहे. यानंतर ७ ते १४ या सूत्रांच्या दुसऱ्या अधिकरणात त्यांनी पराभक्तीचे स्वरूप सांगितले आहे.

## १.२ : परमभक्तीचे स्वरूप - अनन्यता

### सूत्र सातवे

**सा न कामयमाना निरोधरूपत्वात् ॥७॥**

**सा= ती (पराभक्ति). न कामयमाना= कामनांना, विषयवासनांना पोषक नसणारी. निरोधरूपत्वात्= अटकाव करणारी असल्यामुळे.**

**ती (परमप्रेमरूपा पराभक्ती) विषयवासनांना पोषक नसून उलट त्यांना अटकाव करणारी आहे. म्हणजेच विषयवासनांना अटकाव करत असल्यामुळे ती त्यांना पोषक नाही.**

**विवरण :** पहिल्या सहा सूत्रांत नारदांनी भक्तीची व्याख्या करून पराभक्ती साध्य झाल्यावरची भक्ताची अवस्था व अशा भक्तीचे पर्यवसान सांगितले. आता अशा भक्तीमध्ये काय नसते ते सांगत आहेत.

इच्छा नाहीत असा माणूस नाही. अमुक व्हावे आणि तमुक टळावे असे माणसाला वाटत असते. माणसाच्या या हवेनकोपणातून कर्म निर्माण होते. बरेच वेळा या हवेनकोपणातूनच माणूस परमेश्वराकडे वळतो. उदाहरणार्थ, आलेले संकट टळले तर किंवा हाती घेतलेल्या कामात यश मिळाले तर सत्यनारायण करीन असे तो म्हणतो. त्याच्या इच्छेप्रमाणे घडते तोपर्यंत त्याचा ईश्वरावर विश्वास असतो. ईश्वराच्या कृपेमुळे आपले काम झाले असे त्याला वाटते. पण त्याच्या मनाविरुद्ध गोष्टी झाल्या की ईश्वर खोटा असे तो म्हणू लागतो. खरोखर माणसाच्या क्रममुक्तीमध्ये हाही एक टप्पा असतो. कारण अशा प्रकारच्या सकाम भक्तीतून माणूस खऱ्या निष्काम भक्तीकडे वळतो. कितीही मागितले आणि ते मिळाले तरी समाधान होत नाही हे काही काळाने त्याच्या लक्षात येते. आणि मग आज असणारे आणि उद्या नसणारे काहीतरी मागत न रहाता ईश्वराकडे शाश्वत सुख मागावे असे त्याला वाटू लागते. म्हणून ह्या सूत्रात पराभक्तीमध्ये सकाम भक्तीतील काम म्हणजे इच्छा नसते हे स्पष्ट केले आहे. सकाम भक्तीचे निष्काम भक्तीमध्ये आपोआप रूपांतर होत नाही. त्यासाठी भक्ताला प्रयत्न करावे लागतात. या प्रयत्नानाच निरोध म्हटले आहे. निरोध म्हणजे रोखणे, आवरून धरणे, त्याग करणे किंवा दाबणे. इच्छापूर्तीतून खरे समाधान मिळत नाही याची खात्री झाल्यावर भक्त मनात येणाऱ्या इच्छांना, वासनांना आवर घालण्याचा अभ्यास करतो. या अभ्यासात कष्ट असतात. पण हा संयम अंगवळणी पडला की चित्तामध्ये वृत्ती उठेनाशा होतात. यासाठी नामस्मरणाचा अभ्यास उपयोगी पडतो. वृत्तीच्या तोंडी नाम द्यावे असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे. कोणतीही वृत्ती उठली तरी नामस्मरणाने ती आवरण्याचा अभ्यास करावा. यात साधक पारंगत झाला की नामाखेरीज दुसऱ्या वृत्ती मनात उठेनाशा होतात. म्हणजेच वृत्तींपर्यंत नाम पोचते.

**निरोधरूपत्वात् सा न कामयमाना** - सा म्हणजे ती पराभक्ती न कामयममाना म्हणजे त्या भक्तीमध्ये भक्ताची कोणतीही इच्छा रहात नाही. ही निष्कामता, वृत्ती आवरण्यामुळे येते. योगामध्ये चित्तवृत्तींचा निरोध साधक बलपूर्वक करतो. भक्ताच्या निरोधात बल व शरणागती यांचे मनोज्ञ मिश्रण असते. साधकाला शरीर, मन आणि बुद्धी या तीन्हींना आवर घालावा लागतो. शरीराच्या पातळीवर आपली इंद्रिये आपले ऐकत नाहीत. पाहाणे, ऐकणे, बोलणे, खाणे इत्यादींमूध्ये ती रमतात आणि त्यामुळे भगवंताचा विसर पडतो. म्हणून मग साधक निश्चय करतो की ज्यामुळे भगवंताचा विसर पडेल असे काहीही पहाणार

नाही, ऐकणार नाही, बोलणार नाही इत्यादी. मनामध्ये दुसऱ्याबद्दल वाईट विकल्प येऊ देणार नाही, कारण अशा विकल्पांनी आपले मन गढूळ होते आणि त्यामुळे मनात उमटलेले भगवंताचे रूप नाहीसे होते. म्हणून साधक मन शांत ठेवण्याचा प्रयत्न करू लागतो. बुद्धी शुद्ध व्हावी म्हणून तो शक्यतो दुसऱ्याचे अंतःकरण दुखवीत नाही. मनात येणाऱ्या वाईट विचारांना आवर घालतो आणि शक्य तितका वेळ मन नामस्मरणात गुंतवितो. हे सर्व करत असतांना काही वेळा तो यशस्वी होतो, पण सुरुवातीला बरेच वेळा हरतो. काय माझे हे जीवन असे त्याला वाटू लागते. आपण अल्पशक्ती आहोत, आपल्या प्रयत्नांनी हे साधत नाही म्हणून भगवंता आता तूच सहाय्य कर अशी तो प्रार्थना करतो. तुकाराम महाराज म्हणतात, ''माझे मज कळों येती अवगुण। काय करूं मन अनावर ॥ १ ॥ आतां आड उभा राहें नारायणा। दयासिंधुपणा साच करीं ॥ २ ॥ वाचा वदे परी करणें कठीण। इंद्रियाअधीन झालों देवा ॥ ३ ॥ तुका म्हणे तुझा जैसा तैसा दास। न धरीं उदास मायबापा ॥ ४ ॥''

योगामध्ये मन निर्विचार करावे लागते आणि त्यातून मग अध्यात्मप्रसाद होतो. भक्तीमध्ये मन नामस्मरणात रंगले तर मनात एका भगवंताखेरीज दुसरा विचारच राहात नाही. शरीर मन व बुद्धी यांचा सहजच निरोध होतो. इतर सर्व इच्छा नाहीशा होऊन मला देवच हवा ही इच्छा प्रबळ होते. जीवनात जे जे घडते ते ते त्याच्या म्हणजे भगवंताच्या इच्छेने घडते याचा साधकाला अनुभव येतो व त्यामुळे त्याची अशी वेगळी इच्छाच राहात नाही. आणि मग पूर्वीची सकाम भक्ती पराभक्तीमध्ये पर्यवसान पावते. आत्तापर्यंत जे घडले ते रामइच्छेने, या क्षणी जे घडत आहे ते रामइच्छेने आणि यापुढे जे घडणार ते रामइच्छेने याची त्याला खात्री असते. मग भावना, कल्पना, विचार, स्मृती इत्यादी सर्व काही भगवंताने भरून जातात. अशा प्रकारे भगवंताने अंतःकरण व्यापले की शुद्धबुद्धीचा उदय होतो. शुद्ध बुद्धीतून येणाऱ्या विचारांना मेंदूचा सुगंध असे म्हटले आहे. Thought is the fragrance of the brain. भक्ती निष्काम होण्यासाठी संयम अतिशय आवश्यक आहे. त्यासाठी विषयांच्या चिंतनात असणारे मन तेथून बलपूर्वक काढून ते हरिचिंतनात गुंतवावे लागते. ''विषयान् ध्यायतः चित्तं विषयेषु विषज्जते। मामनुस्मरतः चित्तं मय्यैव प्रविलीयते॥'' (विषयांचे चिंतन करू लागलो तर चित्त विषयांमध्ये रमते आणि माझे एकसारखे स्मरण केले तर ते माझ्यामध्ये लय पावते.) असे भगवंतानी सांगितले आहे.

योगमार्गातील निरोधापेक्षा भक्तीतून येणारा निरोध काहीसा सोपा असतो. योगात चित्तामध्ये उठणाऱ्या वृत्तींशी झटापट करून त्या नष्ट कराव्या लागतात तर भक्तीमध्ये चित्तात उठणाऱ्या अनेकविध वृत्तींचा प्रवाह भगवंताकडे वळवावयाचा असतो. धरणामध्ये त्याच्या क्षमतेपेक्षा जास्त पाणी अडवले तर धरणाची भिंत पडण्याचा धोका असतो. पण त्याच पाण्याला दुसरीकडे वाट काढून दिली तर तो धोका टळतो. तसा मनाचा प्रवाह भगवंताकडे वळवला तर कोणताही धोका न होता निरोध साधतो.

"जिह्वे कीर्तय केशवं मुररिपुं चेतो भज श्रीधरम्।
पाणिद्वन्द्वसमर्चयाच्युतकथा श्रोत्रद्वयं त्वं श्रुणु।
कृष्णं लोकय लोचनद्वय हरेः गच्छांघ्रि युग्मालयम्।
जिघ्र घ्राण मुकुन्दपादतुलसीं मूर्धन्नमाधोक्षजम्॥"

(हे जिह्वे, तू केशव मुरारीचे कीर्तन कर. चित्ता तू श्रीपतीच्या सेवेत रहा, हातानों अच्युताची पूजा करा, कानानों, त्याचीच कथा ऐका, डोळ्यानों, तुम्ही कृष्णच पहा, त्याच्या पायांवर तुमची दृष्टी असू द्या. हे नाका, त्या मुकुन्दाच्या पायांवर वाहिलेल्या तुलसींचा तू वास घे आणि हे मस्तका, त्या अधोक्षजाला नमन कर.) ह्या श्लोकात वर्णन केल्याप्रमाणे सर्व ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये, मन बुद्धी इत्यादी सर्वांचे भगवंताच्या पायांवर समर्पण झाले की भक्ताच्या हातून जे जे कर्म घडते ते ते भगवंताची पूजाच असते.

पुढील सूत्रात नारद या विषयाशी सुसंगत अशी निरोधाची व्याख्या देत आहेत.

## सूत्र आठवे

**निरोधस्तु लोकवेदव्यापारन्यासः ॥८॥**

**निरोधः= निरोध, आवरून धरणे. तु= पण. लोकवेदव्यापारः= लौकिक व वैदिक कर्मे. न्यासः = ठेवणे, सोडणे, त्याग करणे, समर्पण करणे.**

**पण निरोध म्हणजे लौकिक आणि वैदिक कर्मे बाजूला सारणे किंवा समर्पण करणे होय.**

**विवरण**: सातव्या सूत्रामध्ये नारदांनी भक्तीमध्ये निरोध आहे असे सांगितले. प्रस्तुत सूत्रात ह्या निरोधाचे स्वरूप व व्याप्ती ते स्पष्ट करीत आहेत. येथे लौकिक म्हणजे व्यावहारिक आणि वैदिक कर्मांचा उल्लेख केला आहे. ज्या कर्मांचा हेतु अर्थ आणि काम हे पुरुषार्थ साधण्याचा असतो त्यांना लौकिक

कर्मे म्हणता येईल आणि ज्या कर्मांचा हेतु धर्म आणि मोक्ष साधण्याचा असतो त्यांना वैदिक कर्मे म्हणता येईल. आणखी एका पद्धतीने कर्मांचे चार प्रकार करता येतात. नित्य, नैमित्तिक, काम्य व निषिद्ध. सर्व लौकिक व वैदिक कर्मे यांपैकी कोणत्या तरी एका प्रकारची असतात. या चार प्रकारच्या कर्मांपैकी निषिद्ध कर्मांचा सर्वथैव त्याग केला पाहिजे हे उघड आहे. परमार्थाकडे वळलेल्या माणसांची कर्मे सुरुवातीला काम्य असू शकतात हे आपण पूर्वी पाहिले आहे. परमार्थाचा हेतु जसजसा स्पष्ट होऊ लागतो तसतसे काम्य कर्मे करू नयेत असे त्यांना वाटू लागते आणि मग प्रयत्नपूर्वक ते अशी कर्मे टाळतात. नित्य व नैमित्तिक कर्मांशिवाय माणूस राहू शकत नाही. ''न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्। कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥३.५॥'' असे भगवद्गीता सांगते. आपण या जगाचे भाग आहोत. त्यामुळे जगाचे नियम आपल्याला लागू असतात. जगाच्या या नियमनाच नियति म्हणतात. नियतीवर आपली सत्ता नसते. म्हणून कर्मे केल्याशिवाय आपण राहूच शकत नाही. मग ती कर्मे लौकिक असोत वा वैदिक असोत. या सर्व कर्मांचा न्यास करणे म्हणजे निरोध असे नारद सांगत आहेत. थोडक्यात कर्मे तर करावी लागणारच. पण जर ती भगवदर्पण बुद्धीने केली तर त्यांचा निरोध होतो व त्या कर्मांचा लेप कर्त्याला लागत नाही.

निरोध साधण्याच्या योगशास्त्रातील आणि भक्तिशास्त्रातील पद्धतींमध्ये फरक आहे. योगामध्ये दमनाला (suppression) महत्त्व आहे. वृत्ती उठली तरी योगी ती बळाने दाबून टाकतो. भक्तीमध्ये वृत्ती उठली तर ती दाबण्याचा प्रयत्न न करता भक्त ती भगवंताकडे वळवितो. म्हणजे भक्तीच्या निरोधात वृत्ती वळविणे (channelisation) असते. म्हणून न्यास शब्दाचेही दोन वेगवेगळे अर्थ आहेत. योगामध्ये न्यास म्हणजे त्याग, संन्यास (renunciation) आहे तर भक्तीत समर्पण (consecration) आहे. निरोधातील हा भेद स्पष्ट करण्यासाठीच नारदांनी 'तु' या अव्ययाचा उपयोग केला आहे. तथापि न्यास कोणत्याही प्रकारचा असो त्यामध्ये कर्मातील मीपणा आणि आसक्ति नाहीशी व्हावी लागते. ज्ञानेश्वरीच्या पाचव्या अध्यायात भगवंत सांगतात, ''आणि मी माझें ऐसी आठवण। विसरलें जयाचें अंतःकरण। पार्था तो संन्यासी जाण। निरंतर ॥५.२०॥'' मी आणि माझेपणाचा त्याग झाला म्हणजे भक्त निरहंकारी व निर्मम होतो आणि त्याला शांति लाभते. त्यानंतरही भक्त कर्मे करीत असतो; पण ती भगवंताच्या इच्छेने आणि भगवंतासाठी असतात. पूर्वी उल्लेख

केल्याप्रमाणे भक्तांच्या कल्पना, भावना, विचार, स्मृती आणि कर्मे भगवंतासाठीच असतात. त्यांच्याकडून होणारे प्रत्येक कर्म ही ईश्वराची पूजा असते. नारदाच्या शापामुळे वृक्षयोनीत गेलेल्या कुबेर पुत्रांचा यशोदेने बांधलेल्या उखळासकट श्रीकृष्ण यमलार्जुन वृक्षांमधून जात असतांना ते वृक्ष पडून उद्धार झाला. श्रीकृष्णाची स्तुती करून ते म्हणाले "वाणी कथानुकथने श्रवणौ कथायाम्। हस्तौच कर्मसु मनः तव पादयो नः। स्मृत्यां शिरः तव निवासजगत्प्रणामे। दृष्टिः सतां दर्शनेऽस्तु भवत्तनूनाम्॥" भागवत १०.१०.३८॥ (हे प्रभो, आमची वाणी सदैव तुझे गुणलीलाकीर्तन करण्यात रमू दे. आमचे कान तुझ्या कथा ऐकू देत. आमचे हात तुझ्या कार्यात गुंतलेले असू देत. चित्त तुझ्या पायांवर स्थिर होऊ दे, मस्तक सर्व जग व्यापलेल्या तुझ्या मूर्तीपुढे विनम्र होऊ दे आणि दृष्टी भूतलावर वावरणाऱ्या तुझ्या मूर्ती अशा संतांकडे लागू दे.

आपला प्रपंच भगवंताला अर्पण करण्याची - लोकवेदव्यापारन्यासाची युक्ती श्रीमहाराजांनी सांगितलेली आहे. अपूर्णता हे प्रपंचाचे खरे स्वरूप असल्यामुळे कितीही मिळाले तरी काहीतरी मिळायचे राहातेच. म्हणून "माझं मागणं बंद कर असं रामाजवळ मागावं." व्यवहारात आपल्याला अनेकांना अनेकदा शरण जावे लागते. म्हणजे आपल्याला शरणागतीची सवय आहे. म्हणून अनेकांना शरण न जाता एका भगवंताला शरण जावे म्हणजे सर्व लौकिक व वैदिक कर्मे आपोआपच त्याला अर्पण होतात. समर्थ रामदास सांगतात, "सेवकू मानवीयांचे कष्टती बहुतापरी। सेविला देव देवांचा तेणें मी धन्य जाहलों॥" अर्पण करणे ही मनाची अवस्था आहे. माझ्या घरात देव आहे असे न वाटता मी देवाच्या घरात राहातो आहे असे वाटू लागले की समजावे की समर्पणाची तयारी होते आहे. Devotion व Dedication भक्ती व समर्पण दोन्ही महत्त्वाचे आहे. एकाशिवाय दुसरे साधत नाही. प्रपंचाला चिकटणे म्हणजेच प्रपंचाची आसक्ती नाहीशी होऊन भक्त भगवंताला चिकटला की निरोध पूर्ण होतो. हे करतांना सुरुवातीला कष्ट असतात पण ध्येय निश्चित होऊन वैराग्य निर्माण झाले की भक्त भगवंताला सर्वस्व देतो. असे सर्वस्व वाहिलेल्या वृंदावनात आलेल्या गोपींना जेव्हां श्रीकृष्णाने तुम्ही आपआपल्या घरी परत जा म्हणून सांगितले तेव्हां त्या म्हणाल्या, "चित्तं सुखेन भवतापहृतं गृहेषु। यन्निर्विशत्युतकरावपि गृह्यकृत्ये। पादौ पदं न चलतस्तव पादमूलात्। यामः कथं व्रजमथो करवाम किंवः॥" श्रीमद्भागवत १०.२९.३४॥ (हे मनमोहना!

आत्तापर्यंत आमचे चित्त प्रपंचातील कामात गुंतलेले होते, आमचे हातही घरकामात होते. परंतु पहाता पहाता तू आमचे चित्त चोरलेस. असे करताना तुला काही कष्ट झाले नाहीत. पण आता आमचे पाय तुझे चरण सोडून दुसरीकडे जाण्यास तयार नाहीत. त्यामुळे आता आम्ही व्रजामध्ये परत कशा जाऊ आणि गेलो तरी तेथे जाऊन आम्ही काय करू?)

निरोधाची आणखी दोन लक्षणे नारदांनी पुढील सूत्रात सांगितली आहेत.

## सूत्र नववे

**तस्मिन्ननन्यता तद्विरोधिषूदासीनता च ॥९॥**

**तस्मिन्= त्या ठिकाणी म्हणजे इष्ट देवरूपाच्या ठिकाणी.**

**अनन्यता= याखेरीज दुसरे काही नाही असा भाव.**

**तद्विरोधिषु= त्याला म्हणजे अनन्यभावाला विरोधी अशा गोष्टींबद्दल**

**उदासीनता= उपेक्षाभाव- holy indifference. च= आणि.**

**आपल्या इष्ट देवाच्या ठिकाणी अनन्य भक्तिभाव ठेवणे आणि त्याला विरोधी अशा सर्व गोष्टींच्या बाबतीत उपेक्षाभाव ठेवणे हेही निरोध लक्षण आहे.**

**विवरण :** आपल्या इष्ट दैवताखेरीज अथवा सद्‍गुरूखेरीज जगात दुसरे काहीही नाही - मी देखील नाही असा भाव उत्पन्न होऊन तो स्थिर होणे म्हणजे अनन्यता होय. जग हे भगवंताचे कार्य आहे; ते कारणात म्हणजे भगवंतात लीन होणे हे मानवी जीवनाचे उद्दिष्ट आहे. यालाच जीव शिवामध्ये लीन होणे म्हणतात. शिव हे कारण आणि जीव हे कार्य आहे. कार्य कारणात लीन झाले म्हणजे समाधानाची प्राप्ती होते. येथे कार्य दृश्य आहे तर कारण अदृश्य आहे. कार्य नाशिवंत आहे तर कारण शाश्वत आहे. कार्य व्यक्त आहे तर कारण अव्यक्त आहे. कार्य स्थलकालाने मर्यादित आहे तर कारण स्थलकालातीत आहे. कार्य स्थूल आहे तर कारण सूक्ष्म आहे. कार्य मर्यादित आहे तर कारण व्यापक आहे. कार्याने कार्यपण सोडून कारणात लीन होणे म्हणजे मीपणा सोडणे होय. जगात मीदेखील नाही, केवळ तूच आहेस असा भाव स्थिर होणे म्हणजेच अनन्यता. असा अनन्यभाव स्थिर झालेला भक्त स्वतः कोणतेच कर्म करीत नसतो. त्याच्या देहातून सर्व काही भगवंतच करीत असतो. म्हणूनच मी यंत्र तू यंत्री असे श्रीरामकृष्ण म्हणत असत. "त्वदीय वस्तु गोविंद तुभ्यमेव समर्पये." जे खरोखर भगवंताचे आहे ते त्याला देणे हीच अनन्यभक्ती होय. मी आणि माझेपण अनन्यभक्तीच्या आड येते. म्हणून

जे माझे वाटते त्याची मालकी सोडली पाहिजे. मी भगवंताचा झालो की ज्याला मी माझे म्हणतो ते सर्व त्याचे होईल. हा भाव आत्मसात होण्यासाठी साधकाची बहिर्मुख दृष्टी अंतर्मुख व्हावी लागते. कारण अंतर्मुखतेमधूनच हळूहळू जीव शिवाशी तादात्म्य पावतो. मला आता तुझ्याशिवाय दुसरे कोणीही नाही हा भाव स्थिर होतो. ''त्वमेव माता च पिता त्वमेव'' ह्या श्लोकात म्हटल्याप्रमाणे सर्व नाती भगवंतात एकवटतात. तू स्वामी मी दास अशा प्रकारची अनन्यभक्ती निर्माण होणे हे निरोधाचे सकारात्मक स्वरूप नारदांनी या सूत्रात सांगितले आहे.

निरोधाचे नकारात्मक स्वरूप याच सूत्राच्या 'तद्विरोधिषु उदासीनता' या भागात सांगितले आहे. जग द्वंद्वात्मक आहे. त्यामुळे जगात संघर्ष निर्माण होतो. आपले साधन करीत असताना साधनाच्या आड येणाऱ्या गोष्टींबाबत साधकाची भूमिका विरोधाची राहिली तर द्वेष आणि संघर्ष वाढत जातो, आणि साधनाचा मूळ हेतु बाजूला राहातो. म्हणून नारद सांगतात की इष्ट देवतारूपाच्या ठिकाणी अनन्यता असावी आणि त्याला विरोधी असणाऱ्या गोष्टींविषयी उदासीन राहावे. विरोध अनेक प्रकारचा असतो. उदाहरणार्थ, निसर्गाचा विरोध. अतिशय उष्णता, थंडी, पाऊस यांचा शरीरावर परिणाम होतो. आजाराचा साधनावर परिणाम होतो. सामाजिक, राजकीय, आर्थिक, धार्मिक परिस्थिती साधनाला प्रतिकूल असू शकतात. अशा वेळी त्या त्या प्रतिकूल परिस्थितीशी आपण झगडावयाचे ठरविले तर त्यामध्ये वेळ वाया जातो. शारीरिक व मानसिक शक्ती झगडण्यात खर्च होऊन साधन करण्यासाठी शक्ती राहात नाही. शिवाय द्वेषभाव वाढतो आणि मन गढूळ होते. म्हणून नारद सांगतात की त्या बाबतीत उदासीन व्हावे. विरक्तीशिवाय उदासीन होणे जमत नाही. उद्+आसीन म्हणजे वर बसलेला. उदासीन व्हावे म्हणजे साधकाने खालच्या पातळीवर येऊ नये. होणारा विरोधही भगवंताच्या इच्छेने होतो आहे हे जाणून खाली घसरू नये.

वर वर्णन केलेल्या सर्वसाधारण विरोधापेक्षा व्यक्तिगत पातळीवरचा विरोध जास्त त्रास देतो. कुटुंबातील माणसे, अन्य नातेवाईक, मित्रपरिवार, शेजारी नांवे ठेवू लागले तर ते सहन होणे आणि त्याकडे दुर्लक्ष करणे फार कठीण होते. तथापि या बाबतीत प्रत्युत्तर न करता साधकाने भगवंत आपल्या निष्ठेची परीक्षा घेत आहे-अशासारखा विचार मनात आणून निंदेकडे दुर्लक्ष करण्याचा अभ्यास केला पाहिजे. साधक भगवंताला चिकटला की हे शक्य होते.

पण या सर्व अभ्यासात खरा विरोध आपला स्वतःचाच असतो. आपण करत असलेल्या साधनाविषयी, उदाहरणार्थ नामस्मरणाविषयी संशय वाटणे हा सर्वात मोठा विरोध म्हटले पाहिजे, कारण त्यामुळे साधनात धरसोड वृत्ती होते. एखाद्या गावाला जायला चार रस्ते असले तर प्रत्येक रस्त्यावर थोडे थोडे चालतो म्हणून कसे चालेल? एक रस्ता निवडून त्या रस्त्यानेच शेवटपर्यंत जावे लागेल आणि बाकीच्या रस्त्यांच्या बाबतीत दुर्लक्षच करावे लागेल. म्हणूनच "नामेंचि सिद्धी, नामेंचि सिद्धी। व्यभिचार बुद्धी न पवता॥" असे तुकाराम महाराज सांगतात. यासाठी साधकाने आपल्या आत काय चालू आहे ते पहावे आणि साधन सोडू नये.

परमात्म्याबद्दल अनन्यभाव व इतर सर्व गोष्टींविषयी, विशेषतः साधनाला विरोधी असणाऱ्या गोष्टींविषयी उदासीनता असे अनन्यभक्तीचे स्वरूप आहे. ही अनन्यभक्ती साधली की भक्ताला स्वतःचे सुखदुःख राहात नाही कारण मग जे जे घडते ते ते सर्व इष्ट देवतेच्या अथवा सद्‌गुरूंच्या इच्छेनुसार घडते आणि ते साधकाच्या हिताचेच असते. मग साधकाची स्वतःची अशी वेगळी इच्छा राहात नाही. अशा प्रकारे निरोधाचे रूप स्पष्ट करून पुढच्या दहाव्या सूत्रात नारद अनन्यतेची व्याख्या करतात.

## सूत्र दहावे

**अन्याश्रयाणां त्यागोऽनन्यता ॥१०॥**

**अन्य = दुसरा. आश्रयाणां = आश्रयांचा. त्यागः = त्याग. अनन्यता = एकाखेरीज दुसरे काही नसण्याची स्थिती.**

**परमेश्वराखेरीज इतर सर्व आश्रयांचा त्याग करणे म्हणजे केवळ परमेश्वराच्याच आश्रयाने राहाणे हीच अनन्यता होय.**

**विवरण** : नवव्या सूत्रात तस्मिन् म्हणजे इष्ट देवतेच्या अथवा सद्‌गुरूंच्या ठिकाणी अनन्यता पाहिजे असे सांगितले. अनन्यता कशाला म्हणावयाचे ते या सूत्रात सांगितले आहे. भक्तीची नुकतीच वाटचाल करू लागलेल्या साधकांसाठी हे सूत्र जसे महत्त्वाचे आहे तसे ज्यांना आपण आता भक्त झालो असे वाटते त्यांनाही हे सूत्र आत्मपरीक्षण करायला लावते.

आश्रय शब्दामध्ये मूळ श्रि धातु आहे. त्याचा अर्थ धरून ठेवणे, अवलंबून राहाणे, संरक्षण घेणे असा होतो. आ म्हणजे सर्व बाजूनी. सर्व बाजूंनी संरक्षण घेणे किंवा अवलंबून राहाणे म्हणजे आश्रय. माणसाला जेव्हां असुरक्षित वाटते

तेव्हां तो आधार शोधतो. अर्थात आपल्यापेक्षा जो समर्थ आहे त्याचा किंवा आपला कमीपणा जो भरून काढेल असे वाटते त्याचा माणूस आश्रय घेतो. आश्रय शोधणाऱ्या माणसात काही प्रमाणात हीन गंड (inferiority complex) असतो. जेव्हां माणसावर एखादे संकट कोसळते वा कोसळण्याची शक्यता निर्माण होते, परिस्थिती प्रतिकूल होते तेव्हां माणसाला भय, चिंता, काळजी वाटू लागते. संकटातून बाहेर पडण्यासाठी कोणाची मदत घ्यावी, कोणाचा आश्रय घ्यावा हे तो पाहू लागतो, आपल्याला जग खरे वाटते म्हणून साहजिकच आपण बाहेरचा म्हणजे जगातील आधार शोधतो. समजा चक्कर आली आणि माणूस पडू लागला तर त्याला कल्पनेतल्या खांबाचा आधार घेऊन चालत नाही!

आज जगात Anxiety neurosis आहे. पूर्वीपेक्षा माणूस जास्त असुरक्षित झाला आहे. भय आणि काळजी यांवर कृष्णमूर्तींनी खूप सांगितले आहे. माणूस असुरक्षिततेत सुरक्षितता पहातो म्हणून त्यांनी Insecurity of security असा शब्दप्रयोग केला आहे. काळजीचे मूळ भयात आहे Anxiety is the child of fear. पण भयाचे मूळ भगवंतापासून वेगळे होण्यात आहे. आपण भगवंताचे अस्तित्व नाकारतो आणि जगाचा आश्रय घेतो. आपल्यापेक्षा जास्त शक्ती, सत्ता, संपत्ती असणाऱ्या माणसांचा आपण आश्रय घेतो. नोकरी, व्यापार, इतर माणसे, पैसा यांचा आश्रय हा बाहेरचा आश्रय होय. हा आश्रय, विशेषतः पैशाचा आधार माणसाला भगवंतापासून दूर नेतो असे श्रीमहाराज म्हणत असत. साधकाला जोपर्यंत पैशाचा आधार हाच खरा आधार आहे असे वाटते तोपर्यंत त्याची उपासना खरी उपासना होणे शक्य नाही. मोठमोठ्या अध्यात्मसंस्थांमध्ये देखील पैशाचे महत्त्व वाढले की ज्या हेतूने त्या संस्था स्थापन झालेल्या असतात त्या हेतूच्या म्हणजे अध्यात्माच्या वाढीच्या आड पैसा येतो. पैशामुळे मिंधेपणा येतो. जगातील सर्व आधारांना मर्यादा असतात. उदाहरणार्थ, ज्या माणसाचा आपण आश्रय घेतो त्यालाही कशाची ना कशाची तरी भीती, काळजी असतेच. त्यामुळे तोही आणखी कोणाचा तरी आश्रय घेतो. म्हणून ज्या आधाराला आणखी कशाचा आधार लागत नाही, जो शाश्वत आहे तो भगवंत अथवा सद्‌गुरु हाच खरा आधार, खरा आश्रय होय. हा आश्रय अंतरंगातील आश्रय आहे. या अंतरंगातील आश्रयाखेरीज म्हणजे भगवंत अथवा सद्‌गुरूंखेरीज दुसरा कशाचाही आधार न वाटणे ही अनन्यता. 'मेरे तो गिरिधर गोपाल, दूसरो न कोई' ही मीरेची अनन्यता होती. सद्‌गुरु देहात

असतील तर त्यांचा आश्रय घेणे सोपे होते. पण ते तसे नसले तरीही सत्संग मिळाला तर संत भगवंताच्या आश्रयाने कसे भक्तीच्या आनंदात मस्त असतात ते पहावयास मिळते.

जगाचा भरंवसा सोडून केवळ भगवंताच्या भरंवशावर राहाता आले की त्याचा काय परिणाम होतो ते थोडक्यात पाहू म्हणजे नारदांनी अनन्यतेला इतके महत्त्व का दिले आहे ते लक्षात येईल. जगाचा आधार न वाटता खरा आधार केवळ भगवंताचा आहे असे भक्ताला वाटू लागले की त्याचे सारे जीवनच बदलते. (१) पहिली गोष्ट म्हणजे ईश्वराच्या अस्तित्वाविषयी तो निःसंशय होतो. स्वतःपेक्षाही देव खरा आहे अशी त्याची खात्री होते. प्रथम तो 'देव आहे' म्हणत असतो. नंतर 'देव आहेच' म्हणू लागतो आणि शेवटी 'देवच आहे', सर्वं खल्विदं ब्रह्म हे तो जाणतो. (२) देव आहे, तो माझा स्वामी आहे, माझा कुटुंबप्रमुख आहे, माझ्यावर त्याचे स्वामित्व आहे आणि माझ्या जीवनात जे जे घडते ते सर्व काही त्याच्या इच्छेने घडते अशी त्याची खात्री होते. (३) या गोष्टींचा परिणाम म्हणून त्याचा कर्तेपणाचा आविर्भाव क्षीण होतो. मी कर्ता नाही, खरा कर्ता देव आहे हे तो जाणतो. (४) त्यामुळे जीवनात काहीही संकट आले तर केवळ भगवंताचीच आठवण होते. आणि (५) त्याच्या जीवनात काहीही कमी जास्त झाले तरी भगवंताने जे केले ते बरोबरच आहे, ते माझ्या हिताचे आहे अशी त्याची खात्री होते.

सामान्यतः तीन प्रकारच्या भयांनी माणूस ग्रासलेला असतो. (१) दारिद्र्य : माणसाला पैशाचा हव्यास असतो. कारण पैशाने सर्व सुखे खरेदी करता येतात आणि सर्व अडचणींवर मात करता येते असे त्याला वाटते. काही मर्यादेपर्यंत ते खरेही असते. पण किती पैसा असला की सुरक्षितता मिळेल ते कळत नाही आणि त्यामुळे त्याची पैशाची हाव वाढते व तो खऱ्या अर्थाने दरिद्रीच राहातो. म्हणून 'स तु भवति दरिद्रो यस्य तृष्णा विशाला' असे भर्तृहरीने म्हटले आहे. (२) प्रकृती : आपली प्रकृती, आपल्या माणसांची प्रकृती, आजार या गोष्टींसंबंधी माणसाला काळजी आणि भीती वाटते. माझ्या रक्षणकर्ता भगवंत आहे असे ज्याला वाटते तोच या बाबतीत निर्भय होतो. सामान्य प्रापंचिक माणूस कुटुंबातील माणसे, नातेवाईक, मित्र इत्यादींमध्ये गुंतलेला असतो. त्यांच्यावर काही संकट आले तर तो अस्वस्थ होतो. त्याचप्रमाणे त्याच्यावर काही संकट आले तर त्यांची मदत होईल असा त्याला भरंवसा वाटतो. जेव्हां हे सर्व अपुरे आहे हे त्याला समजते आणि 'जन हे सुखाचे दिल्या घेतल्याचे।

अंतिम हिताचे कोणी नाही' याचा तो अनुभव घेतो तेव्हां भगवंताशिवाय कोणाचाही आधार खरा नाही हे त्याला समजते. त्यानंतर भगवंताला अनन्यशरण झालेला भक्त म्हणतो, "त्वमेव माता च पिता त्वमेव। त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव। त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव। त्वमेव सर्व मम देव देव॥" ह्या श्लोकाचा आणि सूत्राचा समर्पक अनुवाद तुकाराम महाराजांच्या पुढील अभंगात आढळतो, "कृष्ण माझी माता कृष्ण माझा पिता। बहिणी बंधु चुलता कृष्ण माझा ॥ १ ॥ कृष्ण माझा गुरु कृष्ण माझें तारूं। उतरील पैलपारु भवनदीची ॥ २ ॥ कृष्ण माझें मन कृष्ण माझें जन। सोईरा सज्जन कृष्ण माझा ॥ ३ ॥ तुका म्हणजे माझा श्रीकृष्ण विसांवा। वाटे न करावा परता जीवा ॥ ४ ॥"

(३) माणसाचे तिसरे भय त्याच्या अब्रूशी संबंधित असते. माणूस आपल्या अब्रूला फार जपतो. आपले नांव खराब होऊ नये, आपली सत्कीर्ती व्हावी व मृत्यूनंतरही आपले नांव लोकांच्या स्मरणात राहावे असे माणसाला वाटते. या बाबतीत असे दिसते की संतांइतकी निंदा कोणाचीच होत नाही आणि त्यांच्याइतकी निंदा सोसण्याची शक्तीही दुसऱ्या कोणाजवळ नसते. निंदा सोसून ते जगाचे कल्याण करतात. भगवंताचा आश्रय घेतल्यामुळे ते खरे निर्भय असतात.

सारांश, इतर सर्व आश्रय सोडून देऊन केवळ भगवंताचा आश्रय घेणारा भक्तच निर्भय होतो. त्याचे विकार नाहीसे होतात, भगवंताचा विचार स्थिर होऊन तो निःसंकल्प होतो आणि त्याला समाधानाची प्राप्ती होते. चातकचौतिसीमध्ये संत तुलसीदास म्हणतात "एक भरोसो एक बल, एक आस बिस्वास। एक राम घनस्याम हित चातक तुलसीदास॥" चातक ज्याप्रमाणे तहानलेला असला तरी पर्जन्यधारांखेरीज दुसरे पाणी पीत नाही त्याप्रमाणे अनन्यभक्त ईश्वराखेरीज दुसऱ्या कोणाचाही आश्रय घेत नाही. अशा अनन्यभक्ताने जगात कसे वागावे ते नारद पुढील सूत्रात सांगतात.

## सूत्र अकरावे

**लोके वेदेषु तदनुकूलाचरणं तद्विरोधिषूदासीनता ॥ ११ ॥**

**लोके= लौकिक व्यवहारात. वेदेषु = वेदांनी सांगितलेल्या कर्मांत. तद्= त्यांना. अनुकूल= योग्य, पोषण करणारे. आचरण= वर्तन. तद्= त्यांना. विरोधिषु= विरोधी कर्मांच्या बाबतीत. उदासीनता= उपेक्षाभाव. holy indifference.**

**लौकिक व्यवहारातील आणि वेदांनी सांगितलेल्या कर्मांच्या बाबतीत ज्या कर्मांमुळे भक्तीचे पोषण होईल ती कर्मे करावी आणि त्याखेरीज अन्य सर्व, विशेषतः भक्तीला प्रतिकूल ठरणाऱ्या कर्मांच्या बाबतीत उदासीनता म्हणजे उपेक्षाभाव ठेवावा.**

**विवरण**: समाजामध्ये सामान्य माणसाला जे धर्माचे, नीतीचे व समाजाचे नियम पाळावे लागतात तेच भक्तालाही तो त्याच समाजात राहात असल्यामुळे पाळावे लागतात. सामान्य माणूस प्रपंचासाठी जगतो तर भक्त भगवत्प्राप्तीसाठी जगतो. म्हणून तो करतो ती कर्मे त्याच्या ध्येयाला बाधक होत असतील तर त्याने काय करावे याचे उत्तर या सूत्रात दिले आहे.

नारद सांगतात की ज्या कर्मांमुळे साधनाला बाधा येणार नाही अशी कर्मे आणि ज्यांच्यामुळे साधनाचे पोषण होईल अशी कर्मे करावी. याचाच अर्थ या दोन प्रकारच्या कर्मांखेरीज इतर कर्मे करू नयेत. मग ती लौकिक असोत किंवा वैदिक असोत. त्यांच्या बाबतीत उदासीन राहावे. लौकिक व्यवहारात आपण आई, वडील, गुरुजन यांची आज्ञा पाळतो. पण ते आज्ञापालन साधनाच्या, भक्तीच्या आड येत असेल तर करू नये. ध्येयप्राप्तीला अनुकूल असतील ती लौकिक व वैदिक कर्मे करावी आणि प्रतिकूल कर्मांकडे दुर्लक्ष करावे. मग त्यासाठी कोणतेही कष्ट सोसावे लागोत. अनेक उदाहरणे देऊन तुलसीदासांनी हा मुद्दा स्पष्ट केला आहे. ते म्हणतात :

जाके प्रिय न राम बैदेही।
तजिये ताहि कोटि बैरीसम जद्यपि परमसनेही॥
पिता तज्यो प्रहलाद, बिभीषन बंधु, भरत महतारी।
बलि गुर तज्यो, कंत ब्रजबनितनि, भए जग मंगलकारी॥

(ज्यांना सीताराम प्रिय नाहीत त्यांचा ते अगदी निकटचे आप्तजन असले तरी त्याग करावा. प्रल्हादाने आपल्या पित्याचा, बिभीषणाने भावाचा, भरताने आईचा, बलीने गुरूचा, ब्रजातील गोपींनी त्यांच्या पतींचा या कारणाने केलेला त्याग जगाला कल्याणकारी झाला.)

इतर प्रापंचिकांप्रमाणे साधकालाही अन्न, वस्त्र, निवाऱ्यासाठी पैसा मिळवावा लागतो. त्याप्रमाणे नातेवाईक, इष्टमित्र इत्यादींसंबंधी त्याची काही कर्तव्ये असतात. पण त्यासाठी आवश्यक ती सर्व कर्मे करीत असताना ती आपल्या ध्येयप्राप्तीच्या आड येणार नाहीत याची त्याने खबरदारी घेतली पाहिजे. त्याचे वर्तन नीतीला धरून असले पाहिजे हे उघडच आहे. पैसा मिळवताना तो

आपल्या चरितार्थाचे साधन आहे, साध्य नव्हे हा विवेक त्याने ठेवला पाहिजे. चरितार्थासाठी दुसऱ्याच्या कृपेवर मिंधेपणाने त्याने राहू नये. या बाबतीत श्रीमहाराजांचे सांगणे परखड होते. ते म्हणाले की "रात्री कोणी माझ्या उशाशी लाख रुपये आणून ठेवले तर ते मी बाजूला सारेन आणि कष्टाने चार आणे कमावून खाईन."

देहबुद्धी आहे तोपर्यंत स्थूल वस्तू जितक्या खऱ्या वाटतात तितके भगवंताचे नाम, त्याचे चिंतन खरे वाटत नाही; पण ते खरे वाटण्यासाठी अखंड नामस्मरण हाच उपाय आहे. नाम ही स्थूल आणि सूक्ष्म यांना जोडणारी साखळी आहे. श्रीदत्तात्रेयांनी जनार्दन स्वामींना अकर्तात्मबोध शिकवला. एकनाथ महाराज सांगतात, "कर्म करूनि अकर्ता। तोचि अकर्तात्मबोधु जाहला देता। देहीं असोनि विदेहता। तेही तत्त्वतां आकळिली॥ गृहाश्रमु न सांडितां। कर्मरेखा नोलांडितां। निजव्यापारीं वर्ततां। बोधु सर्वथा न मैळे॥" नाथभागवत ९.४३४,४३५॥ या सूत्राचे आचरण म्हणजे अकर्तात्मबोधाने राहाणेच होय. व्यवहारात भक्तीला अनुकूल आचरण पाहिजे. त्याचप्रमाणे वेदेषु म्हणजे वर्णाश्रम धर्माच्या बाबतीत दृष्ट-अदृष्ट उभय स्वरूपाची कर्मे करावी पण त्यातून कर्मठपणा निर्माण होऊ नये. त्यासाठी काही बाबतीत उदासीनता आचरावी लागेल. "असोनी सर्वांत, नसावे कुणाचे" हा साधक भक्तीचा आदर्श आहे. प्रपंच माझा नाही, भगवंताचा आहे आणि त्याच्या प्रपंचात मी पाहुणा आहे अशी वृत्ती ठेवावी.

येथे एक प्रश्न उपस्थित होतो की साधक भक्ताने आपण साधक आहो म्हणून शास्त्रबंधनांचे पालन करणे सोडून दिले तर ते योग्य होईल का? या प्रश्नाचे उत्तर नारदांनी पुढील दोन सूत्रात दिले आहे.

## सूत्र बारावे व तेरावे

**भवतु निश्चयदार्ढ्यादूर्ध्वं शास्त्ररक्षणम् ॥१२॥**

**अन्यथा पातित्याशङ्कया ॥१३॥**

**भवतु= असे होवो. निश्चयदार्ढ्यात्= दृढ निश्चय झाल्यापासून, केल्यापासून ऊर्ध्वम्= नंतर. शास्त्ररक्षणम्= शास्त्राचे रक्षण.**

**अन्यथा= नाहीतर. पातित्याशङ्कया= अधःपतन होण्याची शक्यता (भीती) असते म्हणून.**

**(ध्येयासंबंधी) दृढनिश्चय झाल्यानंतर साधकाने शास्त्राने घालून दिलेल्या वैदिक, नैतिक व लौकिक नियमांचे व तदनुसार प्राप्त कर्मांचे परिपालन केले पाहिजे. कारण तसे केले नाही तर साधकाचे अधःपतन होण्याची (साधक भ्रष्ट होण्याची) शक्यता - भीती असते.**

**विवरणः** देव भेटावा असे साधकाला वाटते. त्यासाठी देवाबद्दल अतिशय खोल प्रेम वाटले पाहिजे हे ही त्याला वाटत असते. म्हणजे त्याचे ध्येय ठरलेले असते पण ते साध्य होण्यासाठी कराव्या लागणाऱ्या त्यागाची मनाची तयारी झालेली नसते. पुरेसे वैराग्य बाणलेले नसल्यामुळे प्रपंचही हवा आणि परमार्थही हवा असे त्याला वाटते. भक्तिमार्गावरच्या बहुसंख्य साधकांची ही स्थिती असते. त्यामुळे मार्ग चालणाऱ्यांच्या संख्येच्या मानाने शेवटच्या टप्प्यावर पोचलेले थोडेच आढळतात. ''प्रपंच परमार्थ संपादीन दोन्ही। एकही निदानीं नव्हे त्यासी॥'' हे खरे; पण प्रपंच आणि परमार्थ या दोन्हींचीही ओढ असणे हा देखील भक्तिमार्गावरचा एक टप्पा असतो. प्रपंचात सुख तात्पुरते मिळते. त्यापासून अखंड समाधानाची प्राप्ती होत नाही याचा वरचेवर अनुभव आला की साधकाला वस्तुरहित शुद्ध आनंद मिळावा असे वाटू लागते. नंतर त्याच्याखेरीज दुसरे काहीही नको असा त्याचा दृढ निश्चय होतो. असा दृढ निश्चय झाल्यावर साधकाचे वागणे कसे असावे ते बाराव्या सूत्रात सांगितले आहे.

माणूस ज्या समाजात, धर्मात, कुटुंबात जन्मतो त्या समाजाच्या नीतिनियमांचे तो कळत न कळत पालन करतो. भगवंताखेरीज मला आता दुसरे काहीही मिळवावयाचे नाही असा साधकाने दृढ निश्चय केल्यानंतरही त्याने शास्त्र नियमांचे पालन केले पाहिजे असे नारद सांगतात. मी भक्त आहे म्हणून भक्ती करताना दुसऱ्या कोणत्याही नीतिनियमांची, शास्त्राची, धर्माची बंधने पाळण्याची आवश्यकता नाही असे जर कोणी म्हणू लागला तर ते चुकीचे आहे. भक्ती म्हणजे स्वैराचार नव्हे. उलट भक्ताचे वर्तन इतरांना आदर्श वाटले पाहिजे. साधकच नव्हे तर सिद्धही सिद्धावस्था पचनी पडल्यानंतर नीतीची, धर्माची व शास्त्राची बंधने कटाक्षाने पाळतात. भगवान श्रीकृष्ण सांगतात, ''यद्यदाचरति श्रेष्ठो तत्तदेवेतरो जनः।'' भगवद्गीता ३.२१॥ ''एथ वडिल जें जें करिती। तया नाम धर्मु ठेविती। तेंचि येर अनुष्ठिती। सामान्य सकळ॥ हें ऐसें असे स्वभावें। म्हणोनि कर्म न संडावें। विशेषें आचरावें। लागे संतीं॥'' ज्ञानेश्वरी ३.५८,५९॥ केवळ कर्म सोडण्याने साधन होत नाही; उलट

आळस पोसला जाण्याची भीती असते. साधनात वाढ होता होता अशी अवस्था येते की साधकाचे कर्म सुटते, पण त्यानंतर वर म्हटल्याप्रमाणे सिद्धावस्था पचनी पडल्यावर सिद्ध पुरुषही सामान्य लोकांना कर्माचा आदर्श घालून देतो. "गृहाश्रमु न सांडितां। कर्मरेखा नोलांडिता। निजव्यापारीं वर्ततां। बोध सर्वथा न मैळे॥" असे नाथांनी या अवस्थेचे वर्णन केले आहे. साधकावस्थेत साधकाने नीतिनियमांचे कटाक्षाने पालन केले पाहिजे. तसे केले नाही तर साधकाचा अधःपात होतो.

श्रीमद्भागवतात श्रीकृष्ण उद्धवाला सांगतात, "तावत् कर्माणि कुर्वीत न निर्विद्येत यावता। मत्कथाश्रवणादौ वा श्रद्धा यावन्नजायते॥" जोपर्यंत माझ्या कथा, उपदेश यांच्या श्रवणाने ध्यान, पूजन, अखंड स्मरण घडून, दृढ श्रद्धा, ऐहिक विषयांबद्दल तीव्र वैराग्य आणि भगवंताचे अखंड चिंतन होऊ लागले नाहीत, तोपर्यंत साधकाने आपली प्राप्त कर्तव्ये शास्त्र नियमाप्रमाणे करावी. शास्त्र म्हणजे वेद व स्मृति. विशेषतः स्मृतिग्रंथात सामाजिक आचार, कर्तव्ये, बंधने, नीतिनियम यांचे मार्गदर्शन असते. बदलत्या काळानुसार नव्या स्मृति निर्माण होतात. ज्याला आपण सामाजिक वर्तणुकीचे नियम (code of social behaviour) म्हणतो ते त्या त्या काळाच्या संदर्भात विचारात घेऊन वागण्याचे तारतम्य पाळावे लागते. उदाहरणार्थ, आज ब्राह्मण दिवसात एकदाही संध्योपासना करताना आढळत नाहीत. अशा या काळात ब्राह्मण भक्ताने त्रिकाल संध्या करावी अशी अपेक्षा करणे चुकीचे ठरेल. पण तरी देखील प्रापंचिक भक्ताने त्या त्या काळात अनुरूप अशी नित्य व नैमित्तिक कर्मे केलीच पाहिजेत. श्रद्धा वाढविण्यासाठी व ती दृढ करण्यासाठी त्यांची आवश्यकता असते. उदाहरणार्थ, रोजचे ठराविक नामस्मरण, देवाची अथवा गुरूंची आरती, त्यांना नैवेद्य दाखवून नंतर तो प्रसाद म्हणून जेवणे, सद्ग्रंथवाचन आणि शक्य असेल तेव्हां भजन ह्या भक्ताच्या जीवन पद्धतीतील महत्त्वाच्या गोष्टी आहेत. नेहमीचे अन्न खाणे आणि तेच अन्न नैवेद्य दाखवून नंतर प्रसाद म्हणून खाणे यात भक्ताच्या दृष्टीने फरक आहे. प्रसादाने चित्तशुद्धी होते. याशिवाय सत्संगती मिळाली तर उत्तमच. भक्ताच्या नित्योपासनेशिवाय नैमित्तिक उपासनेत रामनवमी, गुरुपौर्णिमा, कृष्णाष्टमी इत्यादी उत्सवांचा समावेश होतो. सत्संगतीमध्ये या सर्व गोष्टींची अनायास प्राप्ती होते, कारण संत तेथे भगवंत असतो. नामस्मरण, भजन, निरूपण, इत्यादी गोष्टी तेथे असतातच.

भक्तिमार्गात इतर मार्गापेक्षा धोके कमी असतात पण त्या मार्गात धोके नाहीत असे मात्र नाही. म्हणून वर वर्णन केलेल्या गोष्टी साधकाने कराव्या नाहीतर तो पथभ्रष्ट होण्याची भीती असते. आळस व आत्मसंतुष्टता या दोन महत्त्वाच्या धोक्यांपासून त्याने सावध राहिले पाहिजे. संत सत्पुरुषांना अशी कोणती भीती नसते पण त्यांच्या वागण्याने ते साधकांपुढे आदर्श ठेवतात. श्रीरामकृष्ण म्हणतात, ''सिद्ध पुरुष तोच की ज्याचे वर्तन कदापि धर्म-नीतीच्या विरुद्ध जाणार नाही! जर एखादा कनक-कांता व दुष्कर्मे यात लिप्त झाला तर तो साधुसुद्धा नाही, मग त्यास सिद्ध म्हणणे दूरच राहिले.''

भगवद्गीतेच्या सोळाव्या अध्यायात भगवान श्रीकृष्ण सांगतात,

यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः।
न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥२३॥
तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ।
ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥२४॥

(जो शास्त्रविधीला सोडून आपल्या इच्छेने वागतो त्याला सिद्धि मिळत नाही, परम गति नाही आणि सुखही मिळत नाही. म्हणून तुम्हाला या कर्तव्य आणि अकर्तव्य याची व्यवस्था लावण्यात शास्त्रच प्रमाण आहे असे समजून शास्त्रविधीने नेमलेले कर्मच करणे तुला योग्य आहे.)

साधकाने व सिद्धानेही शास्त्रानुसार वर्तन ठेवावे हे सांगितल्यानंतर लौकिक व्यवहारात त्यांचे आचरण कसे असावे आणि देहरक्षणाच्या बाबतीत त्यांची वृत्ती कशी असावी ते नारदांनी पुढील सूत्रात सांगितले आहे.

## सूत्र चौदावे

**लोकोऽपि तावदेव किन्तु भोजनादिव्यापारस्त्वाशरीरधारणावधि॥**

**लोकः अपि= लौकिक कर्मे सुद्धा. तावद् एव= तोपर्यंतच. किन्तु= पण. भोजनादि व्यापारः = भोजन इत्यादि देहाच्या क्रिया. तु= परंतु. आ शरीर धारण अवधि= शरीर धारण केलेले आहे तो पर्यंत = मृत्यू येईपर्यंतच्या शरीरधारणाच्या कालात.**

जो पर्यंत मृत्यू येत नाही तो पर्यंतच्या काळात सिद्धांनी व साधकांनी देहरक्षणासाठी भोजनादि क्रिया केल्या पाहिजेत आणि सर्व काळ योग्य आचरण ठेवून लौकिक कर्मांचे पालन केले पाहिजे.

**विवरण** : मागील सूत्रात वैदिक कर्मांबद्दल सांगितले. या सूत्रात लौकिक कर्मांबद्दल सांगत आहेत. लौकिक कर्मात मुख्यतः ज्या समाजात आपण राहातो त्या समाजातील रूढी, परंपरा, शिष्टाचार इत्यादींचा समावेश होतो. पोशाखाच्या बाबतीत, तसेच लग्नमुंजींसारख्या व अन्य समारंभात साधकाचे हेतुतः समाजविरोधी वर्तन असू नये. यांपैकी काही गोष्टींचा साधनात अडथळा येऊ लागला तर साधकाने त्यांपासून दूर राहावे पण सुरुवातीला तरी त्यामुळे गैरसमज निर्माण होणार नाहीत याची शक्यतो काळजी घ्यावी. पुढे साधन करताना अशी एक अवस्था येते की केवळ लौकिक कर्मेच नव्हे तर वैदिक कर्मेही आपोआप गळून पडतात. पण ती अवस्था येईपर्यंत साधकाने मुद्दाम वेडेवाकडे वर्तन करू नये. श्रीरामकृष्णांच्या कमरेला एक वस्त्र असे. काही वेळा ते सुटून खाली पडल्याचेही त्यांना भान नसे तर काही वेळा अंगावर वस्त्र नाही अशा स्थितीत कपडे काखोटीस घेऊन ते बाहेर पडत. पण त्यांची ही अवस्था सामान्यांसाठी अनुकरणीय नाही. एकदा महर्षि देवेन्द्रनाथ ठाकुरांनी श्रीरामकृष्णांना ब्राह्मसमाजाच्या समारंभासाठी निमंत्रण दिले आणि कृपा करून आपण अंगरखा घालून या अशी त्यांना विनंती केली. तेव्हा श्रीरामकृष्ण म्हणाले, "बाबुओं की तरह सज-धज कर मैं नहीं जा पाऊँगा!"

जोपर्यंत शरीर आहे तोपर्यंत त्याच्या रक्षण पोषणासाठी अन्न, वस्त्र, निवारा यांसारख्या प्राथमिक गरजा भागवाव्या लागणारच. तथापि देह प्रारब्धानुसार चालतो हे ही लक्षात ठेवले पाहिजे. कारण आत्मज्ञान झालेल्या सत्पुरुषांना देहकष्ट झालेले आपण काही वेळा पहातो. आपणाला ते पाहून आश्चर्य व वैषम्य वाटते. पण सत्पुरुषांची देहबुद्धी गेलेली असल्यामुळे ते त्या देहकष्टांपलीकडे गेलेले असतात. आपण जसे दुसऱ्याच्या देहाकडे पहातो तसे ते स्वतःच्या देहाकडे पहातात. तथापि ही अवस्था येईपर्यंत साधकाने देह हे परमार्थाचे साधन आहे हे लक्षात ठेवून त्याचा सांभाळ केला पाहिजे. खरा साधक देहाला योग्य ते अन्न पाणी, कपडा, औषधे इत्यादी देईल पण देहाचे लाड करणार नाही. एकदा पू. तात्यासाहेब केतकर मालीश करून घेत होते. ते पाहून एका साधकांच्या मनात विकल्प आला की हे देहबुद्धी नाहीशी करावयाला सांगतात आणि इकडे आपल्या देहाचे लाड करत आहेत. पू. तात्यासाहेबांनी हे ओळखले आणि त्यांच्याकडे पाहून म्हणाले, 'आता हा देह महाराजांना दिला आहे ना! म्हणून तो नीट सांभाळला पाहिजे.'

मंदिर भिक्षेवर चालावे पण साधकाने आपल्या गरजा भागविण्यासाठी दुसऱ्यांवर अवलंबून न राहाता त्या स्वतःच्या कष्टाने कमाई करून भागविल्या पाहिजेत. नाहीतर उपासनेत मिंधेपणा येतो आणि पारमार्थिक नुकसान होते. परावलंबी उपासना ही निस्तेज उपासना होय. म्हणून साधकाने या बाबतीत सावध राहिले पाहिजे.

## १.३ : पराभक्तीची लक्षणे व उदाहरणे

### सूत्र पंधरावे

**तल्लक्षणानि वाच्यन्ते नानामतभेदात् ॥१५॥**

**तत्= त्या (परमप्रेमाची) म्हणजे भक्तीची. लक्षणानि= लक्षणे (Characteristic marks) वाच्यन्ते= सांगितली जातात. शब्दांनी वर्णिली जातात. नानामतभेदात्= विविध मतांतरांमुळे.**

**भक्तीच्या लक्षणांविषयी विविध मते असल्यामुळे (मतभेद असल्यामुळे) ती भिन्न भिन्न प्रकारांनी वर्णन केली जातात.**

**विवरणः** एखाद्या वस्तूचे वर्णन करताना त्या वस्तूची लक्षणे सांगावी लागतात. ती वस्तु तिच्यासारख्या वाटणाऱ्या इतर वस्तूंपेक्षा कोणत्या लक्षणांमुळे (Characteristics) वेगळी आहे ते सांगता येते तेव्हां त्या लक्षणांना प्रधान लक्षणे किंवा व्यवच्छेदक लक्षणे असे म्हणतात. उदाहरणार्थ, वर वर पहाता साखर व मीठ एकसारखी दिसली तरी त्यांचे भारमान (वजन), स्फटिकांची रचना यात फरक असतो. पण तो सहज लक्षात येत नाही. साखर गोड तर मीठ खारट असते. त्यामुळे चव हे त्यांच्यामधील भेदाचे प्रधान लक्षण ठरते. पराभक्तीच्या प्रधान लक्षणांसंबंधी वेगवेगळ्या आचार्यांनी वेगवेगळी मते मांडलेली आहेत. त्यांपैकी काही मते सांगून नंतर नारदांनी त्यांच्या मते भक्तीचे प्रधान लक्षण कोणते ते सांगितले आहे.

भक्तिपंथाने जाणाऱ्या साधकांना येणारा आत्मज्ञानाचा अनुभव एकच असला तरी भक्तीची व्याख्या करताना किंवा पराभक्तीची मुख्य लक्षणे सांगताना मात्र त्यांच्यामध्ये भेद दृष्टीस पडतो. याची दोन कारणे सांगता येतील. जर एका भक्ताची पूर्वपीठिका, मनोरचना, गुरुपरंपरा, साधनपद्धति इत्यादी दुसऱ्या भक्तापेक्षा वेगळ्या असतील तर साहजिकच त्याला आलेल्या अनुभवाच्या वर्णनात वेगळेपणा राहील. वास्तविक आत्मानुभव ही शब्दांनी सांगता येण्यासारखी गोष्टच नाही, म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज "कैसें बोटानें दाखवूं

तुला। पाहें अनुभव गुरूच्या मुला।" असे म्हणतात. पण तरीदेखील ज्याला हा अनुभव येतो तो स्वान्तःसुखासाठी व पुढच्यांना मार्गदर्शन म्हणून तो सांगू पहातो. असे करताना शब्दांचे अपुरेपण त्याला जाणवत असते. एका गुरुपरंपरेतील साधकांना सामान्यतः एकाच प्रकारचे अनुभव आले तरी ज्याचे शब्दज्ञान समृद्ध आहे तो त्याचा अनुभव जास्त चांगल्या प्रकारे सांगू शकेल. पराशर पुत्र महर्षि वेदव्यास, गर्ग व शांडिल्य यांनी परमप्रेमा भक्तीची जी लक्षणे सांगितलेली आहेत ती पुढील १६, १७, व १८ या तीन सूत्रांत सांगून त्यानंतरच्या १९ व्या सूत्रात नारदांनी त्यांना योग्य वाटणारी प्रधान लक्षणे सांगितली आहेत. पहिल्या तीन सूत्रांत भक्तीच्या क्रिया, शब्द व भक्ताचे मन या तीन वेगवेगळ्या अंगांना महत्त्व दिलेले आहे. येथे एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की आपले स्वतःचे वेगळे मत सांगताना नारदांनी त्यांच्या आधीच्या आचार्यांनी मांडलेली मते चुकीची आहेत असे म्हटलेले नाही व त्यामुळे ती खोडून काढण्याचा प्रयत्नही केलेला नाही.

## सूत्र सोळावे

**पूजादिष्वनुराग इति पाराशर्यः ॥१६॥**

**पूजा=पूजा. आदिषु= आधीच्या - संबंधित गोष्टी. अनुरागः= प्रेम, आसक्ति. अनु= नंतर. राग= प्रेम. म्हणून अनुराग= प्रेमपूर्वक पूजा भक्ती करू लागल्यानंतर तिच्याबद्दल वाटू लागलेली ओढ, आसक्ति. पाराशर्यः= पराशर पुत्र व्यास महर्षि.**

**भगवंताची पूजाभक्ती मोठ्या प्रेमाने व आदराने करणे व त्यासाठी आधीची व इतर आनुषंगिक कामेही अतिशय प्रेमाने व श्रद्धेने करणे हेच भक्तीचे प्रमुख लक्षण होय असे व्यास महर्षि म्हणतात.**

**विवरण** : भगवंताची पूजाभक्ती मनःपूर्वक करणे आणि पूजेसंबंधीची सर्व कर्मे अतिशय प्रेमाने व श्रद्धेने करणे आणि त्याबद्दल ओढ वाटणे हे भक्तीचे मुख्य लक्षण आहे असे व्यासमहर्षि सांगतात. पूजा हे स्थूलातले कर्म असले तरी त्यामुळे आपण ज्या देवतेची पूजा करतो, सोहळे करतो त्याच्याबद्दल प्रेम निर्माण होते. भगवंताचे अनुसंधान राहाण्यास पूजा फार उपयोगी पडते. पूजेमध्ये पावित्र्य असते. पूजाग्रंथात षोडशोपचार पूजा सांगितलेली आहे. हे उपचार पुढीलप्रमाणे आहेत. (१) आवाहन : ज्या देवतेची, उदाहरणार्थ श्रीरामाची, श्रीकृष्णाची अथवा सद्गुरूंची पूजा करावयाची असेल त्यांना

बोलावणे. (२) पाद्य : त्या मूर्तीस अथवा प्रतिमेस पाय धुण्यासाठी पाणी देणे. (३) अर्घ्य : गंध, फुले, अक्षता मिश्रित पाणी देणे. (४) आसन : आसन ग्रहण करण्याची विनंती करणे. (५) आचमन : तोंड धुण्यासाठी व पिण्यासाठी पाणी देणे. (६) स्नान : यात पंचामृत स्नान, सुगंधी द्रव्यांनी स्नान, उष्णोदक स्नान यांचा समावेश होतो. (७) देवाचे अंग पुसून वस्त्र व उपवस्त्र (शेला उपरणे) समर्पण (८) यज्ञोपवीत : देवास हे वस्त्रसमर्पणापूर्वी व देवीस हार, दागिने वस्त्रसमर्पणानंतर (९) चंदन, कस्तुरी इत्यादी सुगंधी द्रव्यांचे विलेपन (१०) फुले व हार समर्पण (११) धूप (१२) दीप (१३) नैवेद्य, अन्न व फ़ळे (१४) मंत्रपुष्प (१५) दक्षिणा व (१६) नमस्कार. यांखेरीज पूजेत तांबूल व विश्रांती यांचाही समावेश केला जातो. रोज षोडशोपचार पूजा करणे मंदिरातच शक्य असते. म्हणून घरी सामान्यतः स्नान, गंध व पुष्पसमर्पण, धूप, दीप, व नैवेद्य, असे पाच उपचार करतात. हे सर्व उपचार करण्याचा उद्देश भगवंताचे सतत अनुसंधान राहावे, प्रेम निर्माण व्हावे व वाढावे हा असतो. पण बरेचदा याचा विसर पडतो आणि केवळ कर्मकांड शिल्लक राहाते. पूजा करताना शरणागत भाव उत्पन्न झाला पाहिजे. म्हणून व्यासांनी पूजादिषु अनुरागः म्हटले आहे. भक्ताला भगवंताचे प्रेम असते. पण भगवंताचे दिव्यत्व आणि ऐश्वर्य यांची जाणीव त्याला झाली की त्या रागाचे म्हणजे प्रेमाचे अनुरागात रूपांतर होऊन मग त्याला भगवंताशिवाय चैन पडेनासे होते. पूजेतून अनुराग निर्माण झाला नाही तर बाह्य पूजा हा कनिष्ठ प्रकार होतो. पण भक्ताच्या मनात भगवंताचे गाढ प्रेम असेल आणि चित्तशुद्धी होऊन त्याच्या वासना क्षीण झाल्या असतील तर आजही बाह्य पूजा करताना भक्ताने दाखवलेला नैवेद्य देव ग्रहण करतो असा भक्तांचा अनुभव आहे.

योगी श्री कृष्णप्रेम स्वतः बनवलेल्या हलव्याचा (शिऱ्याचा) रोज श्रीकृष्णाला नैवेद्य दाखवीत असत. त्यांनी दाखविलेला नैवेद्य श्रीकृष्णांनी कसा खाल्ला याचे वर्णन श्री. दिलीपकुमार रॉय यांच्या पुस्तकात दिले आहे. मोतीराणीनी तो प्रसंग दिलीपकुमारांना स्वतः कृष्णप्रेम व त्यांच्या गुरु यशोदा माँ यांच्या समक्ष सांगितला होता. त्या म्हणाल्या, "Listen Dilipda ! Ba cooks, as you know, the Lord's BHOGA- the HALWA pudding- and offers, day after day, before His image in our Shrine. Once it so happened that after the offering- when we closed the temple- door and came out to meditate, as we

always do- he started suddenly and said: 'Let us go and see if the Lord has actually taken the HALWA.' MA only smiled but I was thrilled ! We went. And lo,- she caught her breath- 'here in our temple room, we all saw that a portion of the HALWA had been scooped out by the Lord- we all bear witness, Dilipda, I swear to you !" - Yogi Sri Krishnaprem by Dilip Kumar Roy. Bharatiya Vidya Bhavn, Bombay 400 007- 1975. page 78.

(दिलीपदादा ऐका! आमच्या येथील मंदिरातील मूर्तीला (श्रीकृष्णाला) नैवेद्य दाखविण्यासाठी बा (कृष्णप्रेम) नेहमी हलवा (शिरा) तयार करतात हे तुम्हाला माहीत आहे. एक दिवस असे झाले की नैवेद्य दाखवून आम्ही मंदिराचे दार बंद केले आणि नेहमीप्रमाणे बाहेरच्या बाजूस ध्यानासाठी बसलो. एकाएकी कृष्णप्रेम दचकले आणि म्हणाले, "आपण आत जाऊ या आणि भगवंताने खरोखर हलवा ग्रहण केला आहे का ते पाहू या." माँ नी (यशोदा माँ-कृष्णप्रेम यांच्या गुरु) नुसते स्मित केले. पण माझ्या शरीरावर मात्र (औत्सुक्यामुळे) काटा उभा राहिला! आम्ही आता गेलो 'आणि काय आश्चर्य', तिने आपला श्वास क्षणभर रोखून धरला - 'येथे आमच्या या मंदिरात आम्ही सर्वांनी (आमच्या डोळ्यांनी) पाहिले की हलव्यातला काही भाग भगवंतांनी चमच्याने काढून घेतलेला होता - दिलीपदादा, आम्ही सर्वजण या घटनेला साक्षी आहोत. मी शपथ घेऊन सांगते.")

दिलीपकुमार रॉय या संदर्भात तळटीपेत लिहितात :

Shri Aurobindo wrote to me later endorsing Krishnaprem's experience about the prasad as authentic, assuring me that such thing could and did happen. Only he added that it must be borne in mind that such phenomena take place only when the BHOG is offered by an aspirant of rare purity and dedication." Ibid p.79 Footnote

(कृष्णप्रेम यांचा प्रसादासंबंधीचा अनुभव पूर्ण सत्य आहे असा मान्यतेचा शेरा श्रीअरविंदानी मला पत्रातून कळविला. त्यांनी लिहिले की अशा घटना (पूर्वी) घडल्या आणि (आताही) घडतात. त्यांनी पुढे लिहिले की, मात्र हे

लक्षात ठेवले पाहिजे की जेव्हा नैवेद्य दाखविणारा साधक असाधारण पवित्र आणि समर्पित असतो तेव्हाच अशा घटना घडतात.)

या अवतरणावरुन लक्षात येईल की महर्षि व्यासांनी म्हटल्याप्रमाणे पूजादि कृत्यांमधून भगवंताविषयी अनुराग निर्माण होतो. श्रीरामकृष्ण परमहंस कालीमातेची पूजा करताना भावविभोर होऊन तन्मय झाले की कालीमातेला वहाण्यासाठी हातात घेतलेली फुले स्वतःच्या मस्तकावर वहात. वल्लभ संप्रदायातील पुष्टिमार्ग पूजोपचारांना अतिशय महत्त्व देतो. "वल्लभाचार्य म्हणतात की पुष्टिमार्ग हा वर्ण, जाति, देश इत्यादि भेदांनी रहित असल्याने या कलिकालात जीवांना एकमात्र सुलभ मार्ग आहे. भगवंताच्या अनुग्रहाच्या सिद्धीसाठी एकांत निष्ठेने व शुद्ध अनुरागाने त्याची सेवा करणे, हे जीवाचे श्रेष्ठ कर्तव्य आहे. ...या सेवेचे तीन प्रकार सांगितलेले आहेत - १) तनुजा - आपल्या शरीराने भगवंतासाठीच क्रिया करणे व शरीरव्यापार भगवंताला एकनिष्ठेने समर्पण करणे. २) वित्तजा - आपल्या जवळचे धन भगवत्कार्यासाठी वेचणे व ३) मानसी - मनाच्या द्वारे भगवंताची सेवा करणे." (भारतीय संस्कृतिकोश खंड ८ वा पृ. ५१३-१४ पंडित महादेवशास्त्री जोशी.) भगवंताची पूजा करताना आपल्या जवळ जे उत्तम आहे ते त्याला द्यावेच पण त्याचबरोबर भगवंताला जे आवडते ते देण्याचा प्रयत्न असावा. व्यासांनी सांगितलेल्या ह्या मार्गात साधकाने सावधानता ठेवली पाहिजे कारण सवयीने एखादी गोष्ट करू लागल्यावर त्यामधील भाव जाऊन केवळ बाह्य उपचारांचे कर्मकांड होण्याची भीती असते. पूजादिषु अनुरागः म्हणताना पूजेच्या आधीची तयारी देखील अतिशय आवडीने व प्रेमाने केली पाहिजे. सुवासिक फुले गोळा करणे, फुलांचे हार करणे, गंध उगाळणे, नैवेद्याची, पंचामृत स्नानाची तयारी करणे इत्यादी गोष्टी करताना हे मी माझ्या देवासाठी करत आहे असे स्मरण सतत राहिले पाहिजे. विनोबांनी म्हटल्याप्रमाणे देवाला तांदुळांचा लक्ष वाहताना तांदुळांच्या एक लक्ष या संख्येपेक्षा प्रत्येक तांदूळ निवडून मोजून बाजूला घेताना देवाचे नाम मुखात येणे महत्त्वाचे आहे. पूजा करताना शरणागत भाव वाढला पाहिजे.

बाह्य पूजेला देशकालपरिस्थितीच्या मर्यादा पडतात. मानसपूजेत या मर्यादा राहात नाहीत. मानसपूजा कशी करावी, तिचा हेतु काय असावा, मानसपूजेचे पर्यवसान काय होते यासंबंधी प्रा. के. वि. (पू. बाबा) बेलसरे यांनी त्यांच्या श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज (चित्रमाला) या पुस्तकात सविस्तर दिले

आहे. साधकांसाठी ते अतिशय उपयुक्त असल्यामुळे विस्तारदोष मान्य करून ते येथे देत आहे.

## मानसपूजा

''मानसपूजा म्हणजे मनाने केलेली पूजा, वास्तविक पूजा मनाशिवाय करता येणे शक्य नाही. पण पूजेमध्ये होणारे सोळा उपचार पाहिले तर ते देहाने करून पूजा होऊ शकते. उपचारांमध्ये स्नान, पत्रपुष्प, फुलांचा हार, नैवेद्य आरती इत्यादी उपचार प्रत्यक्ष असतात. प्रत्यक्ष म्हणजे दृश्यामधील असतात. पण मानसपूजेमध्ये मनाने आपल्या अंतर्यामी देवतेची मूर्ति कल्पून तिला मनानेच उपचार करायचे असतात. बाहेरची पूजा मुख्यतः बहिर्मुख असते तर मानसपूजा अंतर्मुख असते. त्यामध्यें विशेष लक्षात ठेवण्याची गोष्ट अशी कीं आपल्या हृदयात देवता वास करते व आपण तिच्यासमोर बसून तिची पूजा करीत आहोत अशी दृष्टि ठेवावी लागते. आपले मन मानसपूजेला योग्य होण्यास पुढील गोष्टी कराव्यात. पहाटें लवकर उठावे व हातपाय धुवून मानसपूजेला बसावे. रात्री झोप चांगली झाल्याने जागेपणचे मन शांत असते. म्हणून मनाने देवतेची मूर्ति हृदयात विराजमान आहे अशी कल्पना करणे सोपे जाते. या पूजेसाठी स्नान करणे शक्य असल्यास इतर स्वच्छतेची जरूर नाही. स्नान झाले नसल्यास हातपाय स्वच्छ धुवून तोंड स्वच्छ करून पूजेसाठी अंथरुणातच बसावे. आरंभी अर्धपद्मासन घालावे, यास सहजासन म्हणतात. आसनावर स्थिर झाल्यावर डोळे मिटावे व आपल्या देवतेला मनाने साष्टांग नमस्कार घालावा. पूजा श्रीसद्‌गुरूंची असेल तर त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवावे. नंतर थोडा प्राणायाम करावा, त्याने चित्त एके ठिकाणी गोळा होते. तो प्राणायाम असा. प्रथम उजव्या हाताच्या अंगठ्याने उजवी नाकपुडी दाबांवी. डाव्या नाकपुडीने श्वास आंत घ्यावा. मग सर्व बोटांनी दोन्ही नाकपुड्या बंद कराव्या. श्वास आंतमध्ये कोंडला जातो. तो थोडाकाळ स्थिर करावा. किती वेळ तो स्थिर करावा हे आपल्या अभ्यासावर अवलंबून राहते. साधारणपणे पांच ते दहा सेकंद स्थिर करण्यास अडचण पडत नाही. नंतर उजव्या नाकपुडीवरील अंगठा काढून कोंडलेला श्वास सावकाश बाहेर सोडावा. असे दोन तीन वेळा केले म्हणजे मन आपोआप हृदयात गोळा होते. मन गोळा झाल्यावर आपल्या उपास्य देवतेचे दोन्ही चरण कल्पनेने मनासमोर आणावे. आपल्या सद्‌गुरूंचे चरण आणणे सोपे जाते. त्यांच्या चरणांवर हात ठेवून पुढील संकल्प करावा. तो संकल्प असा. ''ही मानसपूजा ईश्वराचे साक्षात् दर्शन

व्हावे म्हणून मी करतो.'' सद्गुरूसमोर पुढील संकल्प करावा, ''श्री गुरुमहाराज! मी आपल्या कृपेला पात्र व्हावा, मला आपला अखंड सहवास लाभावा म्हणून ही पूजा मी करतो.'' हे दोन्ही संकल्प मनाने आंतमध्ये उच्चारावे. संकल्पाच्या भाषेमध्ये रोज कमीजास्त फरक झाला तरी मूळ भावार्थ तोच असावा. संकल्प झाल्यावर स्नान, वस्त्र-उपवस्त्र, हार, धूपदीप इत्यादि उपचार मनाने करावे. ते उपचार झाल्यावर मनानेच उत्तम पदार्थांचा नैवेद्य दाखवावा. नैवेद्य सेवन करून झाल्यावर विडा अर्पण करावा. तो खाऊन झाल्यावर त्यांना म्हणजे देवतेला व श्रीसद्गुरूंना विश्रांति द्यावी. विश्रांतिसाठी ते लवंडले कीं त्यांच्या चरणांवर मस्तक ठेवून पूजा विसर्जन करावी.''

''मानसपूजेचा मुख्य उद्देश्य आपल्या मनाला ईश्वराशी किंवा श्रीसद्गुरूशी जोडण्याचा आहे. तसे पाहिले तर दृश्य सगुण मूर्तीची अथवा चित्राची किंवा पादुकांची बाह्यपूजा करणे ही अध्यात्म साधनेची प्रथमावस्था आहे. त्या अवस्थेमध्यें थोडा वेळ तरी आपला देह, इंद्रिये आणि अवधान (लक्ष) आपल्या ध्येयाकडे गुंतून राहाण्यास मदत होते. पूजा करणाऱ्याची अध्यात्मिक प्रगति होऊ लागली म्हणजे पूजेतील बाह्य उपचार नकळत क्षीण होतात. पूजा करणारा सहज अंतर्मुख होतो आणि आपल्या देवतेशी अथवा श्रीसद्गुरूंशी नकळत मनाने चिकटतो. मनाने चिकटणे म्हणजे खऱ्या अर्थाने अंतरंगांत प्रवेश होणे समजावे. या अंतरंगांत प्रवेशाची एक महत्त्वाची खूण अशी कीं पूजा करणाऱ्याचे अंतःकरण आंतमध्यें रमू लागते. आपल्या अंतरीं आपला मी जितक्या खरेपणाने रहातो तितक्या खरेपणाने ईश्वर किंवा सद्गुरु राहू लागतात. जागेपण, स्वप्न आणि गाढ झोप या तिन्ही अवस्थांमध्यें आंतील अस्तित्वाचे भान मंदावत नाही. शिवाय आपला अहंकार, आपला संसार, आपले सगळे जीवन आपल्या देवतेला किंवा श्रीसद्गुरूला समर्पण करावे ही अनिवार इच्छा सहज उत्पन्न होते. त्याचा परिणाम असा होतो कीं पूजा करणाऱ्याच्या वासनेचे उदात्तीकरण होते. म्हणजे त्याच्या वासनांचे क्षुद्र स्वरूप पालटून त्यांना सूक्ष्म असे ईश्वरीय स्वरुप येते. अखेर संसारांतील प्रत्येक घटनेमध्यें त्याला ईश्वराचा किंवा श्रीसद्गुरूंचा हात दिसतो.''

## ''मानसपूजेतील अध्यात्माचा विकास''

मानसपूजेचा अंतिम हेतु पूजा करणाऱ्याचे मन ईश्वराने किंवा श्रीसद्गुरूने भरून जाणे हा आहे. या प्रक्रियेमध्ये चार अवस्था येतात.

**पहिली अवस्था -** मानसपूजेला प्रारंभ केला असतां देवतेची किंवा श्रीसद्गुरूंची सबंध प्रतिमा मनासमोर येत नाही. मूर्तीचे पाय आले तर वरचा भाग समोर येत नाही व वरचा भाग समोर आला तर पाय मनापुढून निसटतात. या अभ्यासाला चिकाटीची अत्यंत जरूर असते. म्हणून डोळे उघडे करून पुन्हां पुन्हां बाहेरची प्रतिमा बघावी आणि डोळे झांकून ती मनासमोर आणण्याचा प्रयत्न करावा. साधारणपणे वर्ष दीड वर्षांत मनामध्यें प्रतिमा स्थिर होऊ लागते. बहुतेक स्थिर झालेली ही प्रतिमा जिवंत नसते. परंतु तिला मनासमोर ठेवून पूजेचे उपचार करीत गेले तर एखादे दिवशी ती अचानक सचेतन होते.

**दुसरी अवस्था -** प्रतिमा सचेतन झाली म्हणजे तिची संगत घडू लागते. या संगतीमध्यें स्नान, अर्चा म्हणजे पूजा, आरति इत्यादि उपचार आणि नैवेद्य याला निराळी रंगत येते. आपल्या मनामध्यें जे जे उपचार करावे असे वाटते ते अगदी मनसोक्तपणे करावे. ते करीत असतां किती वेळ जातो याचे भान रहात नाही. विशेषतः देवतेच्या खाण्यापिण्यामध्यें व शृंगार करण्यामध्यें पूजा करणाऱ्याचा पुष्कळ वेळ जातो. नंतर कितीतरी वेळ पूजेचे समाधान मनामध्यें टिकते.

**तिसरी अवस्था -** तिसऱ्या अवस्थेमध्यें देवतेशी किंवा सद्गुरूंशी संवाद सुरू होतो. संसारांतील प्रत्येक घटना त्यांच्या कानावर घातली जाते. इतकेच नव्हे तर जीवनांत काय करावे व काय करू नये याबद्दल आंतून स्वच्छ मार्गदर्शन होते. पुष्कळ वेळा पुढे येणाऱ्या अशुभ प्रसंगाची सूचना मिळते. जागेपणीच नव्हे तर स्वप्नांमध्यें देखील आपला देव अथवा आपले सद्गुरु आपल्या जवळ आहेत याचे स्पष्ट भान रहाते. ही अवस्था ध्यानाची पूर्वावास्था होय.

**चौथी अवस्था -** मानसपूजेच्या या शेवटच्या अवस्थेमध्यें आंतील ईश्वराची किंवा सद्गुरूची प्रतिमा बाहेर जागेपणी अखंड बरोबर रहाते. आपला देव अथवा आपले सद्गुरु आपल्या बरोबर सतत रहातात असा माणसाला प्रत्यक्ष अनुभव येतो. त्यांची निराळी पूजा करावी लागत नाही. आपले प्रत्येक कर्म त्यांच्यासाठींच घडते. इतकेच नव्हे तर त्यांना विसरून माणसाची कोणाचीही हालचाल होत नाही. भक्त जेथें जातो व तो जे जे करतो त्यामध्यें ईश्वराची किंवा सद्गुरूची सत्ता काम करते असे अगदी मनापासून वाटते. यालाच संत अनुसंधान असे म्हणतात. मानसपूजेच्या साधनेने ज्याला अनुसंधान साधले त्याला भगवंताचे साक्षात् दर्शन होण्यास वेळ लागत नाही.

**मानसेपूजेचा समारोप** - पूज् धातूपासून पूजा शब्द तयार होतो. जे पूज्य आहे ते वंद्य व पवित्र असते. ते आदरणीय व माननीय असते. जे वंद्य आहे व खरोखर आदरणीय आहे त्याचा पद्धतशीर व मनापासून आदर करणे म्हणजे त्याची पूजा करणे होय. जे पूज्य आहे त्याचा अर्थ समजून घ्यावा. पूज्य म्हणजे शून्य आणि शून्य म्हणजे संख्येचा अभाव दाखवणारे लहान वर्तुळ. वर्तुळ हे पूर्णपणाचे चिन्ह आहे. म्हणून विश्वामध्यें जे पूर्ण आहे ते शून्य दाखवते. जगात जे जे दिसते ते सारे अपूर्ण. त्या दिसण्याला दृश्यात आणणारी सत्ता स्वतः अदृश्य आहे. तिला ईश्वर म्हणतात. म्हणून शून्य म्हणजे पूर्ण ईश्वर होय. ईश्वर पूर्णपणाने युगानुयुगे जशाचा तसाच असतो. पूजेमध्ये त्या ईश्वराची उपासना असते. उपासना म्हणजे जवळ बसणे, सन्निध असणे किंवा निकट संबंध ठेवणे. चैतन्यमूर्ति ईश्वर सनातन आहे, अनादि आहे व अनंत आहे. त्याच्याशी अत्यंत निकट संबंध जोडणे हा पूजेचा प्राण आहे. पूजेच्या आरंभी पूजा करणारा ईश्वराहून मीपणाने निराळा असतो. पण पूजा व्यवस्थित होऊ लागली म्हणजे तिचा परिणाम घडून पूजा करणाऱ्याचा मीपणा कमी होऊ लागतो. जेव्हां पूजा करणाऱ्याचा मीपणा ईश्वराला पूर्णपणे अर्पण होतो तेव्हां खरी पूजा घडते आणि पूजा करणारा ईश्वराशी कायम चिकटतो. मीपणा विसरणे म्हणजे अहंकारशून्य होणे. जो अहंकारशून्य होतो तो स्वतः पूज्य बनतो. माणसाचा अहंकार ज्याच्यामध्यें सहज विलीन करता येईल अशी दोन पूजास्थाने आहेत.

१) ईश्वराचे एखादे अवतार स्वरूप - उदाहरणार्थ भगवान रामचंद्र, भगवान श्रीकृष्ण, भगवान शंकर इत्यादि. अवतारांमध्यें ईश्वराला मानवरूप दिलेले असते. मनाने त्या रूपाची धारणा करणे सोपे जाते. आपला मानवदेहधारी ईश्वर सर्वज्ञ आहे, तो सर्वशक्तिमान आहे, त्याच्या शक्तीने सर्व जगत चालते. म्हणून आपल्या जीवनात घडणाऱ्या साऱ्या गोष्टी त्याच्या इच्छेने घडतात ही श्रद्धा पूजेची पार्श्वभूमि असते. हाच नियम संतसत्पुरुषांना लागू पडतो. त्यांचा जीव ईश्वराच्या ठिकाणीं पूर्णपणें विलीन झालेला असतो. म्हणून संत देहाने माणूस दिसला तरी त्याचे अंतर्याम ईश्वरानें भरून गेलेले असते. त्याच्या अंतरीं ईश्वर कांठोकांठ भरून गेलेला आहे हा भाव मनामध्यें स्थिर होण्यास पूजा - त्यांतले त्यांत मानसपूजा - हा रामबाण उपाय आहे. येथें एक अनुभवाची सूचना देणे इष्ट आहे. मानसपूजेमध्यें जे उपचार करायचे त्यांना ईश्वराच्या नामाची किंवा श्रीगुरूने दिलेल्या मंत्राची जोड दिली तर आतमधील प्रगती जलदगतीने होते हे

ध्यानात ठेवावे. त्याचे कारण उघड आहे. नामस्मरणामध्यें श्रीगुरूचे अस्तित्व साक्षात् वास करते. त्या अस्तित्वाची जाणीव निर्माण करण्याचे सामर्थ्य नामामध्ये असते. म्हणून मानसपूजेच्या प्रत्येक अवस्थेमध्ये नामस्मरणाची संगत सोडू नये.

२) पुष्कळ वेळा उपचार करतांना पूजा करणारा आणि घेणारा दोघेही नामस्मरणाने स्वतःला विसरतात. त्या स्थितीमध्ये ईश्वराच्या किंवा श्रीसद्गुरूच्या सहवासाचा आनंद भरून रहातो. ही अवस्था आली म्हणजे पूजा करणाऱ्याला आपल्या पूज्य दैवतामध्यें संपूर्ण विलीन होऊ नये असे वाटते. येथे एक प्रकारचे साक्षीपण प्राप्त होते.

प्रार्थना झाल्यावर पूजा विसर्जन करायची असते. बाहेरची पूजा विसर्जन करणे म्हणजे पूजेची क्रिया थांबवणे. परंतु मानसपूजेचे विसर्जन म्हणजे आपल्या देवतेला किंवा श्रीसद्गुरूला आपल्या हृदयांत विश्रांती देणे. पण ती विश्रांती जरी दिली तरी त्यांच्या अस्तित्वाची भावना कायम ठेवणें. इतकेच नव्हे तर दिवसभरांत जेव्हां जेव्हां विशेष कर्म करण्याचा प्रसंग येतो तेव्हां तेव्हां मनाने त्यांच्या पायावर मस्तक ठेवून ते कर्म करणें. थोडक्यांत मानसपूजेनंतर त्यांचा अखंड सहवास ठेवणे हें मानसपूजेचे मर्म आहे.''- (श्रीब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज चित्रमाला. त्रिदल प्रकाशन मुंबई ४०० ००४ पृष्ठे १९ ते २३ मधून)

संतांनी मानसपूजेस महत्त्व दिले आहे. तुकाराम महाराज म्हणतात : ''मनोमय पूजा। हेचि पढिये केशीराजा ॥ १॥ घेतो कल्पनेचे भोग। न मानती बाह्यरंग ॥ २॥'' ईश्वराला मानसपूजा आवडते. आपण कल्पनेने अर्पण केलेल्या वस्तूंचा तो प्रत्यक्षात भोग घेतो. समर्थ रामदास अर्चन भक्ती सांगताना बाह्य पूजेचे वर्णन झाल्यावर म्हणतात : ''ऐसी पूजा न घडे बरवी। तरी मानसपूजा करीत जावी। मानसपूजा अगत्य व्हावी। परमेश्वरासी॥ मनें भगवंतास पूजावें। कल्पून सर्वही समर्पावें। मानसपूजेचें जाणावें। लक्षण ऐसें॥ जें जें आपणास पाहिजे। तें तें कल्पून वाहिजे। येणें प्रकारें कीजे। मानसपूजा॥'' दासबोध ४.६.३१,३२,३३.

अनुभव असा आहे की बाह्यपूजा ज्यांच्या अंगवळणी पडलेली असते आणि ज्यांची कल्पना तरल असते त्यांना मानसपूजा लवकर जमते. बाह्यपूजा असो अथवा मानसपूजा, फलाशा न ठेवता परमेश्वराबद्दल अनिवार ओढ असणे ही निर्मल भक्तीची उच्च अवस्था मानली जाते. खरोखर स्थूलातून सूक्ष्मात आणि

सूक्ष्मातून साक्षात भगवंताशी तन्मय होण्याचा पूजाभक्ति हा राजमार्ग होय. साधकदशेत सुरू केलेली पूजाभक्ति सिद्ध दशेतही भक्त चालू ठेवतो याची अनेक कारणे आहेत. पहिले म्हणजे त्याला इतरांना मार्ग दाखवावयाचा असतो. दुसरे असे की ज्या मार्गाने त्याला परतत्त्वाचा लाभ होतो त्या मार्गाचे प्रेम त्याला पूजेत रमविते. "आधी होता संतसंग। तुका झाला पांडुरंग। त्याचे भजन राहीना। मूळ स्वभाव जाईना॥" हेच खरे!

आपणाजवळचे उत्तमोत्तम घेऊन ज्याप्रमाणे मूर्तीची पूजा अथवा सेवा करता येते त्याचप्रमाणे सर्व प्राणिमात्रात ईश्वर भरला आहे हे जाणून त्यांची सेवा करणे ही देखील व्यापक पूजा होय. उच्च कोटीचे साधकच हा व्यापक भाव सर्वकाळ ठेवून समाजाची पूजा करू शकतात. सामान्य साधकाच्या दृष्टीने हा मार्ग अवघड आहे.

आता यानंतर नारदांनी गर्ग मुनींचे मत सांगितले आहे ते पाहू.

## सूत्र सतरावे

**कथादिष्विति गर्गः ॥१७॥**

**कथा -गोष्ट, हरिकथा. आदिषु -आधीची. (अनुरागः - आसक्ति, प्रेम) इति - असे. गर्गः - गर्गमुनी.**

**हरिकथा आदींविषयी प्रेम असणे हेच पराभक्तीचे मुख्य लक्षण आहे असे गर्गमुनी म्हणतात.**

**विवरण** : नवविधा भक्तीमध्ये श्रवणभक्तीनंतर कीर्तनभक्तीचा उल्लेख केलेला आहे. व्यास महर्षींनी पूजा ह्या भक्तीच्या प्रकाराला महत्त्व दिले आहे तर गर्गमुनी कथा कीर्तनादि प्रकारांमध्ये अनुराग म्हणजे प्रेम असणे हे भक्तीचे लक्षण म्हणून सांगत आहेत. भगवंताचे दर्शन होऊन त्याचे दिव्यत्व आणि ऐश्वर्य भक्ताला जाणवू लागले की प्रेमाचे अनुरागात रूपांतर होते. अनुरागात दोन्ही बाजूंनी परस्परांविषयी प्रेम निर्माण होते. भक्ताला देवाचे प्रेम असते तसे देवालाही भक्ताचे प्रेम लागते. 'जन्म कर्म च मे दिव्यम्' असे भगवंतांनी गीतेत सांगितले आहे. भगवंताच्या दिव्य कर्मांचे, त्याच्या लीलांचे वर्णन करणे व त्याची गोडी वाढणे हे भक्तीचे लक्षण आहे. कथा, कीर्तन, संकीर्तन करणारे आणि ते ऐकणारेही उद्धरून जातात. शुकाचार्यांनी परीक्षितीला भागवत सांगितले आणि त्यामुळे परीक्षितीला आत्मज्ञान झाले. स्वतः नारद कीर्तनभक्तीचे अध्वर्यु मानले जातात. त्यांचे वर्णन करताना भागवतात म्हटले

आहे; "अहो देवर्षिर्धन्योऽयं यत्कीर्तिं शार्ङ्गधन्वनः। गायन्माद्यन्निदं तन्त्र्या रमयत्यातुरं जगत्॥ १.६.३९. देवर्षि नारद खरोखर धन्य होत. कारण आपल्या मधुर वीणेचा झंकार करत श्रीहरीच्या यशकीर्तीचे गान करताना ते स्वतः धुंद होतात आणि त्याचबरोबर दुःखी लोकांना आनंद देतात.

भगवंत सांगतात "नाहं वसामि वैकुण्ठे योगिनां हृदये रवौ। मद्भक्ताः यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद॥" याचा अनुवाद करताना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "जयांचे वाचेपुढां भोजें। नाम नाचत असे माझें। जें जन्मसहस्रीं वोळगिजे। एकवेळ मुखासि यावया ॥२०६॥ तो मी वैकुंठीं नसें। एक वेळ भानुबिंबींही न दिसें। वरी योगीयांचींही मानसें। उमरडोनि जाय ॥२०७॥ परी तयांपाशीं पांडवा। मी हारपला गिंवसावा। जेथ नामघोषु बरवा। करिती ते माझे ॥२०८॥ कैसे माझां गुणीं धाले। देशकाळातें विसरले। कीर्तनसुखें झाले। आपणपांचि ॥२०९॥ कृष्ण विष्णु हरि गोविंद। या नामाचे निखळ प्रबंध। माजी आत्मचर्चा विशद। उदंड गाती ॥२१०॥" ज्ञानेश्वरी अ.९

तुकाराम महाराज म्हणतात, "कथा त्रिवेणीसंगम देव भक्त आणि नाम। तेथीचें उत्तम चरणरज वंदितां ॥१॥ जळती दोषाचे डोंगर शुद्ध होती नारीनर। गाती ऐकती सादर जे पवित्र हरिकथा ॥२॥" परमप्रेमाचा लाभ झाला की भक्त अमृत होतो. समर्थ रामदास सांगतात, "भगवंतास कीर्तन प्रिय। कीर्तनें समाधान होय। बहुत जनासी उपाय। हरिकीर्तनें कलियुगीं ॥७॥ कीर्तनें महादोष जाती। कीर्तनें होय उत्तम गती। कीर्तनें भगवत्प्राप्ती। यदर्थीं संदेह नाहीं ॥२७॥" दासबोध ४.२

कथेमुळे अध्यात्माची गोडी निर्माण होते. कथा कीर्तन करणाऱ्याचा भाव, श्रोत्यांच्या हृदयामध्ये संक्रमित होतो. आपले दोष लक्षात येऊ लागतात, ते नकोसे वाटू लागतात व हळूहळू चित्त शुद्ध होऊ लागते. सत्यं, ज्ञानं, अनंतं हे ब्रह्माचे गुण संतामधून कसे व्यक्त होतात ते भगवंताच्या लीलांच्या चिंतनाने समजते. संतांनी सांगितलेल्या रसपूर्ण कथा ऐकताना भक्त स्वतःला विसरतो. म्हणून भक्तीच्या या प्रकाराला महत्त्व दिले आहे.

भगवद्गीतेत भगवंत सांगतात, "मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम्। कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च" ॥१०.९॥ (निरंतर माझ्या ठिकाणी मन लावणारे (आणि) माझ्यातच प्राणांना अर्पण करणारे (भक्तजन) सदा सर्वदा (माझ्या भक्तीच्या चर्चेने) परस्परांना माझ्या प्रभावाचा बोध करीत तसेच (गुण व प्रभाव यांसह) माझेच कीर्तन करीत संतुष्ट होतात व (माझ्या

ठिकाणी) निरंतर रममाण होतात.) यावर भाष्य करताना ज्ञानराज म्हणतात, "चित्तें मीचि जाहाले। मियांचि प्राणें धाले। जीवों मरों विसरले। बोधाचिया भुली ॥११९॥ मग तया बोधाचेनि माजें। नाचती संवादसुखाची भोजें। आतां एकमेका घेपे दीजे। बोधचि वरी ॥१२०॥... जैसी कमळकळिका जालेपणें। हृदयींचिया मकरंदातें राखों नेणे। दे राया रंका पारणें। आमोदाचे ॥१२७॥ तैसेनि मातें विश्वीं कथित। कथितेनि तोषें कथूं विसरत। मग तया विसरामाजीं विरत। आंगें जीवें ॥१२८॥ ऐसें प्रेमाचेनि बहुवसपणें। नाहीं राती दिवो जाणणें। केलें माझें सुख अव्यंगवाणें। आपणपेयां जिहीं ॥१२९॥ तयां मग जें आम्ही कांहीं। द्यावे अर्जुना पाहीं। ते ठायींचीच तिहीं। घेतली सेल ॥१३०॥" ज्ञानेश्वरी.अ.१०

कथाभक्तीमुळे भक्तिसाधनेला तत्त्वज्ञानाची स्थिर बैठक लाभते. या सूत्रात नारदांनी गर्गमुनींचे मत सांगितलेले असले तरी त्यांचे स्वतःचे जीवनही कथाभक्तीचा आदर्श आहे. पूजाभक्तीमध्ये जसे बाह्य पूजाउपचारांमागे असलेल्या भगवंताच्या प्रेमाला महत्त्व आहे त्याप्रमाणे कथा कीर्तन करणाऱ्या आणि ऐकणाऱ्यांच्या मनात उद्‌भवणारे भगवंताचे प्रेम महत्त्वाचे आहे हे लक्षात ठेवले पाहिजे.

आता पुढच्या सूत्रात नारद शांडिल्य ऋषींचे मत सांगत आहेत.

## सूत्र अठरावे

**आत्मरत्यविरोधेनेति शाण्डिल्यः ॥१८॥**

**रति=प्रेमभाव. आत्मरति=आत्मस्वरूपाविषयी प्रेमभाव निर्माण होऊन सतत आत्मचिंतन घडणे. अविरोधेन=विरोध, संघर्ष नसणारी, पोषक भावना. इति=असे शाण्डिल्यः=शाण्डिल्यांचे म्हणणे आहे.**

**आत्मस्वरूपाविषयी प्रेमभाव निर्माण होऊन त्याला विरोध न होता उलट त्याचे पोषणच होऊन उत्तरोत्तर प्रेम वाढणे, अनुराग वाढणे हेच भक्तीचे मुख्य लक्षण होय असे शाण्डिल्य ऋषी म्हणतात.**

**विवरण :** मागच्या दोन सूत्रांत पूजा व कथाकीर्तन ही भक्तीची लक्षणे सांगितली. ही दोन्ही लक्षणे देहाने करावयाच्या म्हणजे बाह्य क्रिया आहेत. तथापि त्यांचा उद्देश अंतर्मुख होऊन परमेश्वराची भक्ती वाढावी हाच आहे. म्हणजे स्थूलाच्या सहाय्याने सूक्ष्मात प्रवेश करावयाचा आहे. शाण्डिल्यांची भक्तिसूत्रे तत्त्वज्ञानात्मक आहेत. त्यामुळे त्यात भावनेपेक्षा बुद्धीला जास्त

आवाहन आहे. म्हणून अविरोधेन आत्मरति म्हणजे कोणताही अडथळा न रहाता आत्म्याच्या ठायी पूर्णपणे रममाण होणे हे त्यांनी भक्तीचे लक्षण म्हणून सांगितले आहे. शंकराचार्यांनी विवेकचूडामणि या ग्रंथात भक्तीची व्याख्या पुढीलप्रमाणे केली आहे. "मोक्षसाधनसामग्र्यां भक्तिरेव गरीयसी। स्वस्वरूपानुसंधानं भक्तिरित्यभिधीयते॥" म्हणजे मोक्षप्राप्तीच्या उपायांमध्ये भक्तीच श्रेष्ठ आहे. स्वस्वरूपाच्या म्हणजे आत्म्याच्या अनुसंधानालाच भक्ति म्हणतात. म्हणजे पूर्वी सांगितलेल्या पूजा, कथा, कीर्तन इत्यादींच्या सहाय्याने आत्मस्वरूपात रमता आले पाहिजे. बाहेरचा देव हृदयामध्ये प्रकटला पाहिजे. वास्तविक तो हृदयातच आहे; पण अज्ञानाच्या आवरणामुळे आपल्याला त्याची जाणीव होत नाही. चित्त शुद्ध झाले म्हणजे त्याचे दर्शन होते. 'प्रगटे हृदयींची मूर्ती भावशुद्धी देखोनिया॥' असे तुकाराम महाराज सांगतात. कोणीही माणूस दिवसाचे चोवीस तास पूजा करू शकत नाही किंवा भगवंताच्या लीलांचे चिंतन करू शकत नाही. पण त्याच्यापेक्षा सूक्ष्म अशा नामस्मरणाच्या सहाय्याने तीन्ही अवस्थात भगवंताचे अनुसंधान ठेवू शकतो. 'आत्मनि एव आत्मनः तुष्टः' असे गीतेमध्ये स्थितप्रज्ञाचे लक्षण सांगितले आहे. पूर्णपणे निर्वासन झाल्याखेरीज ही अवस्था म्हणजेच आत्मरती येऊ शकत नाही. आपल्या वासना, विकार, अहंकार आत्मरतीला विरोध करतात. जग द्वंद्वात्मक असल्यामुळे त्यात नेहमीच संघर्ष असतो. जेथे संघर्ष असतो तेथे अस्वस्थता असते. म्हणून सर्व प्रकारचा म्हणजे बाहेरचा आणि मनातला विरोध किंवा संघर्ष नाहीसा झाल्याखरीज शांती शक्य नाही. म्हणूनच पूजा करतानादेखील 'सर्वेषाम् अविरोधेन ब्रह्मकर्म समारभे' असे म्हणतात.

वृत्ती आत्मस्वरूपात लीन होणे किंवा वृत्ती भगवदाकार होणे, दोन्हींचा अर्थ एकच आहे. पूजा, कथा इत्यादींच्या साहाय्याने जशी वृत्ती भगवदाकार होते तशी ती स्वरूपानुसंधानानेही होते. जो विश्वरूपाने नटला आहे तोच हृदयात आहे. म्हणून मारुती म्हणाला, "देहबुद्ध्या तु दासोऽहं जीवबुद्ध्या त्वदंशकः। आत्मबुद्ध्या त्वमेवाहं इति मे निश्चिता मतिः॥" (देह म्हणून मी स्वतःला जाणतो तेव्हां तुझा - श्रीरामाचा दास म्हणून जाणतो, जीव म्हणून स्वतःला जाणतो तेव्हां तुझा - शिवाचा अंश म्हणून ओळखतो आणि मी स्वतःला आत्मा असे जाणतो तेव्हां मी तूच - परमात्माच असतो अशी माझी दृढ धारणा आहे.)

शाण्डिल्यांनी सूक्ष्माचे प्रेम - आत्मरति हे पराभक्तीचे लक्षण सांगितले आहे. सूत्रामध्ये अविरोध आत्मरति सांगितली आहे. म्हणजे विरोधाचा पूर्ण अभाव ही

आत्मरतीची आवश्यक अट आहे. विरोध असेल तेथे द्वेष, वैरभाव निर्माण होतात व मन अस्वस्थ होते. मनात व आचरणात खळबळ असेल तर बाहेरची शांती देखील राहू शकत नाही, मग आतली शांती कोठून असणार! म्हणून अविरोध स्थितीमध्ये जगणे, निर्वैर होणे स्वरूपानुसंधानासाठी आवश्यक ठरते. भगवद्गीतेच्या अकराव्या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकात भगवंत सांगतात, ''मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः। निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव॥'' ११.५५॥ (अर्जुना, जो केवळ माझ्याकरिताच कर्तव्यकर्मे करतो, माझ्या ठायी परम आश्रय व परम गति मानून माझ्या प्राप्तीसाठी तत्पर असतो, संपूर्ण सांसारिक पदार्थांमध्ये आसक्तिरहित असतो आणि सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी वैरभावरहित असतो तो (अनन्यभक्त) मलाच येऊन मिळतो.) संपूर्ण गीताशास्त्राचा हा सारभूत श्लोक आहे असे शंकराचार्यांनी म्हटले आहे.

आत्म्याच्या ठिकाणी रममाण होण्यासाठी द्वैताचे निरसन व्हावे लागते कारण विरोध अथवा वैर द्वैताखेरीज शक्यच नाही. सर्व ठिकाणी परमात्माच भरलेला आहे असा ज्याला बोध झाला तो वैर कोणाशी करणार? म्हणूनच तुकाराम महाराजांनी ''निर्वैर व्हावें सर्वभूतांसवें। साधन बरवें हेंचि एक ॥ १ ॥'' असे सांगितले आहे.

इतर मार्गांप्रमाणे भक्तिमार्गात देखील साधकाची हळू हळू प्रगति होते. काही साधक पूर्वजन्मांतील साधनेमुळे तयार होत आलेले असतात. असे साधक एकदम सूक्ष्मामध्ये प्रवेश करू शकतात. पण सर्वसामान्य साधकाला भगवंताची पूजा, त्याच्या लीलाचरित्राचे चिंतन या मार्गानेच अंतरंगात प्रवेश करता येतो. सत्पुरुषांची संगत मिळाली तर हे सोपे होते कारण सत्पुरुष नुसते अमुक कर असे न सांगता सत्शिष्यास हाताला धरून पुढे नेतात. बाह्य अवडंबरात अडकून साधक ध्येयापासून दूर जात नाही ना हे पहातात. म्हणूनच श्रीमहाराजांनी सूचना दिली आहे की ''देहानें नुसता पूजापाठ करून परमार्थ घडत नाही. आपली वृत्ती भगवंताच्या ठिकाणीं चिकटली पाहिजे.'' नुसत्या पूजापाठानेही समाधान वाटते पण ते तात्पुरते असते. शाण्डिल्यांनी सांगितलेले लक्षण हे पराभक्तीचे अंतरंग लक्षण आहे आणि ते प्रामुख्याने प्रगत साधकांच्या ठायी आढळते.

ही मते सांगून झाल्यानंतर आता नारद स्वतःचे मत सांगत आहेत.

## सूत्र एकोणिसावे

**नारदस्तु तदर्पिताखिलाचारता, तद्विस्मरणे परमव्याकुलतेति ॥१९॥**

**नारदः=नारद. तु=परंतु, पण. तद्अर्पित=त्याला (परमेश्वराला) अर्पण**

**केलेले. अखिल=संपूर्ण. आचारता - व्यवहार. तद्=त्याच्या (परमेश्वराच्या) विस्मरणे=विसरामध्ये, विस्मरणामुळे. परम=अतिशय. व्याकुलता=कासावीस होणे. इति=असे.**

**पण नारदांच्या मते आपले सर्व क्रिया व्यवहार परमेश्वराला अर्पण करणे आणि जर त्याचा थोडाही विसर पडला तर प्राण कासावीस होणे हे परमभक्तीचे लक्षण आहे.**

**विवरण** : नारदांनी सांगितलेले भक्तीचे लक्षण आत्तापर्यंत दिलेल्या तीन लक्षणांपेक्षा वेगळे आहे म्हणून येथे 'तु' म्हणजे पण या अव्ययाची योजना नारदांनी केली आहे. व्यास, गर्ग व शाण्डिल्य यांनी सांगितलेली भक्तीची लक्षणे नारदांना मान्य असली तरी त्यांपैकी कोणतेही लक्षण त्यांना प्रधान लक्षण -- chief characteristic म्हणून मान्य नाही. म्हणून आधीची तीन मते खोडून काढण्याचा त्यांनी प्रयत्न केलेला नाही. येवढेच नव्हे तर आपले मत सांगतानाही त्यांनी स्वतःचा मी बाजूला ठेवून कोणताही आग्रह अथवा अभिनिवेश न दाखवता नारदांना हे प्रधान लक्षण वाटते असे म्हटले आहे. त्यांच्या मते सकाळी उठल्यापासून रात्री झोपेपर्यंत, नव्हे, जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति म्हणजे गाढ झोप या तीन्ही अवस्थात साधकाचे होणारे सर्व लौकिक आणि पारमार्थिक व्यवहार जेव्हां भगवंताला अर्पण होतात आणि जेव्हां भगवंताचे क्षणभर जरी विस्मरण झाले तरी साधकाचा जीव कासावीस होतो, प्राण व्याकूळ होतात तेव्हा ती परम भक्ती म्हणून ओळखली जाते.

भगवंतानी त्यांच्या प्राप्तीसाठी जो उपाय सांगितला त्याला भागवत धर्म म्हणतात. या धर्माचे पालन करणारा भक्त "कायेन वाचा मनसेन्द्रियैर्वा बुद्ध्याऽऽत्मना वानुसृतस्वभावात्। करोति यद् यत् सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत्तत्" ॥भागवत ११.२.३६॥ (तो भक्त शरीराने वाणीने, मनाने, इंद्रियांनी, बुद्धीने अथवा अहंकाराने त्याचप्रमाणे एका अथवा अनेक पूर्वजन्मांच्या सवयीनुसार जे जे कर्म करतो ते ते कर्म भगवान नारायणासाठी आहे अशा भावनेने करून ते त्याला समर्पण करतो.) अखिल आचारता म्हणजे सर्व कर्मे, त्यांचा हेतु, त्यांचे फळ, कर्मामधील कर्तेपण इत्यादी सर्व गोष्टी भगवंताला समर्पण करणे हे परम भक्तीचे रहस्य आहे. देणे आणि अर्पण करणे यांमधे फरक आहे. दान देताना दाता स्वतःला मोठा समजतो. श्रीमंत माणूस एखाद्या संस्थेला देणगी देताना काही अटी घालतो. अटी नसल्या तरी देणगी घेणाऱ्यानी आपल्याला मान द्यावा, दानशूर म्हणून लोकात प्रसिद्धी व्हावी,

समाजात मान्यता मिळावी अशी त्याची इच्छा असते. याउलट अर्पण करताना ज्याला आपण अर्पण करतो तो आपल्यापेक्षा मोठा आहे आणि आपण जे काही अर्पण करतो त्याचा स्वीकार करण्याची त्याने कृपा करावी असे अर्पण करणाऱ्याला वाटत असते. समर्पणामधील देणे हे सम्यक् अर्पण म्हणजे काहीही हातचे न राखता देणे असते.

श्रीमद्भगवद्गीतेच्या नवव्या अध्यायात भगवंत सांगतात "यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्। यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम्॥"९.२७॥ (हे अर्जुना, तू जे काही कर्म करतोस, जे काही खातोस, जे काही हवन करतोस, जे काही दान देतोस, जे काही स्वधर्माचरणरूप तप करतोस ते सर्व मला अर्पण कर.) खरा कर्ता भगवंत आहे, मी निमित्तमात्र आहे हे मनात ठसले म्हणजे मग भोक्तेपणही सुटते आणि फलाची आसक्ति न रहाता कर्म चांगले होते. यालाच ईश्वरार्पण बुद्धीने कर्म करणे म्हणतात. गीतेच्या बाराव्या अध्यायात भगवंतांनी "मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि" असे म्हटले आहे. त्यावर भाष्य करताना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "परि मनें वाचा देहें। जैसा जो व्यापारु होये। तो मी करितु आहें। ऐसें न म्हणें ॥११७॥ करणें कां न करणें। हें आघवें तोचि जाणे। विश्व चळतसे जेणें। परमात्मेनि ॥११८॥ माळियें जेउतें नेलें। तेउतें निवांतचि गेलें। तया पाणिया ऐसें केलें। होआवें गा ॥१२०॥... म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ती। इयें वोझीं नेघें मती। अखंड चित्तवृत्ती। आठवीं मातें ॥१२२॥ आणि जें जें कर्म निपजे। तें थोडे बहु न म्हणिजे। निवांतचि अर्पिजे। माझां ठायीं ॥१२३॥" ज्ञानेश्वरी अ.१२. श्री रामकृष्ण परमहंस कालीमातेला उद्देशून मी यंत्र तूं यंत्री म्हणत असत. हा भाव स्थिर झाला की भक्ताची प्रत्येक कृती म्हणजे समर्पणच होते.

सूत्राचा दुसरा भाग 'तद्विस्मरणे परव्यामकुलता' असा आहे. सर्व कर्मे भगवंताला अर्पण करावयाला त्याचे सतत स्मरण राहिले पाहिजे. पण साधकांचा अनुभव असा असतो की जागेपणी देखील त्याचे विस्मरण होते. तुकाराम महाराज म्हणतात, "एकविध वृत्ती न राहे अंतरीं। स्मरणींच हरी विस्मृती हे॥" कारण "तुका म्हणे बहु केले वेवसाव। तेणें रंगें जीव रंगलासे॥" मीपणाने केलेली कर्मे भगवंताच्या स्मरणाच्या आड येतात. वास्तविक ईश्वर सर्व काळ आणि सर्व ठिकाणी आहे. पण मन विषयांना चिकटल्यामुळे अंतःकरणावर विषयांचा पडदा येतो आणि त्यामुळे माणूस भगवंताला विसरतो. इतकेच नव्हे तर त्याला विसरलो हेही बऱ्याच वेळाने लक्षात येते. म्हणून तीन्ही अवस्थात भगवंताचे अखंड स्मरण

रहाणे हे परमार्थाचे मर्म आहे. भगवंत आत्मस्वरूप आहे म्हणून माझे स्मरण जसे मला सर्व अवस्थात असते तसे त्याचे स्मरण किंवा भान - awareness राहिले पाहिजे. म्हणजे भगवंताचे स्मरण न लोपणे हे भक्तीचे दुसरे लक्षण होय. स्मरण सतत राहण्यासाठी तो आहे, तो माझ्या जवळ आहे, सर्व काही त्याच्या इच्छेने होत आहे अशी खात्री झाली पाहिजे. ही खात्री किंवा भाव जेव्हां डळमळीत होतो तेव्हां विस्मरण होते. विस्मरण झाले तर जीव व्याकूळ झाला पाहिजे. श्वासोच्छ्वासात अडथळा आला तर जीव जसा कासावीस होतो तसा भगवंताचे विस्मरण झाले तर जीव कासावीस झाला पाहिजे. "जीवनाविण मासोळी। तुका तैसा तळमळी॥" ही व्याकुळतेची परमसीमा आहे. सूत्रामध्ये परमव्याकुळता म्हटले आहे.

तळमळ हा साधनाचा प्राण आहे. तू आहेस हा नामस्मरणाचा अर्थ आहे. श्रीमहाराज म्हणाले, प्रपंच भगवंताच्या नांवानें करावा म्हणजे सुख दुःख त्याच्याकडे जाते. ह्या सूत्रातील पहिला भाग म्हणजे सर्व कर्मे भगवदर्पण बुद्धीने करणे हा साधला की दुसरा भाग साधतो. किंवा असेही म्हणता येईल की खरी तळमळ निर्माण झाल्याखेरीज कर्मे भगवंताला अर्पण करता येत नाहीत. सर्व काळ त्याचे स्मरण ठेवण्याची तळमळ निर्माण झाली की समर्थांनी म्हटल्याप्रमाणे "शिंक जांभई खोकला। तेवढा वेळ वायां गेला।" असे भक्ताला वाटू लागते. पूर्ण समर्पण झाले की विस्मरण झाले तर भक्त विकल होतो. मी करेन म्हणून साधन होत नाही ही खात्री झाल्यामुळे तुकाराम महाराजांनी भगवंताजवळ 'तुझा विसर न व्हावा' असे दान मागितले. स्वामी स्वरूपानंद म्हणतात, "खेळविसी तैसा खेळेन साचार। तूं चि सूत्रधार बाहुले मी॥ बोलविसी तैसे बोलेन वचन। मज अभिमान कासयाचा॥ काया वाचा मन तुझ्या चि आधीन। तुझ्या पायीं लीन स्वामी म्हणे॥"

## सूत्र विसावे

**अस्त्येवमेवम् ॥२०॥**

**अस्ति= आहे. एवम्= असे. एवम्= असेच.**

**होय. (मागच्या म्हणजे एकोणिसाव्या सूत्रात सांगितल्याप्रमाणे) भक्तीचे लक्षण असे आहे. अगदी असेच आहे.**

**विवरण :** नारद सांगतात की मागच्या सूत्रात सांगितल्याप्रमाणे भक्तीचे लक्षण आहे. आपल्या विधानाला पुष्टी देण्यासाठी एवम् एवम् असे त्यांनी

दोनदा म्हटले आहे. तेव्हां नारदांचे हे केवळ मत नसून हा त्यांचा अनुभव आहे हे स्पष्ट होते. तथापि सर्व कर्मांचे समर्पण आणि अखंड स्मरण सर्वसामान्य साधकाला शक्य आहे का असा प्रश्न निर्माण होतो. आणि कदाचित ही शंका लक्षात घेऊनच नारदांनी पुढच्या सूत्रात हे कसे शक्य आहे ते उदाहरण देऊन सांगितले आहे.

## सूत्र एकविसावे

**यथा व्रजगोपिकानाम् ॥ २१ ॥**

**यथा= जशी. व्रजगोपिकानाम्= गोकुळातील गोपींची (भक्ती).**

**(एकोणिसाव्या सूत्राचे उदाहरण म्हणजे) जशी गोकुळातील गोपींची भक्ती.**

**विवरण** : एकोणिसाव्या सूत्रात नारदानी भक्तीचे प्रधान लक्षण सांगितले. आता या सूत्रात ते लक्षण स्पष्ट करण्यासाठी त्यांनी गोकुळातील गोपींचे उदाहरण दिले आहे.

गायींचे पालन करणारा तो गोप आणि त्याची पत्नी म्हणजे गोपी हा उघड अर्थ आहे. पण गुप् या पहिल्या गणातील धातूचा अर्थ लपविणे असा आहे. म्हणून ज्यांनी आपले अंतरंग जीवन म्हणजे कृष्णभक्ती अतिशय गुप्तपणे सांभाळली होती त्या गोपी असाही अर्थ करता येईल. श्रीमहाराज म्हणाले, 'प्रेम करावें तर गोपीनीच!' आणखी एकदा गोपींविषयी बोलताना म्हणाले की प्रथम गोपी कृष्णावर त्याच्या गुणांमुळे आणि सौंदर्यामुळे भाळल्या; पण त्यांचे भाग्य थोर, त्यामुळे तो कृष्ण परमात्मा निघाला!

नंदाघरच्या गोपबाळाचा सर्व गौळणींना इतका लळा लागला की तो यशोदेच्या वाट्याला येईनासा झाला. त्याच्या बाललीलांचे कौतुक करताना किंवा शिंके तोडून, मडके फोडून त्याने केलेल्या दही दुधाच्या नासाडीबद्दल यशोदेजवळ गाऱ्हाणे सांगतानाही गोपींचे त्याच्याविषयीचे प्रेमच व्यक्त होत असे. कारण वल्लभाचार्यांनी मधुराष्टकात म्हटल्याप्रमाणे कृष्णाचे सगळे वागणेच गोड आणि मोहून टाकणारे होते. या गीतात वल्लभाचार्य म्हणतात

अधरं मधुरं वदनं मधुरं नयनं मधुरं हसितं मधुरम्।
हृदयं मधुरं गमनं मधुरं मधुराधिपतेरखिलं मधुरम्॥...
गोपी मधुरा लीला मधुरा युक्तं मधुरं भुक्तं मधुरम्।
दृष्टं मधुरं शिष्टं मधुरं मधुराधिपतेरखिलं मधुरम्॥

अशा या बालकृष्णावर गोपींचे जिवापाड प्रेम जडले. घरातील सगळी कामे करतानाही त्यांना त्याचेच स्मरण होऊ लागले. तो हसतो कसा, बोलतो कसा, नाचतो कसा हेच त्यांचे एकमेकींशी बोलण्याचे विषय झाले. भागवतात गोपिकागीतात म्हटले आहे, "मधुरया गिरा वल्गुवाक्यया बुधमनोज्ञया पुष्करेक्षण। विधिकरीरिमा वीर मुह्यतिरधरसीधुनाऽऽप्याययस्व नः॥" भागवत १०.३१.८. (हे कमलनयना, तुझी वाणी किती मधुर आहे. त्यातील एक एक शब्द, एक एक अक्षर अतिशय मधुर आहे. विद्वान लोकही त्यामध्ये रंगून जातात आणि आपले सर्वस्व वाहतात. तुझ्या त्या मधुर वाणीने तुझी आज्ञा झेलणाऱ्या आम्ही तुझ्या दासी मोहित झालो आहोत. हे कृष्णा, अमृतापेक्षाही मधुर असा तुझा अधररस देऊन आम्हाला तृप्त कर.) त्या म्हणतात की कृष्णा, आम्ही तुझ्या अशुल्कदासिका म्हणजे काहीही मोल न घेता दास्य करणाऱ्या आहोत. अशा प्रकारे कृष्णाला मनोभावाने आळविताना तो साक्षात् परमात्मा आहे याचे त्यांना भान होते. त्या म्हणतात, "न खलु गोपिकानन्दनो भवानखिल देहिनामन्तरात्मदृक्। विखनसार्थितो विश्वगुप्तये सख उदेयिवान् सात्वतां कुले॥" भागवत १०.३१.४ (तू केवळ यशोदानंदन नसून सर्व शरीरधारी जीवांच्या हृदयात राहणारा साक्षी, अंतर्यामी आहेस. हे सख्या, ब्रह्मदेवाने प्रार्थना केल्यामुळे विश्वाचे रक्षण करण्यासाठी तू यादव वंशात जन्म घेतला आहेस.)

आपल्या पतिपुत्रादिकांचा विचारही न करता कृष्णासाठी वेड्या झालेल्या गोपींना व्यभिचारिणी न समजता श्रेष्ठ भक्त कसे मानावयाचे असा प्रश्न परीक्षितीलाही पडला होता. म्हणून शुक सांगतात, "ता वार्यमाणाः पतिभिः पितृभिर्भ्रातृबन्धुभिः। गोविन्दापहृतात्मानो न न्यवर्तन्त मोहिताः॥ अन्तर्गृहगताः काश्चिद् गोप्योऽलब्धविनिर्गमाः। कृष्णं तद्भावनायुक्ता दध्युर्मीलित लोचनाः॥ दुःसहप्रेष्ठविरहतीव्रतापधुताशुभाः। ध्यानप्राप्ताच्युताश्लेषनिर्वृत्या क्षीणमङ्गलाः॥ भागवत १०.२९.८,९,१०॥ (पिता, पति, इतर नातेवाईक यांनी त्या (गोपींना) कृष्णाकडे जाताना अडविण्याचा प्रयत्न केला, पण कृष्णाने त्यांचे प्राण, मन, आत्मा सर्व काही चोरल्यामुळे त्या थांबल्या नाहीत. तथापि ज्या गोपींना घरातून जाता आले नाही त्या आपले डोळे मिटून तन्मयतेने कृष्णाचे सौंदर्य, माधुर्य आणि लीलांचे चिंतन करू लागल्या. कृष्णाच्या विरहाग्नीत त्यांचे सर्व अशुभ संस्कार जळून गेले आणि त्या ध्यानमग्न झाल्या. कृष्णाला आलिंगन देऊन त्या तन्मय झाल्या आणि त्या ध्यानावस्थेत त्यांचे सर्व संस्कार

बाराव्या अध्यायात स्वतः भगवंत सांगतात, "अर्जुना तो भक्त। तोचि योगी तोचि मुक्त। तो वल्लभा मी कांत। ऐसा पढिये ॥ १५६ ॥"

नारदांनी सांगितलेले गोपींचे प्रेम ही प्रेमाची सीमा आहे. तथापि कृष्णावर असे नितांत प्रेम करताना त्या तो परमात्मा आहे हे कधीही विसरल्या नाहीत हे नारद पुढच्या सूत्रात आवर्जून सांगत आहेत.

## सूत्र बाविसावे

**तत्रापि न माहात्म्यज्ञानविस्मृत्यपवादः ॥ २२ ॥**

**तत्र अपि= तेथे सुद्धा. माहात्म्यज्ञान= मोठेपणाची जाणीव. विस्मृति= विसर. अपवादः = कलंक.**

**व्रजगोपिकांच्या उदाहरणात सुद्धा श्रीकृष्णाचा मोठेपणाची (तो प्रत्यक्ष परमेश्वरच आहे या गोष्टीची) जाणीव विसरण्याचा कलंक त्यांना लागला नाही.**

**विवरण** : "घडि घडि घडि चरण तुझे आठवती रामा। आसनी, शयनि, भोजनी, गमनी छंद तुझा आम्हां॥" असे एका गीतात भक्त श्रीरामाला म्हणत आहेत. व्रजगोपींचीही श्रीकृष्णाच्या बाबतीत अशीच स्थिती होती. त्या सदैव मुकुंद स्मरणात रंगलेल्या होत्या. काही वेळा अतिपरिचयात् अवज्ञा होण्याची भीती असते. पण श्रीकृष्णाच्या बाबतीत गोपींकडून हा प्रमाद घडला नाही. कृष्ण जरी त्यांच्याबरोबर खेळत होता, त्यांच्याशी बोलत होता, हसत होता, नाचत होता, लोणी चोरत होता तरी देखील तो इतर गोप बालकांच्या सारखा सामान्य गोप बालक नाही हे त्यांनी ओळखले होते. त्याच्या बाललीला अद्‌भुत होत्या. पूतनेचा वध, कालिया मर्दन, अघासुर बकासुरासारख्या राक्षसांचा त्याने केलेला वध, करांगुलीवर गोवर्धन पर्वत धारण करून त्याने केलेले व्रजभूमीचे संरक्षण अशा त्याच्या अद्‌भुत कृत्यांमुळे हा सामान्य मानव नाही, तर समस्त भूतमात्रात वास करणारा अंतर्यामी परमात्मा कृष्णरूप घेऊन गोकुळात वावरत आहे हे गोपींनी जाणले होते. त्यामुळे कृष्णाने त्यांना जवळ केले तरी हा परमात्मा आहे या जाणिवेचा विसर पडण्याचा कलंक त्यांना लागला नाही.

सत्पुरुष देखील व्यवहारात सामान्य माणसासारखेच रहातात त्यामुळे त्यांच्याजवळ राहाणाऱ्या लोकांना काही वेळा त्यांच्या मोठेपणाचा विसर पडतो. म्हणून नारदांनी आवर्जून ही गोष्ट सांगितली आहे. जर गोपींना कृष्णाच्या मोठेपणाचा विसर पडला असता आणि त्यांना तो सामान्य देहधारी

माणूस वाटला असता तर त्यांचे कृष्णावरील प्रेम दिव्य प्रेम न ठरता व्यभिचाराच्या हिणकस पातळीवर आले असते. ज्या प्रेमाचा विषय दृश्य आणि मर्यादित असतो ते प्रेम स्वार्थी असते. याच्या उलट ज्या प्रेमाचा विषय भगवंत असतो आणि म्हणून त्याला मर्यादा नसते ते प्रेम निःस्वार्थी असते. त्यालाच भक्ती म्हणतात. पुढील दोन सूत्रांत नारदानी हे स्पष्ट केले आहे.

## सूत्र तेविसावे

**तद्विहीनं जाराणामिव ॥२३॥**

**तद् विहीनम्= भगवंताच्या माहात्म्यज्ञानाशिवाय केलेले प्रेम.**

**जाराणाम् इव= व्यभिचारी स्त्री पुरुषांच्या प्रेमासारखे.**

**भगवंताच्या विभूतिमत्वाच्या ज्ञानाशिवाय गोपींनी जर त्याच्यावर प्रेम केले असते तर ते व्यभिचारी स्त्रीपुरुषांचे प्रेम झाले असते.**

## सूत्र चोविसावे

**नास्त्येव तस्मिंस्तत्सुखसुखित्वम् ॥२४॥**

**नास्ति= नाही. एव= असे, खरोखर. तस्मिन्= त्या व्यभिचारी प्रेमात. तत् सुख= त्याचे सुख. सुखित्वम्= सुखी होणे.**

**खरोखर जाराबद्दलच्या व्यभिचारी प्रेमात त्याला दिलेल्या किंवा होणाऱ्या सुखाने सुखी होणे नसते.**

**विवरण** : गोपींचे श्रीकृष्णाविषयीचे प्रेम हा प्रेमाचा आदर्श मानला जातो. अशा प्रेमालाच भक्ती म्हणतात. श्रीकृष्णाने गोपींबरोबर केलेल्या रासक्रीडेसंबंधी सामान्य लोकांच्या मनात गैरसमज असतात. ते दूर व्हावे म्हणूनच नारदांनी ही दोन सूत्रे देऊन सामान्य माणसांचे इंद्रियजन्य स्वार्थी विकारी प्रेम आणि गोपींचे आध्यात्मिक निस्वार्थी विकाररहित प्रेम यांमधील फरक स्पष्ट केला असावा.

गोपींना श्रीकृष्णाबद्दल वाटणारे प्रेम हे व्यभिचारी स्त्रीला जाराबद्दल वाटणाऱ्या वैषयिक प्रेमासारखे नव्हते. जारकर्म हे धर्मबाह्य आणि नीतिबाह्य वर्तन असते. स्त्रीपुरुषांमधील विवाहबाह्य गुप्त संबंध जसे असतात तसा गोपींचा कृष्णाशी संबंध नव्हता. त्यांना कृष्णाच्या माहात्म्याचे,- तो साक्षात् परमात्मा आहे या गोष्टीचे क्षणभरही विस्मरण होत नसे. तो त्यांच्या हृदयात नांदत होता आणि याची त्यांना जाणीव होती. रासक्रीडेच्या रात्री प्रत्येक गोपीबरोबर कृष्ण नाचत

होता. या घटनेबद्दल सांगताना श्रीमहाराज म्हणाले की प्रत्येक गोपीने आपल्या हृदयातील कृष्ण बाहेर काढून त्याच्याशी रासक्रीडा केली! त्यांच्या प्रेमाचा पाया शरीर सुख नव्हते. त्या प्रेमात सर्वार्पण आणि पावित्र्य होते.

व्यभिचारी माणूस कामवश असतो. त्याच्या इंद्रियतृप्तीसाठी तो प्रेम करतो. गोपींच्या प्रेमात तो भाव नव्हता. कृष्ण सुखी असावा ही त्यांची एकमेव अभिलाषा होती. आपण सुंदर दिसावे या भावनेने त्या शृंगार करीत नव्हत्या तर त्यांना तसे पाहिल्यावर कृष्णाला आनंद होतो म्हणून शृंगार करीत होत्या. त्याला ज्यात सुख, त्यातच त्यांना सुख वाटत होते. कृष्णाच्या सुखाऐवजी त्यांनी आपल्या स्वतःच्या सुखाचा विचार केला असता तर त्यांचे वर्तन जारकर्म ठरले असते. आम्ही भगवंताच्या निःशुल्का दासी आहोत असे जरी त्या सांगत होत्या तरी त्यांच्या नकळत त्या दास्यभावातून सख्यभावात पोचल्या होत्या. सख्यभक्तीची लक्षणे सांगताना समर्थांनी दासबोधात म्हटले आहे, "देवासी परम सख्य करावें। प्रेम प्रीतीनें बांधावें।" प्रेम प्रीतीनें या पदाचा अर्थ सांगताना गुरुदेव रानड्यांचे गुरु पू. भाऊसाहेब उमदीकर सांगत की यामध्ये द्विरुक्ती नसून जेव्हां प्रेमाचा बांध फुटतो, त्याला मर्यादा रहात नाही तेव्हां त्या प्रेमाचे प्रीतीमध्ये पर्यवसान होते. स्वार्थरहित प्रेमातच समरसता येते. समर्थांनी पुढे म्हटले आहे, "देवास जयाची अत्यंत प्रीती। आपण वर्तावें तेणें रीती।" आणि "देवाच्या सख्यत्वाकारणें। आपलें सौख्य सोडून देणें। अनन्यभावें जीवें प्राणें। शरीर तेंही वेंचावें॥ देवाच्या सख्यत्वासाठीं। पडाव्या जिवलगांसी तुटी। सर्व अर्पावें सेवटी। प्राण तोही वेचावा॥... दासबोध ४.८.६,८॥ गोपींनी हे केले. त्यामुळे त्या कृष्णाच्या सख्या झाल्या.

श्रीकृष्ण सुखी तर आम्ही सुखी हा गोपींचा स्थायीभाव झाल्यामुळे त्याला सुखी करण्यासाठी काहीही करण्याची त्यांची तयारी होती. या संबंधात एक कथा सांगतात ती अशी : माझ्यावर खरे निरपेक्ष प्रेम व्रजगोपींनीच केले असे कृष्ण नेहमी म्हणत असे. उद्धवाला याचे आश्चर्य वाटत असे तर कृष्णाच्या राण्यांना वैषम्य वाटे. म्हणून आपले म्हणणे कसे खरे आहे हे दाखविण्यासाठी श्रीकृष्णांनी लीला केली. एक दिवस त्यांचे डोके अतिशय दुखू लागले. राजवैद्य आले; त्यांनी उपचार केले, पण डोके दुखावयाचे थांबेना. शेवटी उद्धवाने कृष्णाला विनविले की देवा, तू सर्वज्ञ आहेस. तूच काही उपचार सांग. त्याच वेळी नारदही तेथे आले. कृष्ण म्हणाले, माझ्याबद्दल परमप्रेम असणाऱ्याच्या पायाची धूळ माझ्या कपाळावर चोळली तर डोके दुखणे थांबेल. ज्याला आपण परमात्मा मानतो

त्याच्या कपाळाला आपल्या पायांची धूळ लावणे हे महत्पाप आहे व त्यामुळे नरकात जावे लागेल असे सर्व राण्यांना आणि उद्धवादि भक्तांना वाटत असल्यामुळे त्यांच्यापैकी कोणीही आपल्या पायांची धूळ देण्यास तयार झाले नाही. इकडे कृष्ण तर वेदनांनी व्याकूळ झाले होते. शेवटी त्यांनी नारदांना गोपींकडे पाठविले. नारद गोकुळात गेले तेव्हा गोपी अंगणातच कामे करीत होत्या. नारदांनी त्यांना कृष्णाचा आजार आणि त्यावरचा उपाय सांगितल्यावर त्या म्हणाल्या, नारदा, येवढेच ना! जा आमच्या पायांची धूळ घेऊन. आश्चर्य आहे की त्यासाठी तुला येथे यावे लागले. नारद म्हणाले, तुम्ही अडाणी आहात. तुम्हाला माहीत नाही की तुमच्या पायांची धूळ कृष्णपरमात्म्याच्या कपाळाला लावली तर तुम्हाला पाप लागेल व त्यामुळे तुम्हाला नरकात जावे लागेल; जरा विचार करा. त्या म्हणाल्या, अरे, त्यात विचार कसला करायचा? कृष्णाचे डोक दुखते आहे ते थांबेल ना. मग त्यासाठी आम्ही आनंदाने नरकात जाऊ. त्याच्या सुखात आमचे सुख सामावले आहे. नारद त्यांच्या पायांची धूळ घेऊन आले व ती लीलानाटक कृष्णाच्या कपाळाला लावल्यावर त्याचे डोके दुखणे थांबले. कृष्ण म्हणाला, नारदा, उद्धवा, कळले ना निरपेक्ष प्रेम काय असते ते! माझ्या सुखासाठी त्या नरकात जावयाला तयार झाल्या. पण नारदा, तू एक विसरलास की मी त्यांच्या हृदयातच आहे; त्यामुळे त्यांच्या बरोबर मलाही नरकात जावे लागेल! अर्थात जेथे देव आहे तेथे नरक कोठला?

श्रीमहाराज म्हणत की गर्भवती स्त्री जसा तिच्या पोटातला गर्भ सांभाळते तसे जो चोवीस तास नामस्मरण करुन भगवंताला आपल्या हृदयात सांभाळतो, तो खरा भक्त. ते म्हणत, भगवंतावर झोकून द्यावे; एकदा त्याच्या पायांवर डोके ठेवले की ते परत उचलूच नये. हे साधले की कोणतीही समस्या रहात नाही. भीती व काळजी रहात नाही. जारप्रेम स्वकेंद्रित असते. ते स्वतःच्या सुखावर आधारलेले असते. त्या प्रेमात तत्सुखसुखित्व नसते. त्याच्या उलट भगवंतावरील प्रेमात भक्त भगवंताच्या सुखात स्वतःचे सुख पाहतो. अशा भक्ताला काय आवडते? (१) पहिले म्हणजे भगवंताचे अखंड स्मरण. तो आहे, तो आहे हा भाव वाढवत, तू आहेस हा भाव स्थिर होतो. हा भाव स्थिर झाला की प्रथम त्याचे सान्निध्य जाणवू लागते. नंतर त्याच्याशी संभाषण होऊ लागते आणि अखंड अनुसंधानात त्याचे पर्यवसान होते. (२) यानंतर सर्व प्राणिमात्रात तो दिसू लागतो; आणि त्यामुळे भक्त सर्वांवर अकृत्रिम प्रेम करू लागतो. अशा भक्ताच्या हातून धर्मबाह्य व नीतिबाह्य वर्तन स्वप्नातदेखील होत नाही. हे विश्वचि माझें घर अशी त्याची अवस्था होते.

गोपींनी श्रीकृष्णाला सर्वस्व अर्पण केले. क्षणभर जरी कृष्णाचे स्मरण क्षीण झाले तरी त्या अतिशय व्याकूळ होत असत. श्रीकृष्णाच्या मोठेपणाचे त्यांना पूर्ण ज्ञान होते आणि त्यामुळे तो सुखी रहाण्यातच त्या आपले सुख पहात होत्या. नाथभागवतात गोपींसंबंधी श्रीकृष्ण उद्धवाला म्हणतात, "ऐकोनि माझें वेणुगीत। गोपिका सांडूनि समस्त। निजदेहातें न सांभाळित। मज गिवसीत पातल्या ॥१२.१०८॥ सांडूनि पतिपित्यांची चाड। न धरोनि वेदशास्त्रांची भीड। माझे ठायीं निजभाव दृढ। प्रेम अतिगोड गोपिकां ॥१०९॥ पुत्रस्नेह तोडूनि घायें। विधीते रगडूनि पायें। माझे आवडीचेनि लवलाहें। गोपिका मज पाहे पावल्या ॥११०॥... मजवेगळें जें जें सुख। तें गोपिकांसी केवळ दुःख। कैशी आवडी अलोलिक। मज हृदयीं देख न विसंबती ॥१३७॥... नवल गोपिकांचा हरिख। मज वृंदावना जातां देख। माझें पाहोनि श्रीमुख। प्रातःकाळीं सुख भोगिती ॥१३९॥ गायी पाजोनियां पाणी। गोठणीं बैसवीं मध्यान्हीं। तेथें उदकमिषें गौळणी। पाहावयालागोनि मज येती ॥१४०॥ तेथें नाना कौतुकें नाना लीला। नाना परींच्या खेळतां खेळां। तो तो देखोनि सोहळा। सुखें वेल्हाळा सुखावती ॥१४१॥ मज सायंकाळीं येतां देखोनी। आरत्या निंबलोण घेऊनी। सामोऱ्या येती धावोनी। लागती चरणीं स्वानंदें ॥१४२॥ ऐशीं त्रिकाळ दर्शनें घेतां। धणी न पुरे त्यांचे चित्ता। त्याहीवरी वर्तली कथा। एकांतता अतिगुह्य ॥१४३॥... रासक्रीडा गोपिकांप्रती। कोणी म्हणेल कामासक्ती। तेथ कामाची कैंची प्राप्ती। ऐक निश्चितीं उद्धवा ॥१५०॥ शिवातें जिणोनि फुडा। काम म्हणे मी सबळ गाढा। माझी भेदावया रासक्रीडा। वाऊनी मेढा चालिला ॥१५१॥ जेथ माझ्या स्वरूपाचें वोडण। तेथ न चले कामाचें कामपण। मोडले मदनाचे बाण। दृढ वोडण स्मरणाचें ॥१५२॥...जेथ मी क्रीडे आत्मारामू। तेथ केवीं रिघे बापुडा कामू। माझे कामें गोपिका निष्कामू। कामसंभ्रमू त्यां नाहीं ॥१५४॥ जो कोणी स्मरे माझें नामू। तिकडे पाहूं न शके कामू। जेथ मी रमें पुरुषोत्तमू। तेथ कामकर्मू रिघेना ॥१५५॥" नाथभागवत अ. १२.

श्रीकृष्ण गोकुळातून मथुरेस गेल्यावर गोपींची जी स्थिती झाली त्याचे उद्धवाजवळ वर्णन करताना श्रीकृष्ण म्हणतात: "यापरी मजवेगळ्या असतां। मागें माझी कथा वार्ता। सदा माझें स्मरण करितां। मदाकारता पावल्या ॥१२.१७६॥ करितां दळण कांडण। माझें दीर्घस्वरें गाती गुण। कीं आदरिल्या दधिमंथन। माझे चरित्रगायन त्या करिती ॥१७७॥ करितां सडासंमार्जन। गोपिकांसी माझें ध्यान। माझेनि स्मरणें जाण। परिये देणें बालकां ॥१७८॥ गायीचें दोहन करितां। माझें

स्मरणीं आसक्तता। एवं सर्व कर्मीं वर्ततां। माझ्या विसराची वार्ता विसरल्या ॥१७९॥... यापरी बुद्धी मदाकार। म्हणोनि विसरल्या घरदार। विसरल्या पुत्रभ्रतार। निजव्यापार विसरल्या ॥१८३॥ विसरल्या विषयसुख। विसरल्या द्वंद्वदुःख। विसरल्या तहानभूक। माझेनि एक निदिध्यासें ॥१८४॥ जेणें देहें पतिपुत्रांतें। आप्त मानिलें होतें चित्तें। तें चित्त रातलें मातें। त्या देहातें विसरोनी ॥१८५॥ विसरल्या इहलोक परलोक। विसरल्या कार्यकारण निःशेख। विसरल्या नामरूप देख। माझें ध्यानसुख भोगितां ॥१८६॥ निरसोनि तत्त्वांचे विकार। समाधि पावे मुनीश्वर। तो विसरे जेवीं संसार। तेवीं मदाकार गोपिका ॥१८७॥... सच्चिदानंदस्वरूपप्रभावो। नेणतां माझा निजस्वभावो। गोपिकांचा अनन्यभावो। परब्रह्म पहा हो पावल्या ॥१९०॥" नाथभागवत अ. १२.

हे वर्णन वाचले की लक्षात येते की व्रजातील या भोळ्याभाळ्या गोपींना अति दुर्लभ अशा महाभावाचा लाभ झाला होता. ही नित्यसत्त्वस्थिती प्राप्त झाली की भक्त सर्वकाळ कोणत्या ना कोणत्या निष्काम भक्तीच्या कर्मात रमलेला असतो. कृष्णप्रेम म्हणतात, "I have only one thing to tell you- the greatest mantra I have learnt from my Guru- GIVE EVERYTHING, ASK NOTHING - the supreme key to His Heart's treasury." (Yogi Shri Krishaprem by Dilip kumar Roy, Bharatiya Vidya Bhavan, 1975, page 129)

(मला तुम्हाला एकच सांगायचे आहे - माझ्या गुरूंजवळ मी हा महामंत्र शिकलो आहे - त्याला सर्वस्व द्या, त्याच्याजवळ काहीही मागू नका - परमेश्वराच्या हृदयरूपी कोषागारात शिरण्याची ही सर्वोत्तम किल्ली आहे.)

## १.४ : परमप्रेमरूपा भक्तीचे स्वयंभू स्वरूप

गोपींच्या कृष्णभक्तीविषयी सांगून झाल्यानंतर आता परमेश्वराची प्राप्ती करून देणाऱ्या इतर मार्गांपेक्षा भक्तिमार्ग कसा श्रेष्ठ आहे ते नारद सांगत आहेत.

## सूत्र पंचविसावे

**सा तु कर्मज्ञानयोगेभ्योऽप्यधिकतरा ॥२५॥**

**सा=ती (परमप्रेमरूपा भक्ती). तु= परंतु. कर्म= कर्मयोग. ज्ञान=ज्ञानयोग. योग= अष्टांग योग = राजयोग. अपि= सुद्धा. अधिकतरा= जास्त (महत्त्वाची).**

**परंतु ती परमप्रेमरूपा भक्ती कर्मयोग, ज्ञानयोग आणि राजयोगापेक्षाही श्रेष्ठ आहे.**

**विवरण** : "दुःखादुद्विजते सर्वं सर्वस्य सुखमीप्सितम्" असे महाभारतात म्हटले आहे. कोणालाही दुःख नको असते; सर्वांनाच सुख हवे असते. हा सर्वसाधारण नियम झाला. भक्त मात्र मला त्रास झाला, दुःख भोगावे लागले तरी चालेल पण माझ्या इष्टदेवतेला सुख व्हावे असे म्हणतो. वास्तविक ही एक गोष्टच भगवत्प्राप्तीच्या इतर मार्गांपेक्षा भक्ती कशी श्रेष्ठ आहे ते सांगावयाला पुरेशी आहे. देवांनाही दुर्लभ असे आपले विश्वरूप अर्जुनाला दाखविल्यानंतर भगवान म्हणतात, "नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया। शक्यं एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा॥ भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन। ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप॥" भगवद्गीता अ ११.५३,५४॥ (हे अर्जुना, तू जसे मला पाहिले आहेस, तशा प्रकारचे माझे दर्शन मिळणे वेदाध्ययनाने शक्य नाही, तपाने शक्य नाही, दानाने शक्य नाही आणि यज्ञानेही शक्य नाही. परंतु हे परंतप अर्जुना, अनन्य भक्तीने माझे या रूपात दर्शन मिळणे व तत्त्वतः माझे ज्ञान होणे, तसेच माझ्यामध्ये प्रवेश करणे (माझ्याशी ऐक्य पावणे) शक्य आहे)

या सूत्रात कर्मयोग, ज्ञानयोग आणि अष्टांग योग अथवा राजयोग या आत्मज्ञानाच्या अथवा भगवंताच्या प्राप्तीच्या तीन मार्गांपेक्षा भक्तियोग श्रेष्ठ आहे असे नारद सांगतात. कोणताही साधक समाधानाच्या शोधात असतो आणि भगवंताच्या प्राप्तीने समाधान लाभेल म्हणून तो वर उल्लेख केलेल्या मार्गांपैकी कोणत्या तरी एका मार्गाने वाटचाल करू लागतो. कोणत्याही मार्गाने गेले तरी पूर्णत्वाखेरीज समाधानाचा लाभ होत नाही. ॐ पूर्णमदः पूर्णमिदं हा मंत्र सांगतो की पूर्णातून काही काढता येत नाही कारण काढून ते कोठे ठेवणार? त्याचप्रमाणे पूर्णात भर कशाची घालणार? म्हणजेच कोणत्याही अवस्थेत पूर्णत्वाला बाध येत नाही. पूर्ण म्हणजेच infinite. तथापि त्या पूर्णत्वाला जेव्हा पूर्णत्वाचा आनंद भोगावा असे वाटते तेव्हां सृष्टी निर्माण होते. म्हणजे ते पूर्ण आनंद भोगण्यासाठी अपूर्ण होते. साहजिकच अपूर्णाची पूर्णाकडे - समाधानाकडे म्हणजेच त्याच्या मूळ स्वरूपाकडे धाव असते. माणूस ही अपूर्णाची उत्तम कृति -विश्वस्य सुकृति -आहे. अपूर्णात कशाची तरी भर घातली की ते पूर्ण होईल, समाधानरूप होईल असे माणसाला वाटते आणि म्हणून तो सत्ता, संपत्ती, विषयभोग इत्यादींच्या मागे लागतो. या गोष्टी मिळविण्यासाठी अनीतीच्या मार्गाचाही अवलंब करतो आणि दुःखी होतो.

समाधान दूर रहाते. अपूर्णातून पूर्ण सुख मिळणे शक्य नाही हे त्याच्या लक्षातच येत नाही. ज्यांना हे समजलेले असते ते तुकाराम महाराजांसारखे संत विचारतात "राजगृहा जावें मानाचिया आशे। तेथें काय वसे समाधान॥" भगवंताच्या उपासनेशिवाय समाधान मिळणार नाही असे ते सांगतात.

नारदानी भक्तीला ते भक्तीचे पक्षपाती आहेत म्हणून महत्त्व दिले आहे असे समजण्याचे कारण नाही. येथे सांगितलेल्या अन्य तीन्ही मार्गात ते पारंगत होते. असे असूनही त्यांनी भक्तीला एवढे महत्त्व का दिले आहे ते समजण्यासाठी या तीन मार्गांचे स्वरूप आणि त्यांच्या मर्यादा थोडक्यात पहाणे आवश्यक आहे.

**कर्मयोग** : कर्मयोग निष्काम म्हणजे फलाशारहित कर्म करावयास सांगतो. कर्म केल्याशिवाय माणूस जगू शकत नाही. "नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः। शरीरयात्रापि च ते न प्रसिध्येदकर्मणः॥" ३.८॥ असे भगवद्गीता सांगते. तू नियत म्हणजे शास्त्रविधीने नेमलेले स्वधर्मरूप कर्म कर कारण कर्म न करण्यापेक्षा कर्म करणे श्रेष्ठ आहे आणि कर्म न करण्याने तुझा शरीरनिर्वाह देखील सिद्ध होणार नाही. इतर प्राण्यांच्या दृष्टीने पृथ्वी ही केवळ भोगभूमी आहे; पण माणसासाठी ती कर्मभूमीही आहे. निषिद्ध कर्मे करावयाची नाही म्हटले तरी नित्य, नैमित्तिक कर्मे आणि त्याचबरोबर सामान्य माणसाकडून काम्य कर्मेही घडत असतात. कर्म म्हटले की कार्यकारणसंबंध आला. कार्य दिसले की त्याच्या मागे कारण असतेच, आणि कारण असले की कार्य घडणारच असा आपला विश्वास असतो. शंभर अंश सेल्शियस तापमानाला पाणी उकळते. म्हणून उकळते पाणी पाहिले की त्याचे तापमान १०० अंश से. असणारच असे आपण म्हणतो. कारणातून कार्य घडते आणि ते कार्यही कारण बनते. म्हणून कार्याप्रमाणे कारणही कर्मस्वरूप असते. कारणाशिवाय कार्य होत नाही. रामनामाचा तेरा कोटी जप केला की रामदर्शन होते. ज्योतिष्टोम यज्ञ केला म्हणजे स्वर्गप्राप्ती होते. कर्मयोगात दृश्यावर, कर्तृत्वावर व कार्यकारण भावावर भरंवसा असतो. पण भगवत्प्राप्तीच्या बाबतीत, म्हणजे अतिसूक्ष्म अशा परमात्मतत्त्वाच्या बाबतीत हे घडेलच असे सांगता येत नाही. परमात्मतत्त्व हे स्थल, काल, निमित्ताच्या म्हणजे कार्यकारण भावाच्या पलीकडे आहे. त्यामुळे तेरा कोटी रामनाम जप झाल्यावरही रामदर्शन न झालेले लोक असतात आणि तेवढा जप झालेला नसतानाही काही लोकांना रामदर्शन होते. त्यामुळे सत्कर्माने पुण्य वाढले तरी आत्मज्ञान होईलच असे सांगता येत नाही.

कर्म करताना हेतु पाहिजे पण फलाशा नको असा भाव टिकवता येणे ही खरोखर तारेवरची कसरत आहे. कर्म करणारा मी म्हणजे कर्ता नकळत फलाशेत गुरफटतो. शिवाय ज्या देहाने मी कर्म करतो त्या देहावर माझी सत्ता चालत नाही. इंद्रिये थकतात, कर्माचे फळ दृष्टीच्या टप्प्यात असूनही जेव्हा मिळत नाही तेव्हा कर्त्याचा उत्साह कमी होतो. त्याचप्रमाणे कर्म करण्यासाठी जी साधने वापरावयाची ती वेळेवर मिळतीलच आणि उपयोग करता येण्यासारखी चांगल्या स्थितीत असतीलच असे नाही. उदाहरणार्थ, एखाद्या सर्जनला ऑपरेशन करावयासाठी लागणारी सर्व हत्यारे, यंत्रे मिळणे, ऑपरेशन थिएटर योग्य प्रकारे निर्जंतुक असणे यांसारख्या कितीतरी गोष्टी अनिश्चित असतात. थोड्या वेळापूर्वी वापरलेले यंत्र ऑपरेशन करताना एकाएकी बंद पडते! थोडक्यात, कर्म करण्यासाठी लागणाऱ्या साधनांवर कर्त्याचा ताबा असेलच असे नाही. म्हणजे देहावर ताबा नाही आणि साधनांवरही ताबा नाही. त्यामुळे समर्थ रामदास म्हणतात त्याप्रमाणे "यथासांग रे कर्म तेंही घडेना। घडे धर्म तों पुण्य गांठी पडेना॥" मनाचे श्लोक १००॥ कर्म सफल होण्यासाठी कर्त्याचे कौशल्य, साधनांची उपलब्धता यांबरोबर काळ आणि परिस्थिती अनुकूल असावी लागतात. ज्ञानाचे महत्त्व सांगताना शंकराचार्यांनी कर्माच्या मर्यादा स्पष्ट केल्या आहेत. ते म्हणतात, "चित्तस्य शुद्धये कर्म न तु वस्तूपलब्धये। वस्तुसिद्धिर्विचारेण न किंचित्कर्मकोटिभिः॥" विवेकचूडामणि ११॥ कर्मयोगाच्या या मर्यादा लक्षात घेऊन नारदांनी कर्मयोगापेक्षा भक्ती श्रेष्ठ आहे असे म्हटले आहे. कर्म करताना कर्तेपण सुटले तर भोक्तेपणही सुटते. म्हणून भक्त सारे कर्तेपण भगवंताला देतो. मी यंत्र तू यंत्री असे तो भगवंताला म्हणतो. तो जाणून असतो की "करणें कां न करणें। हें आघवें तोचि जाणे। विश्व चळतसे जेणें। परमात्मेनि॥" ज्ञानेश्वरी १२.११८॥ आणि म्हणून "माळियें जेउतें नेलें। तेउतें निवांतचि गेलें। तया पाणिया ऐसें केलें। होआवें गा॥" ज्ञानेश्वरी १२.१२०॥ हा त्याचा जीवनाचा आदर्श असतो. त्यामुळे देहाने कर्म करूनही तो अकर्ता असतो.

**ज्ञानयोग :** माणूस ज्ञानामुळे इतर प्राण्यांपेक्षा श्रेष्ठ झाला आहे. ज्ञानामुळे माणसाला जगात त्याला पाहिजे असतील तसे बदल करण्याचे सामर्थ्य प्राप्त झाले आहे. देहतादात्म्यामुळे माणूस देहाला महत्त्व देतो, पण त्याचबरोबर त्या देहामध्ये वास करणाऱ्या ज्ञानाला जास्त महत्त्व देतो. आपण ज्ञानाचा विचार करताना येथे आत्मज्ञानाचा विचार करत आहो. समर्थ म्हणतात, "ऐक ज्ञानाचें

लक्षण। ज्ञान म्हणजे आत्मज्ञान। पाहावें आपणासि आपण। या नांव ज्ञान॥'' दासबोध ५.६.१॥ केवळ ज्ञानानेच मोक्षप्राप्ति होते असे शंकराचार्य सांगतात. तथापि ज्ञानी माणसाला भगवंताचे प्रेम असेलच असे नाही. ज्ञानमार्गाने जावयाचे असेल तर साधकाला आधी साधनचतुष्टय संपन्न व्हावे लागते. त्यामुळे ज्ञानमार्गाचा अधिकारी क्वचितच कोणी असतो.

बुद्धी हे ज्ञानाचे साधन आहे. बुद्धीचे तीन थर आहेत. (१) ज्ञानेंद्रियांमुळे ज्याचे ज्ञान होते ते इंद्रियप्रत्यक्ष ज्ञान. यालाच बोध अथवा perception म्हणतात. (२) इंद्रियांच्या सहाय्याने ज्याचे ज्ञान झाले त्याचा अर्थ समजणे हे जास्त सूक्ष्म आहे. उदाहरणार्थ, सामान्य माणसाने एखादा रोगी माणूस पाहिला आणि तोच रोगी डॉक्टराने पाहिला तर त्या दोघांना होणाऱ्या ज्ञानात - अर्थबोधात खूप फरक असणार हे उघड आहे. इंग्रजीत याला understanding म्हणतात. (३) माणूस जे पहातो, ऐकतो, ज्याचा त्याला अर्थबोध होतो त्याबद्दल निश्चितता असणे आणि ते आचरणात येणे हा बुद्धीचा तिसरा थर होय. याला conviction म्हणतात. ज्ञान झाले तरी conviction होणे फार कठीण असते. त्यासाठी विवेकाची आणि प्रखर वैराग्याची जोड असावी लागते. शिवाय कुबुद्धी असेल तर ज्याची त्यालाच ती सुबुद्धी करावी लागते. या बाबतीत ''जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः। जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः॥'' हे दुर्योधनाचे वाक्य सुप्रसिद्ध आहे. कर्माला जसा हेतु लागतो तसा ज्ञानालाही हेतु लागतो. हेतूशिवाय ज्ञान होत नाही. त्याचप्रमाणे देहबुद्धि नाहीशी झाल्याखेरीज आत्मज्ञान होणे शक्य नाही. समर्थ सांगतात, ''देहबुद्धि केली बळकट। आणि ब्रह्म पाहों गेला धीट। तों दृश्यानें रुधिली वाट। परब्रह्माची॥'' दासबोध ६.८.४२॥ बुद्धीच्या तिसऱ्या थरापर्यंत पोचावयाला जबरदस्त धारणा असावी लागते. त्यामुळे सामान्य माणसाला हा मार्ग उपयोगाचा नाही.

ज्ञानमार्गात ज्ञानाचा अहंकार निर्माण होण्याची भीती असते. आणि ज्ञानाचा अहंकार अज्ञानाच्या अहंकारापेक्षा भयंकर असतो. ज्ञानाला महत्त्व आहे पण ज्ञानातून आलेला अहंकार फार त्रास देतो. कर्तेपणाच्या पार्श्वभूमीवर ज्ञान होते. मी ज्ञान मिळविले असे वाटू लागते. विवेक जागा नसेल तर ज्ञानाने आलेला अहंकार माणसाचा घात करतो. आपण पहातो की केवळ शब्दज्ञान झाले तरी त्याचा पंडितांना किती अहंकार होतो. म्हणूनच शंकराचार्यांनी म्हटले आहे, ''अविज्ञाते परे तत्त्वे शास्त्राधीतिस्तु निष्फला। विज्ञातेऽपि परे तत्त्वे

शास्त्राधीतिस्तु निष्फला॥'' विवेकचूडामणि ६१॥ सामान्य माणूस ज्ञानाचा अधिकारी नसला तरी त्याला प्रेम करणे शक्य असते आणि तो संसारावर प्रेम करत असतोच. हे संसारातले प्रेम भगवंताकडे वळवले की भक्ती होते.

**राजयोग** : भगवंताचे दर्शन किंवा आत्मज्ञान हा अनुभव आहे. त्यासाठी राजयोग स्थिरचित्त व्हावयास सांगतो. आपल्या मनाच्या ज्या हालचाली सतत चालू असतात त्यांना वृत्ति किंवा स्पंदने म्हणतात. वृत्तींचा उगम हवेनकोपणामध्ये म्हणजे वासनांमध्ये असतो. एखाद्या तळ्याच्या तळामधून जसे बुडबुडे वर येतात त्याप्रमाणे चित्तातून एकसारख्या वर येणाऱ्या वृत्ती थांबविण्याचा उपाय म्हणजे त्या दाबून टाकाव्या असे राजयोग म्हणजेच पातंजल योग सांगतो. यालाच चित्तवृत्तिनिरोध म्हणतात. ज्ञानमार्गाप्रमाणेच योगमार्गावर वाटचाल करणारा साधक अधिकारी असावा लागतो. वृत्तिनिरोध साधण्यासाठी निरंतर अभ्यासाची व वैराग्याची जोड असावी लागते. यम, नियम, आसन, प्राणायाम आणि प्रत्याहार ही या योगाची बहिरंग साधने असून धारणा, ध्यान व समाधि ही अंतरंग साधने होत. अशा प्रकारे एकूण आठ अंगे असणाऱ्या या योगास अष्टांगयोग असेही म्हणतात आणि यावर पतञ्जली मुनींनी सूत्रे लिहिलेली असल्यामुळे हा योग पातञ्जल योग या नांवानेही ओळखला जातो. या मार्गावरील समाधि या शेवटच्या पायरीवर पोचण्यासाठी योग्याला कठोर साधन करावे लागते, आणि थोडा जरी गाफिलपणा झाला तरी पतनाची भीती असते. हा मार्ग किती अवघड आहे हे ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात केलेल्या वर्णनावरून लक्षात येते. तसेच गीतेच्या बाराव्या अध्यायातही ''क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्त चेतसाम्॥'' १२.५॥ असे भगवंत सांगतात. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ''वांचूनि योगाचेनि बळें। अधिक कांहीं मिळे। ऐसें नाहीं आगळे। कष्टचि तया ॥१२.५९॥... म्हणोनि योगाचिया वाटा। जे निगाले गा सुभटा। तयां दुःखाचाचि सेल वांटा। भागा आला ॥६९॥... म्हणोन येर ते पार्था। नेणतीचि हे व्यथा। जे कां भक्तिपंथा। वोटंगले॥'' १२.७५॥

संसारात राहून योग साधणे कठीणच. योगातील यम, नियम इत्यादी भक्तीतही लागतात. पण भक्तिमार्गात त्यांचे भगवंतावरील प्रेमामुळे सहज आचरण होते. प्रेम असेल तेथे कष्ट वाटत नाहीत. योगमार्गाने जे साधते ते भगवंताची उपासना करूनही साधते असे पतंजलींनी ''ईश्वरप्रणिधानाद्वा'' या सूत्रात सांगितले आहे. योगाच्या क्रियांमध्ये वृत्तींचा निरोध करण्याच्या

खटपटीत साधक भगवंताला विसरण्याची शक्यता असते. म्हणून वृत्ती भगवदाकार झाली की ईश्वरदर्शन होते असे भक्तिमार्ग सांगतो. भगवंत आहे या श्रद्धेने भक्तीची सुरुवात होते. नवविधा भक्तीपैकी कोणत्या तरी प्रकाराने भक्त आपला संबंध भगवंताशी जोडतो. अशा प्रकारे भक्तिमार्गात सुरुवातीपासून शेवटपर्यंत भगवंताचे अस्तित्व असते.

कर्मयोग, ज्ञानयोग व राजयोग हे तीन्ही सामान्य माणसाला आचरण करण्यास कठीण मार्ग आहेत. तसेच ज्यांना ते शक्य होतात त्यांचा अहंकार वाढण्याची सदैव भीती असते. याच्या उलट भक्तीमध्ये सुरुवातीपासूनच शरणागती असते. साधन म्हणून सुरू झालेली भक्ती शेवटी साध्यात परिणत होते. मार्गच मुक्काम होतो. साधनाने साधत नाही हे जाणवू लागले की भक्त भगवंताला पूर्णपणे शरण जातो. भगवंताने त्याचा अंगीकार केल्यावर त्याचे भगवंताशी तादात्म्य होते. पण तरीही भक्तिसुख भोगण्यासाठी तो भगवंतापासून वेगळा रहातो. भक्तीमुळे लाभलेल्या आपल्या अवस्थेचे वर्णन करताना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "पांडवासी सदा काळी कृष्ण राहिला जवळी। ज्ञानदेवाहृदयकमळीं तैसाचि स्थिरावला॥"

श्रीकृष्ण उद्धवाला भक्तीचा महिमा सांगताना म्हणतात, "न साधयति मां योगो न सांख्यं धर्म उद्धव। न स्वाध्यायस्तपस्त्यागो यथा भक्तिर्ममोर्जिता॥ भक्त्याऽहमेकया ग्राह्यः श्रद्धयाऽऽत्मा प्रियः सताम्। भक्तिः पुनाति मन्निष्ठा श्वपाकानपि सम्भवात्॥" भागवत ११.१४.२०-२१॥ या श्लोकांवर टीका लिहिताना एकनाथ महाराज म्हणतात, "रत्नासवें जैशी दीप्ती। अरुणासवें जेवीं गभस्ती। तेवीं भक्तीपाशीं मी श्रीपती। असें निश्चितीं उद्धवा ॥२६१॥... जो मी ज्ञानियांचा आत्मा। भक्तांचा प्रिय परमात्मा। शास्त्रीं प्रतिपादिती पुरुषोत्तमा। तो मी साउमा त्या धांवे ॥२६८॥... माझे गाठीं कांहीं नाहीं। भक्तीं सर्वस्वें वेंचूनि पाहीं। नाना उपचारउपायीं। महत्त्व तिहीं मज दिधलें ॥२७१॥ मज अचक्षूसि दिधले डोळे। अश्रोत्रा श्रवण दिधले। मज अमुखा तिहीं मुख केलें। त्यांचेनि बोलें मी बोलका ॥२७२॥ मज त्यांचेनि गमनागमन। त्यांचेनि अवयव अळंकरण। त्यांचेनि मज नेमस्त स्थान। मज समर्थपण त्यांचेनि ॥२७३॥ मज नामरूप तिंही करणें। मज पवित्रता त्यांचेनि गुणें। मज वैकुंठीचें ठाणें। भक्ती अचळपणें दीधलें ॥२७४॥ येथवरी निजभक्तांसी। मी वश्य झालों भक्तीपाशीं। यालागीं अहर्निशीं। मी भक्तांपाशीं तिष्ठतू ॥२७५॥ मी अजन्मा त्यांचेनि जन्म धरीं। मी अकर्मा त्यांचेनि कर्म करीं। त्यांचेनि बोलें उद्धरीं। नाममात्रें

महापापियां ॥ २७६ ॥ नारदवचनासाठीं। वाल्मीकि परमपापी सृष्टीं। ग्यां वंद्य केला वैकुंठीं। नामपरिपाटीं पवित्रत्वें ॥ २७७॥ येथवरी भक्तीची सत्ता। मजवरी चाले तत्त्वतां। भक्तीवेगळा सर्वथा। मीं न यें हाता कोणाचे ॥ २७८॥ भक्तांच्या उपकारता। मी थोर दाटलों तत्त्वतां। नव्हेचि प्रत्युपकारता। आधीन सर्वथा यालागीं ॥ २७९॥... भक्त माझेनि सनाथ। माझेनि झाले ते कृतकृत्य। माझेनि आनंदें ते सदा तृप्त। बोसंडत निजबोधें ॥ २८१ ॥... एवं माझ्या निजपदाची सत्ता। जरी आली भक्तांच्या हाता। तरी स्वामित्व ठेवूनि माझे माथां। माझे भक्तिपंथा विनटले ॥ २८७॥... माझे भक्तीवीण कर्मधर्म। जाण पां तो केवळ भ्रम। चुकलें मत्प्राप्तीचे वर्म। तो धर्म अधर्म परिणमे ॥ २९९॥"

नाथभागवत अ. १४

नाथभागवतातील वरील अवतरणावरून भक्तीचे महत्त्व स्पष्ट होते. तथापि भक्तीच्या बाबतीतही साधकाच्या संकल्पना स्पष्ट नसल्या तर तो केवळ पूजादि कर्मकाण्डात गुरफटण्याची शक्यता असते. म्हणून जर सत्संगति, डोळसपणे सद्ग्रंथांचा अभ्यास आणि अखंड नामस्मरणाचे लक्ष्य ठरवून त्या दिशेने वाटचाल या तीन गोष्टी साधक कटाक्षाने करत राहिला तर त्याचे पतन होत नाही. सर्व काही सद्गुरु करवतात असा भाव ठेवला तर साधनाचा अहंकार होत नाही. मग श्रीमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे भक्त जर एक पाऊल पुढे गेला तर त्याला भेटण्यासाठी भगवंत चार पावले पुढे येतो.

परमप्रेमरूपा भक्ती अन्य मार्गांपेक्षा श्रेष्ठ का आहे ते नारद आता पुढील सूत्रात सांगत आहेत.

## सूत्र सव्विसावे

**फलरूपत्वात् ॥ २६ ॥**

**कारण ती पराभक्ति स्वतःच फलरूप असल्यामुळे कर्म, ज्ञान व योग या मार्गांपेक्षा श्रेष्ठ आहे.**

**विवरण** : सामान्य माणसाने आचरणात आणण्याच्या दृष्टीने विचार करतां कर्मयोग, ज्ञानयोग आणि राजयोग यांच्या मर्यादा आपण पाहिल्या. हे तीन्ही योग ईश्वरप्राप्तीची साधने आहेत. भक्तीच्या बाबतीत मात्र ईश्वर गृहीत धरला नाही तर भक्ती होणारच नाही. निर्गुण परमात्म्याला संतांनी सगुणात आणले हे त्यांचे आपल्यावर फार मोठे उपकार आहेत असे श्रीमहाराज म्हणत. सामान्य माणसाला होणारे भगवंताचे दर्शन म्हणजे कारागिराने बनवलेल्या मूर्तीचे दर्शन

असते तर तुकाराम महाराज जेव्हा "सुंदर ते ध्यान उभें विटेवरी। कर कटावरी ठेवूनियां॥" असे पांडुरंगाचे वर्णन करतात तेव्हा ती दगडाची मूर्ती नसून साक्षात् चिन्मय पांडुरंग असतो. श्रीमहाराज नैमिषारण्यात जायला निघाले तेव्हां गोंदवल्याच्या थोरल्या रामाच्या मूर्तीच्या डोळ्यातून अश्रू आले! भक्ताची भगवंताच्या भेटीची तळमळ जेव्हा शिगेला पोचते, त्याचे अश्रू थांबेनासे होतात तेव्हा जडामधून चैतन्याला प्रकट व्हावे लागते. मग भक्त आनंदमय होतो. "आँसुवन जल सींच सींचि प्रेमबेल बोई। अब तो बेली फैल गयी आनंदबन होई॥" असे मीराबाई सांगते. सामान्य माणसाला भगवंताच्या मूर्तीच्या दर्शनात समाधान नसते तर संत समाधानरूपच असतात. म्हणून भक्ताला भगवंताच्या दर्शनाने जेव्हा अधिकाधिक समाधान वाटू लागते तेव्हा भक्त समृद्ध होतो आणि त्याच्या भक्तीच्या वेलीला बहर येतो. दर्शनातील अपूर्णता कमी होऊ लागते, समाधान वाढू लागते. शेवटी भक्त भगवंतामध्ये विलीन होऊन भक्तिसुख भोगण्यासाठी पुन्हा वेगळेपणाने उरतो. सुरुवातीला पूजा, नामस्मरण इत्यादी साधने करत भक्त स्थूलाच्या पातळीवर सगुणोपासनेत रमलेला असतो. पुढे त्यातूनच तो अधिकाधिक सूक्ष्म पातळीवर जातो. त्यानंतर भगवंताचे अस्तित्व त्याला प्रथम स्वतःमध्ये आणि नंतर सर्व जगामध्ये प्रचीतीला येते. It is a progressive revelation of the Divine. साधन म्हणून सुरू केलेल्या भक्तीचे साध्यात पर्यवसान होते; मार्गच मुक्काम होतो. मग फळाला आणखी फळ ते कसले असणार?

सुरुवातीला मूर्तीमध्ये देव आहे अशी भावना ठेवून साधक भक्त भगवंताची पूजा करत असतो. ही भावना कधी जागी राहाते, कधी राहात नाही; हळूहळू अभ्यासाने मूर्तीतील भगवंताच्या अस्तित्वाची भावना स्थिर होते व भक्त मानस पूजेच्या सूक्ष्म पातळीवर प्रवेश करतो. त्याचे मन भगवंताच्या मनात मिसळते. भगवंताची इच्छा तीच त्याची इच्छा होते, आणि त्याला भगवंताच्या सान्निध्याची जाणीव होते. हळूहळू चोवीस तास तो भगवंताच्या सान्निध्यात राहू लागतो. मनाबरोबर त्याची बुद्धीही भगवंताने व्यापली जाते. मग भगवंताखेरीज दुसरे विचार त्याच्या मनात येत नाहीत आणि आले तरी तो त्यात गुंतत नाही. मन आणि बुद्धी भगवंताने व्यापल्यावर त्याचा अहंकारही क्षीण होतो; तो भगवंताच्या पादपद्मी विलय पावतो. ज्ञानेश्वर महाराज सांगतात, "उचललेया प्राणासरिसीं। इंद्रियेंही निगती जैसीं। तैसा मनोबुद्धिपाशीं। अहंकारु ये॥" ज्ञानेश्वरी अ.१२.१०१॥ अशी अवस्था

झाल्यावर भक्ताला जगात भगवंताखेरीज दुसरा व्यवहार रहात नाही. जनाबाईनी या स्थितीचे फार सुरेख वर्णन केले आहे. ती सांगते, "देव खातें देव पितें। देवावरी मी निजतें ॥ १ ॥ देव देतें देव घेतें। देवासवें व्यवहारितें ॥ २ ॥ देव येथें देव येथें। देवाविणें नाहीं रितें ॥ ३ ॥ जनी म्हणे विठाबाई। भरूनि उरलें अंतरबाहीं ॥ ४ ॥" जसा 'मी' मला कधीही विसरत नाही तसा तीन्ही अवस्थात भगवंताचा विसर पडत नाही. हे साधण्यास नामस्मरणासारखा उत्तम मार्ग नाही असे श्रीमहाराजांनी कळकळीने सांगितले आहे. सामान्य प्रापंचिकाला कर्मयोग, ज्ञानयोग किंवा राजयोग आचरणात आणण्यास कठीण आहेत पण नामस्मरण शक्य आहे. समर्थ रामदास सांगतात, "कांहीं सांडावें लागत नाहीं। कांहीं मांडावें लागत नाहीं। येक विचार शोधून पाहीं। म्हणिजे कळे॥ दासबोध २०.७.२॥ जगदीशापरता लाभ नाहीं। कार्याकारण सर्व कांहीं। संसार करित असतांही। समाधान॥" दासबोध १२.८.३०॥

हे साधल्याच्या काही खुणा सांगता येतील. (१) इतर सर्व आधार सुटून केवळ भगवंताचा आधार वाटू लागला की भक्ताच्या ठिकाणी निर्भयता येते. (२) निर्भयतेमुळे निश्चिंतता येते. दुःख, शोक व चिंता नाहीसे होतात. (३) माझा त्राता भगवंत आहे अशी खात्री होऊन भक्ताला सर्वकाळ सुरक्षितता वाटू लागते. (४) मनातील फालतू विचार थांबून केवळ भगवंताचा विचार व त्याचे नाम स्थिर होतात. ही स्थिती राजयोगातील विचारशून्यतेसारखीच असते. (५) प्रपंचातील आसक्ति स्वाभाविकपणे कमी होते. अमृतरायांच्या पदात म्हटल्याप्रमाणे 'आहे आहे, नाहीं नाहीं' अशी अवस्था होते. संसार सुटतो. तथापि संसारात राहूनच भक्त निरासक्त जीवन जगतो.

भक्ती हेच साध्य असल्यामुळे इतर साधनांपेक्षा भक्ताच्या दृष्टीने ती स्वतःच फलरूप आहे व त्यामुळे अन्य योगांपेक्षा श्रेष्ठ आहे हे सांगून झाल्यावर आता भगवंताच्या बाजूने विचार केला तरी भक्ती कशी श्रेष्ठ आहे ते नारदानी पुढील सूत्रात सांगितले आहे.

## सूत्र सत्ताविसावे

**ईश्वरस्याप्यभिमानद्वेषित्वाद् दैन्यप्रियत्वाच्च ॥ २७॥**

**ईश्वरस्य= ईश्वराचे. अपि= सुद्धा. अभिमानद्वेषित्वाद्= अभिमानाशी वैर असल्यामुळे. दैन्यप्रियत्वात्= दीनता प्रिय असल्यामुळे. च=आणि.**

**ईश्वराचे सुद्धा अभिमानाशी वैर असल्यामुळे आणि दीनता त्याला प्रिय असल्यामुळे - कर्मयोग, ज्ञानयोग व राजयोग यांपेक्षा भक्ती श्रेष्ठ आहे.**

**विवरण** : भगवद्गीतेच्या नवव्या अध्यायात भगवंत म्हणतात, "समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः।" म्हणजे मी सर्व भूतांच्या ठिकाणी समभावाने व्यापक आहे. मला कोणीही अप्रिय नाही किंवा प्रिय नाही. मात्र याच श्लोकाच्या दुसऱ्या चरणात ते सांगतात, "ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥९.२९॥" म्हणजे तथापि जे भक्त मला प्रेमाने भजतात ते माझ्यात व मीही त्यांच्यात प्रकट असतो. जसा अग्नी सूक्ष्म रूपाने सर्व जागी व्यापक असूनही साधनांनी प्रकट केला असता प्रत्यक्ष दिसतो, तसाच परमेश्वर सर्व ठिकाणी व्यापून असला तरी भक्तीने भजणाऱ्याच्या अंतःकरणात प्रत्यक्ष प्रकट होतो. ह्या सूत्रात नारदानी भगवंताला अभिमान बाळगणाऱ्याचा द्वेष वाटतो आणि दीनांबद्दल प्रेम वाटते म्हणून सांगितले आहे. आपण पाहिले की भक्त लीन होतो तर कर्मयोग, ज्ञानयोग अथवा राजयोगाचे आचरण करणाऱ्यांचा अहंकार वाढतो म्हणून भगवंताच्या बाजूनेही त्याचा भक्तांकडे ओढा असतो. गीतेच्या सोळाव्या अध्यायात आसुरी संपत्तीच्या माणसांबद्दल भगवंत सांगतात की "तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान्। क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥१६.१९॥" म्हणजे त्या द्वेषी पापाचरण करणाऱ्या क्रूरकर्मी नराधमांना मी संसारात वारंवार आसुरी योनीतच टाकतो. याचा अर्थ असा होतो की भगवंताजवळ पक्षपात नाही. सदाचरणी माणूस त्याच्या सदाचरणामुळे उत्तरोत्तर उच्च योनीत जातो तर पापाचरण करणारा माणूस त्याच्या पापाचरणामुळेच उत्तरोत्तर अधम योनीत जातो.

समोऽहं सर्वभूतेषु हे भगवंताचे स्वरूप लक्षण (Essential quality) आहे तर त्याला भक्त प्रिय आहेत हे त्याचे तटस्थ लक्षण (Accidental quality) आहे. ईश्वर आहे; तो नाही असे होत नाही. तो चेतन आहे आणि पूर्ण म्हणजे आनंदस्वरूप आहे. सच्चिदानंद हे भगवंताचे स्वरूप लक्षण आहे. ईश्वर षड्गुणैश्वर्यसंपन्न आहे. तो दृश्य निर्माण करावयाचा संकल्प करतो व त्या संकल्पातून विश्व निर्माण होते ही त्याची तटस्थ लक्षणे आहेत. प्रस्तुत सूत्रात ईश्वराला (१) अभिमान आवडत नाही आणि (२) त्याला दैन्य प्रिय आहे ही सांगितलेली दोन्ही लक्षणे तटस्थ लक्षणे आहेत ही गोष्ट लक्षात ठेवून या सूत्राचा विचार केला पाहिजे.

मा, मान म्हणजे मोजणे. अभि म्हणजे अधिक. माणूस जेव्हा तो असतो त्यापेक्षा स्वतःला मोठा मानू लागतो - मोजू लागतो तेव्हा अभिमान निर्माण होतो. हा अभिमान साधनाच्या आड येतो. म्हणून, एक वेळ व्यसनी माणूस चालेल पण मला अभिमानी माणूस चालत नाही असे श्रीमहाराज म्हणत असत. ते सांगतात, "परिसाला लोखंड लागले म्हणजे त्याचें सोनें होतें, पण रुप्याचें कांहीं सोनें होत नाहीं; तसें आपण दीनाहून दीन, म्हणजे अभिमानरहित झाले पाहिजे. आणि असें झालें म्हणजेच परमात्म्याला शरण जाता येईल. हें व्हायला त्याची कृपाच पाहिजे, आणि ती नित्य भाकावी." एका प्रवचनात (११मार्च) ते म्हणतात, "अभिमान हा शेतात उगवणाऱ्या हरळीसारखा आहे. ही हरळी समूळ नाहींशीं केल्याशिवाय चांगलें पीक हातीं लागत नाहीं. त्याप्रमाणें अभिमान संपूर्णपणे नाहींसा झाल्याशिवाय परमेश्वरी कृपेचें पीक येणेंच शक्य नाहीं." माणसाला आपल्या ज्ञानाचा, सत्तेचा, वैभवाचा, वक्तृत्वाचा, कलेचा अभिमान वाटतो. माझ्यासारखा कर्तृत्ववान दुसरा नाही असे त्याला वाटते. मी कर्ता नसून खरा कर्ता भगवंत आहे हे त्याच्या लक्षात येत नाही. मी हे अभिमानाचे मूळ आहे. माणसाच्या वासनांमुळे मीपणा येतो. वासना हा अभिमानाचा विषारी दात आहे. तो काढला की मीपणा राहिला तरी तो मी भगवंताचा दास आहे अशा स्वरूपाचा असतो, आणि मौज अशी की अनन्यशरण दासाचा भगवंताला अभिमान असतो! म्हणून ईश्वराव्यतिरिक्त मायेची सृष्टी आहे तिचा अभिमान असता कामा नये. कारण हा अभिमान सांत राहून अनंताला गवसणी घालण्याच्या हास्यास्पद प्रयत्नाला प्रवृत्त करतो. स्वार्थ हे देहबुद्धीचे व मीपणाचे लक्षण आहे. म्हणून स्वार्थ असेल तेथे अभिमान असतोच. स्वार्थ माणसाला संकुचित करतो. अभिमानामुळे अंतर्यामी असलेल्या भगवंताला विसरून माणूस बहिर्मुख होतो. म्हणून भगवंताला अभिमान आवडत नाही. इतकेच नव्हे तर अभिमानी माणसाबद्दल त्याला द्वेष म्हणजे अतीव नावड (intense dislike) असते. भक्ताला मी भगवंताचा आहे असा अभिमान असतो. कारण मग त्याचे म्हणून जे असते ते सर्व-घरदार, बायकोमुले, संपत्ती - भगवंताचे असते. हे सर्व भगवंताने दिलेले आहे या पार्श्वभूमीवर त्याचा सर्वांशी व्यवहार असतो. समर्थ रामदास एकदा सज्जनगडावर जायला निघाले होते. पायाथ्याशी असतानाच त्यांना बरे वाटेनासे झाले. खूप खोकला झाला म्हणून पायथ्याशीच ते रघुनाथभट नांवाच्या ब्राह्मणाकडे आठ दिवस राहिले. रघुनाथभटाने त्यांची मनापासून सेवासुश्रूषा

केली व त्यांना बरे वाटू लागल्यावर गडावर जाण्यासाठी आपला घोडा दिला. गडावर गेल्यावर समर्थांनी त्याला एक पत्र लिहून त्याने केलेल्या सेवेबद्दल आभार मानताना म्हटले आहे की मी या उपकारांची फेड कशी करणार? कारण 'रघुनाथावेगळे मज कोणी नाही.' अर्थात तुम्हाला काय द्यायचे ते रामच देईल. श्रीमहाराजही नेहमी राम दाता म्हणत. त्यांच्या मुखात नेहमी राम इच्छा व राम कर्ता हे शब्द असत.

वर दिलेल्या समर्थांच्या उद्‌गारात केवळ निरभिमानता नसून खरी लीनता आहे. अहंकार व अभिमान मावळल्याखेरीज लीनतेचा व शरणागतीचा उदय होत नाही. श्रीमहाराज एक गोष्ट सांगत. भारतीय युद्ध संपल्यानंतर एकदा सर्व पांडव आणि त्यांचा परिवार श्रीकृष्णाबरोबर बोलत बसले होते, तेव्हां जुन्या गोष्टी निघाल्या. द्रौपदीने श्रीकृष्णाला विचारले की कौरवांच्या सभेत माझी विटंबना चाललेली असताना माझे रक्षण करावयाला येण्यास तू उशीर का केलास? तेव्हां श्रीकृष्ण म्हणाले की द्रौपदी, मी सुरुवातीपासून तेथे होतो पण तू मला हाक मारली नाहीस. जेव्हा हाक मारलीस तेव्हा लगेच आलो. तुला अर्जुन, भीम इत्यादींच्या कर्तृत्त्वाचा अभिमान होता. ते तुझे रक्षण करतील असे वाटत होते. त्यांनी माना खाली घातल्यावर तुला भीष्म, द्रोणांचा भरंवसा वाटत होता. पण त्यांनीही मदत केली नाही. आपल्या हातांनी तू लुगड्याच्या निऱ्या घट्ट धरून ठेवल्या होत्यास. ते हातही सुटल्यावर तू मला पूर्णपणे शरण गेलीस. त्यामुळे हाक मारल्याबरोबर मला प्रकट व्हावे लागले. याचा अर्थ जोपर्यंत नातेवाईक, मित्र, पैसा, सत्ता, विद्वत्ता इत्यादींचा माणसाला आधार वाटतो तोपर्यंत तो भगवंताला लीन होऊन शरण जात नाही. त्यामुळे भगवंताची करुणा जागी होत नाही. म्हणून अभिमान नसावा ही नकारात्मक बाजू आणि दीनता, लीनता असणे ही होकारात्मक बाजू म्हणता येईल. भगवंताला भक्ताचा अभिमान आवडत नाही आणि त्याची लीनता त्याला प्रिय आहे. भगवंताशिवाय मी अनाथ आहे असे जेव्हा भक्ताला वाटू लागते तेव्हाच तो खरा दीन होतो. मग तो भगवंताचा किंवा गुरूचा खऱ्या अर्थाने स्वीकार करतो. आणि भक्त केव्हा स्वीकार करतो याची भगवंत वाटच पहात असतो. **The moment you accept Him, He has already accepted you,** असे योगी अरविंद म्हणतात. दीनतेशिवाय स्वीकार होत नाही आणि स्वीकाराशिवाय भक्ती होत नाही. भक्ताने भगवंताचा अथवा सद्‌गुरूंचा स्वीकार

केल्यावर संसारात त्याच्या वाट्याला दुःख आले तरी ते त्याने दिलेले आहे म्हणून भक्त त्याचा प्रसन्न मनाने स्वीकार करतो. "देव सोयरा देव सोयरा देव सोयरा दीनांचा" असे तुकाराम महाराज सांगतात. आपण परिस्थितीला लाचार असतो. त्या लाचारीचा भगवंताकडे उपयोग करावा. हे जमत नाही कारण अभिमान आड येतो. म्हणून अभिमान जाणे आणि लीनता येणे हे बरोबरच घडते. भक्ताविषयी भगवंताच्या मनात करुणा उपजली की कृपा होण्यास वेळ लागत नाही. भक्ताचा अभिमान गेला की तो दीन, लीन होतो आणि भगवंताच्या हृदयात दया (compassion) करुणा (mercy) कृपा (grace) जाग्या होतात. वृक्षाचा रस, माधुर्य, कृतकृत्यता, आणि सौंदर्य जसे वृक्षाच्या फळामध्ये असते तसे ईश्वराच्या साधनाचे सौंदर्य, परिपूर्णता, कृतकृत्यता, माधुर्य आणि रसमयता भक्तीमध्ये आहे.

योगमार्गामध्ये साधनावर इतका भर असतो की त्यात मीपणाखेरीज साधनात प्रगती होत नाही. अभिमानाचे खरे स्वरूप शोधणे हे वास्तविक ज्ञानाचे काम आहे. पण ते करावयाचे सोडून ज्ञानमार्गी त्यांच्या ज्ञानाचा गर्व बाळगताना दिसतात. एक भक्तीच अशी आहे की ज्या मार्गात अभिमान बाजूला करून भक्त सहजपणे भगवंताकडे जातो. अभिमान सोडून तो हृदयस्थ परमेश्वराला सन्मुख होऊन राहतो. ज्ञानेश्वर महाराज अमृतानुभवात सांगतात की मीपणा सोडला तरच माणसाला विशाल होता येते. "सांडुनि मीठपणाचा लोभु। मिठे सिंधुत्वाचा घेतला लाभु। तेवि अहं देऊनि शंभु। शांभवी झालो ॥ १.३३॥

भक्ताविषयी श्रीमहाराज म्हणाले की प्रपंचात जेवढी आसक्ति तेवढी भगवंताविषयी प्रीति म्हणजे भक्ति. अभिमान सुटल्याशिवाय प्रपंचाची आसक्ती सुटत नाही. म्हणून पराभक्तीच्या प्राप्तीसाठी कोणते साधन करावयाचे याविषयीची मते नारद पुढील सूत्रापासून सांगत आहेत.

## सूत्र अठ्ठाविसावे

**तस्या ज्ञानमेव साधनमित्येके ॥२८॥**

**तस्याः= तिचे, त्या परमभक्तीचे. ज्ञानमेव= ज्ञान हेच. साधनम्= साधन. इति= असे. एके= काही आचार्य.**

**त्या परमभक्तीचे (परमभक्तीच्या प्राप्तीचे) ज्ञान हेच साधन आहे असे काही आचार्य प्रतिपादन करतात.**

## सूत्र एकोणतिसावे

**अन्योन्याश्रयत्वमित्यन्ये ॥२९॥**

**अन्य अन्य आश्रयत्वम्= एकमेकांना, परस्परांना आधारभूत. इति= असे. अन्ये= दुसरे काही आचार्य.**

**दुसरे काही आचार्य ज्ञान आणि भक्ति परस्परांना आधारभूत आहेत असे प्रतिपादन करतात.**

**विवरण :** वर दिलेल्या दोन सूत्रांचा इतर आचार्यांची मते म्हणून एकत्र विचार करू. काही आचार्यांच्या मते भगवंताची परमभक्ती साध्य होण्यास ज्ञान हे साधन आहे. याचा अर्थ ज्ञानाशिवाय भक्ती साधणार नाही. दुसऱ्या काही आचार्यांच्या मते भक्ती व ज्ञान यांचा साध्य साधन संबंध नसून ती दोन्ही एकमेकांवर अवलंबून आहेत. दोहोंची एकमेकांच्या आधाराने वाढ होते.

भगवद्गीतेच्या चौथ्या अध्यायात 'न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।' (या लोकीं ज्ञानासारखे पवित्र करणारे दुसरे काही निःसंदेह नाही) असे म्हटले आहे. ब्रह्मसूत्रे व उपनिषदेही ज्ञानानेच कैवल्याची प्राप्ती होते असे सांगतात. प्राचीन कालापासून भारतात सत्ता, विद्वत्ता म्हणजे पुस्तकी पांडित्य, संपत्ती यांपेक्षा आत्मज्ञानाला महत्त्व आहे. आत्मज्ञानी पुरुषाच्या स्वागताला राजा सिंहासनावरून उतरून सामोरा जात असे. भगवद्गीतेच्या अठराव्या अध्यायात भगवंत सांगतात, "ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न काङ्क्षति। समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥१८.५४॥" म्हणजे सच्चिदानंदघन ब्रह्माशी तद्रूप झालेला प्रसन्न चित्ताचा पुरुष कशाबद्दलही शोक करीत नाही व कसली आकांक्षाही धरीत नाही. सर्व भूतांच्या ठिकाणी समभाव झालेल्या त्या पुरुषाला माझी पराभक्ति प्राप्त होते. या ठिकाणी ब्रह्मज्ञान ही पराभक्तीच्या आधीची पायरी आहे असे म्हटले आहे. पण पुढच्याच श्लोकात म्हटले आहे की "भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः। ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम् ॥१८.५५॥" म्हणजे पराभक्तीच्या द्वारा तो मला तत्त्वतः उत्तम प्रकारे जाणतो आणि मी जो कोणी व जसा आहे तसा मला त्या भक्तीमुळे यथार्थपणे जाणून त्याचवेळी माझ्या ठिकाणी प्रवेश करतो.

माणसाच्या व्यावहारिक जीवनाप्रमाणे त्याच्या पारमार्थिक जीवनात देखील बुद्धी व भावना या दोहोंची आवश्यकता असते. बुद्धीमध्ये विचार, विवेक, तर्क इत्यादींचा समावेश होतो. भावनेमध्ये राग, लोभ, तिरस्कार इत्यादी येतात.

काही माणसांचा बुद्धीवर भर असतो तर दुसरे काही लोक भावनाशील असतात. बुद्धिवादी माणूस भावनाशून्य असला तर तो शुष्क, तर्कवादी व कठोर बनतो आणि भावनाप्रधान माणसाने विवेकाचा आश्रय घेतला नाही तर त्याचे जीवन उथळ, दिशाहीन व भरकटणारे होऊ शकते. म्हणून पारमार्थिक जीवनात या दोहोंची आवश्यकता आहे हे लक्षात ठेवून या सूत्रांचा विचार केला पाहिजे. ज्ञान व भक्ति यांचा संबंध सांगताना 'भक्त्या मामभिजानाति' ह्या श्लोकावरील टीकेत ज्ञानेश्वर महाराज म्हणतात आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी व ज्ञानी भक्तांच्या पैकी ज्ञानी भक्तांच्या बाबतीत "ज्ञानी इयेतें स्वसंविति। शैव म्हणती शक्ती। आम्ही परमभक्ती। आपुली म्हणों ॥१८.११३३॥ ज्ञानी भक्त या चौथ्या भक्तीला 'स्वसंवित्ति' म्हणजे आत्मज्ञान म्हणतात, शैव हिला शक्ति म्हणतात आणि आम्ही परमभक्ति (श्रेष्ठ भक्ति) म्हणतो. शंकराचार्यांनी विवेकचूडामणिमध्ये मोक्षप्राप्तीच्या साधनांमध्ये भक्ती श्रेष्ठ आहे असे म्हणून आत्मरूपाचे अनुसंधान म्हणजे भक्ति अशी भक्तीची व्याख्या केली आहे. म्हणजे सगुणोपासनेचा विचार न करता त्यांनी केवळ ज्ञानभक्तीच विचारात घेतली आहे. त्यामुळे ज्ञानपूर्व भक्ति व ज्ञानोत्तर भक्ति असा भेद करावा लागतो.

ज्ञान म्हणजे आत्मज्ञान असा अर्थ न करता एखाद्या विषयाची माहिती असणे असा सर्वसामान्य अर्थ घेतला तर भक्तीला ज्ञानाचे अधिष्ठान लागते हे मान्य करावे लागते. ज्याची भक्ती करावयाची त्याचे माहात्म्य व काही प्रमाणात तात्त्विक स्वरूप माहीत असावे लागते. सत्पुरुषाच्या सामर्थ्याची, ज्ञानाची, थोरपणाची काही प्रमाणात कल्पना आल्याखेरीज त्याच्या सांगण्यावर आपली श्रद्धा बसत नाही. उदाहरणार्थ, व्रजगोपिकांना सुरुवातीला श्रीकृष्ण हा परमात्मा आहे हे जरी माहीत नव्हते तरी तो असामान्य आहे याची त्यांना जाणीव होती. म्हणून अशा ज्ञानातून जेव्हा भक्ती निर्माण होते तेव्हा ते ज्ञान भक्तीचे साधन ठरते. भगवंताच्या अथवा सद्गुरूच्या असामान्यत्वाचे ज्ञान झाले की त्यांच्याविषयी प्रेम वाटू लागते व त्या प्रेमाचे शेवटी पराभक्तीमध्ये रूपांतर होते.

ज्ञान हे भक्तीचे साधन मानले तर ज्ञानाला गौणत्व येते. पण येथे ज्ञान म्हणजे आत्मज्ञान नसून ओळख, जाणीव यांसारख्या मर्यादित अर्थाने ज्ञान शब्द वापरला आहे हे लक्षात घेतले की हे मर्यादित स्वरूपाचे ज्ञान साधन म्हणून भक्तीपेक्षा गौण ठरते. साधन आणि साध्य हे संबंधित शब्द (relative terms) आहेत. साधन समजावयाला साध्याची जाणीव असावी लागते.

उदाहरणार्थ, भगवद्दर्शन हे साध्य आणि भक्ति हे साधन. साध्य व साधन एकरूप असले तर साधन म्हणण्याला काही अर्थ राहात नाही. म्हणजे साध्य व साधन यांमध्ये नेहमी अंतर असते. परमार्थात हे अंतर कमी करण्यासाठी अभिमान कमी कमी करत साध्याजवळ जाता येते. म्हणून अभिमान नाहीसा करणे हा साधनाचा प्राण आहे असे श्रीमहाराज म्हणत.

ज्ञान हे भक्तीचे साधन खरे, पण त्या ज्ञानाने अहंकार वाढला तर ते साध्यापर्यंत न नेता उलट अडथळे निर्माण करते. आपले विचार शब्दांमुळे होतात व ज्ञान विचारांमुळे होते. पण आत्मज्ञानाच्या बाबतीत विचारांपेक्षा विचारशून्य अवस्था जास्त उपयोगी ठरते. "निर्विचारवैशारद्येऽध्यात्मप्रसादः ॥१.४७॥ असे पतंजलींनी म्हटले आहे. पण विचारशून्यता ही सोपी गोष्ट नाही. म्हणून संत सांगतात की असा शब्द धरून ठेवावा की त्यामुळे दुसऱ्या विचारांचा मनात शिरकावच होणार नाही. भगवंताचे नाम हा असा शब्द आहे. एकनाथ महाराजांनी रामनामाला महामौन म्हटले आहे. वास्तविक आपण आत्मस्वरूप आहोत. म्हणून ईश्वराला शोधावयाला कोठे बाहेर जावयाचे कारण नाही. माणसाचे जे आत्मस्वरूप आहे ते हरवणे शक्य नाही. पण अविद्येचा पगडा इतका जबरदस्त असतो की त्यामुळे माणसाला आत्मस्वरूपाचा विसर पडतो. नामस्मरणाने त्याचे पुन्हा स्मरण होते. जितक्या प्रेमाने तुम्ही तुमच्या मुलाला हाक मारता तितक्या प्रेमाने भगवंताचे नाम घ्या. तो तुमच्या जवळच आहे असे श्रीमहाराज म्हणत असत. भगवंताविषयीचे प्रेम हीच भक्ती. सद्गुरूंनी दिलेल्या नामात त्यांची शक्ती असते. ते नाम श्रद्धेने घेतले की भगवंताकडे नेते. भगवंताचे दर्शन ज्ञानाने होत नाही. तो अनुभव भक्तीने मिळतो.

एकोणतिसाव्या सूत्रात म्हटले आहे की ज्ञान व भक्ती हे भगवत्प्राप्तीचे परस्परावलंबी उपाय आहेत. माणसाला जे खरे वाटते त्यावर त्याचे प्रेम बसते. अगदी व्यवहारात देखील पाकिटात जपून ठेवलेली नोट खोटी आहे असे कळले तर माणूस ती टाकून देतो. खऱ्या गोष्टीच्या प्रेमाप्रमाणेच माणसाला शाश्वताचे प्रेम वाटते. वास्तविक आपण एक दिवस मरणार हे माहीत असूनही माणूस देहावर प्रेम करतो कारण त्याला मरणाचे स्मरण रहात नाही. जेथे प्रेम तेथे अविद्येमुळे माणूस शाश्वततेची कल्पना करतो. आपण जेव्हा सगुणाची पूजा करतो तेव्हा त्यामध्ये देखील ज्ञान आणि प्रेम यांची भेसळ असते. सगुणाची उपासना करताना भक्त प्रेमाने त्यामध्ये लीन झाला तरच त्याला सगुणाचे ज्ञान

होते; आणि असे लीन होणे अभिमान बाजूला ठेवून तो स्वतःला विसरला तरच शक्य होते. ज्ञानाचा अभिमान सोडणे अवघड असते पण ज्ञानाबरोबर प्रेमही असेल तर अभिमान सहज नाहीसा होतो. म्हणून ज्ञान व प्रेम एकमेकांवर अवलंबून आहेत. ज्ञान पवित्र असले तरी शेवटी त्याचा प्रेमात लय झाला पाहिजे. नुसते ज्ञान रुक्ष असते. श्रीमहाराज म्हणत की नुसते ज्ञान संन्याशाच्या डोक्यासारखे खरखरीत असते; पण भक्ति रसमय असल्यामुळे लहान मुलाच्या जावळाप्रमाणे मृदु असते. एकनाथ महाराजही म्हणतात की "भक्ति प्रेमाविण ज्ञान नको देवा। अभिमान नित्य नवा तयामाजी ॥ १॥ प्रेम सुख देई प्रेम सुख देई। प्रेमेंविण नाहीं समाधान ॥ २॥ रांडवेनें जेविं शृंगारु केला। प्रेमेंविण जाला ज्ञानी तैसा ॥ ३॥ एका जनार्दनीं प्रेम अति गोड। अनुभवी सुरवाड जाणतील ॥ ४॥" भक्तिमार्ग हा प्रेमाचा मार्ग आहे. भक्तीतून ज्ञान होणे शक्य आहे. भक्तीतून शरणागती येते आणि ज्ञानाचे पर्यवसानही शरणागतीतच होते. भगवद्गीतेत भगवंत म्हणतात, "बहूनां जन्मनां अन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते। वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥७.१९॥" या श्लोकाचा अर्थ सांगताना श्रीमहाराज म्हणाले की अनेक जन्मांच्या शेवटी ज्ञानवान माणूस भगवंताला शरण जातो असे नसून तो आधी भगवंताला शरण जातो आणि म्हणून मग खरा ज्ञानी होतो!

ज्ञान व भक्तीचा संबंध असला तरी सामान्य माणसाला प्रेमभक्तीचा मार्ग शक्य आहे. मात्र (१) ज्या वस्तूवर वा व्यक्तीवर प्रेम असते ती सर्वोच्च मूल्याची (supreme value) वाटली पाहिजे. श्रीमहाराज म्हणाले की पैसा हा प्रापंचिकाचा प्राण आहे, म्हणून मी त्याला धक्का लावला नाही. हे म्हणताना त्यांनी सुचविले आहे की प्रापंचिक माणूस पैशावर जेवढे प्रेम करतो तेवढे तरी भगवंतावर केले पाहिजे. (२) दुसरी गोष्ट म्हणजे प्रेमवस्तूसाठी कोणताही त्याग करावयाची तयारी पाहिजे. (३) तिसरी गोष्ट अशी की प्रेमवस्तूचे सतत स्मरण आपोआप रहाते. आज आपल्याला भगवंताचे खरे प्रेम नाही पण ते यावे असे वाटते म्हणून आपण तिसऱ्या गोष्टीपासून म्हणजे प्रयत्नपूर्वक सतत त्याचे स्मरण ठेवून म्हणजे जास्तीत जास्त वेळ नामस्मरणाने सुरुवात करावी, म्हणजे त्यातून पहिल्या दोन गोष्टी निर्माण होतील. श्रीब्रह्मानंद महाराज श्रीमहाराजांच्या पादुका रेशमी दोरीने बांधून मंगळसूत्राप्रमाणे सतत आपल्या गळ्यात बाळगत असत. प्रेम, आदर, पावित्र्य आणि गुरूविषयीच्या पूज्य बुद्धीचे हे मूर्तिमंत उदाहरण आहे.

ज्ञान व भक्ति हे ईश्वर दर्शनाचे उपाय परस्परावलंबी आहेत असे म्हणताना ज्ञानातून भक्ति निर्माण होते आणि भक्तीतून ज्ञान निर्माण होते असा त्याचा अर्थ होतो. अशा प्रकारच्या अन्योन्याश्रयात (reciprocal dependence) एक तर्कदोष संभवतो. समजा एखादा माणूस अशक्त दिसला आणि तो म्हणाला कीं तापामुळे अशक्तपणा आला. त्याला विचारले ताप का आला आणि तो जर म्हणाला की अशक्तपणामुळे ताप आला तर यापैकी काय कशाचे कारण याचा समाधानकारक उलगडा होत नाही. म्हणून ज्ञान व भक्ती यांच्या संबंधात अशा प्रकारचा तर्कदोष टाळण्यासाठी ज्ञानपूर्व भक्ती व ज्ञानोत्तर भक्ती आणि भक्तिपूर्व ज्ञान व भक्तीतून निर्माण झालेले ज्ञान अशा प्रकारचे भेद करावे लागतात. म्हणून ज्ञान व भक्ती यांची लक्षणे आपण थोडक्यात पाहू म्हणजे ज्ञान व भक्ती खरोखर परस्परावलंबी आहेत काय हे ठरविण्यास मदत होईल.

(१) ज्ञान बुद्धिप्रधान असते. ज्ञानामध्ये विचाराला महत्त्व आहे तर भक्ती प्रेमप्रधान असल्यामुळे तिच्यामध्ये भावनेला - वाटण्याला म्हणजे feeling ला महत्त्व आहे.

(२) ज्ञान अज्ञान क्षीण करते तर भक्ती असमाधान क्षीण करून प्रेम व तृप्ती देते.

(३) ज्ञान ज्ञातातून अज्ञाताकडे नेते व तसे करताना कल्पना करावी लागते. ही कल्पना खरी असेल वा नसेल. कल्पना खरी नसेल तर होणारे ज्ञान भ्रामक असू शकते. श्रद्धेशिवाय भक्ती होऊच शकत नाही आणि श्रद्धेमध्ये सत्याची धारणा असते.

(४) ज्ञानामध्ये ज्याचा विचार करावयाचा असतो त्याच्या गुणदोषांचा विचार व विश्लेषण करावे लागते. असा विचार नेहमीच खंडित असतो. भक्तीमध्ये भक्ताला भक्तीविषयाचे दोषदेखील गुणच वाटतात. भक्तीमध्ये समग्र विचार असतो.

(५) ज्ञान बुद्धीच्या मर्यादेपर्यंतच जाते. त्याच्या पलीकडे ते जाऊ शकत नाही. परमात्मतत्त्व बुद्धीच्याही पलीकडे असल्यामुळे ते बुद्धीने जाणता येत नाही. प्रेमाशिवाय भक्ती होऊ शकत नाही आणि प्रेम हे भगवंताचेच स्वरूप असल्यामुळे त्याला मर्यादा नाही. ते भक्ताला भगवंताशी एकरूप करते.

(६) साधन या दृष्टीने कुतूहल (curiosity) जिज्ञासा (desire to understand) व तळमळ (conviction) या बुद्धीच्या तीन पायऱ्या आहेत.

प्रेमभक्तीत भगवंताची मूर्ती पाहिली की 'रूपीं जडले लोचन। पायीं स्थिरावलें मन॥' अशी भक्ताची स्थिती होते.

जीवनाच्या मुळाशी प्रेम आहे. माणसाखेरीज इतर प्राण्यांतही ते असते. माणसामध्ये आई जसे आपल्या मुलावर प्रेम करते तसेच एखादी सिंहीण तिच्या छाव्यावर करते. माणसांप्रमाणे प्राण्यांच्या ठिकाणीही कृतज्ञता आढळते. अशा प्रकारे प्रेम व्यापक आहे. यावरून लक्षात येते की ज्ञान हे भक्तीचे साधन असलेच पाहिजे असे नाही. ज्ञान आणि भक्ति यांचा संबंध एकनाथ महाराजांनी एका अभंगात फार समर्पकपणे सांगितला आहे. तो अभंग असा :

भक्तीचे उदरीं जन्मलें ज्ञान। भक्तीनें ज्ञानासी दिधलें महिमान ॥ १॥
भक्ति तें मूळ ज्ञान तें फळ। वैराग्य केवळ तेथींचें फूल ॥ २॥
फूल फळ दोनी येर येरा पाठीं। ज्ञान वैराग्य तेविं भक्तीचे पोटीं ॥ ३॥
भक्तीविण ज्ञान गिंवसिती वेडे। मूळ नाहीं तेथें फळ केविं जोडे ॥ ४॥
भक्तियुक्त ज्ञान तेथें नाहीं पतन। भक्ति माता तया करितसे जतन ॥ ५॥
शुद्धभक्तिभाव तेथें तिष्ठे देव। ज्ञानासी तो ठाव सुख वस्तीसी ॥ ६॥
शुद्ध भाव तेथें भक्तियुक्त ज्ञान। तयाचेनि अंगें समाधी समाधान ॥ ७॥
एका जनार्दनीं शुद्ध भक्ति क्रिया। ब्रह्मज्ञान त्याच्या लागतसे पाया ॥ ८॥

ज्ञान आणि भक्ति दोन्ही संबंधमूलक आहेत. ज्ञानामध्ये ज्ञाता व ज्ञेय यांच्या संबंधातून ज्ञान होते किंवा द्रष्टा व दृश्य यांच्या संबंधातून दर्शन होते. पण परमात्मा सर्व संबंधांपलीकडे आहे म्हणून जोपर्यंत ज्ञाता व ज्ञेय वेगळे असतात तोपर्यंत परमात्मा जाणला जात नाही. ज्ञाता जेव्हा ज्ञेयाशी एकरूप होऊन संबंधांपलीकडे जातो तेव्हा खरे ज्ञान होते. यालाच Transrelational म्हणतात. भक्तीमध्येही भक्त व भगवंत यांचा संबंध असतो. सुरुवातीला जीव (भक्त) मी त्याचा (शिवाचा-भगवंताचा) आहे - तस्यैवाहम् असे म्हणतो. मी त्याचा आहे म्हणत असताना जीव आणि शिव यांच्यामध्ये खूप अंतर असते. जीवाची शिवाचे दर्शन घेण्याची तळमळ वाढू लागली की त्याचे नामस्मरण जास्त खोल जाते आणि जेव्हा जीव शिवाच्या समोर उभा रहातो तेव्हा तो तवैवाहम् - मी तुझा आहे असे म्हणू लागतो. या सतत वाढणाऱ्या गाढ भक्तीचे पर्यवसान अखेर जीव व शिव यांच्या मीलनात होते. त्यानंतर जीव त्वमेवाहम् - मी तूच आहे असे म्हणू लागतो पण भक्तीचे सुख भोगण्यासाठी वेगळेपणाने उरतो. आरसा दूर केला की प्रतिबिंब जसे बिंबात विलीन होते त्याप्रमाणे वासनाशून्य झाल्यावर जीव वेगळा रहात नाही.

इतरांची मते सांगून झाल्यावर पुढील सूत्रात नारद स्वतःचे मत सांगत आहेत.

## सूत्र तिसावे

**स्वयं फलरूपतेति ब्रह्मकुमारः (राः) ॥३०॥**

**(ही पराभक्ती) स्वयं= स्वतःच. फलरूपता= फलस्वरूप (आहे). इति= असे ब्रह्मकुमारः= ब्रह्मकुमार नारद. ब्रह्मकुमाराः= सनक, सनंदन, सनातन, सनत्कुमार व नारद.**

**पराभक्ती ही स्वतःच फलस्वरूप आहे असे ब्रह्मकुमार नारद (ब्रह्मकुमाराः म्हणजे सनक, सनंदन, सनातन, सनत्कुमार व नारद) सांगतात.**

**विवरण** : भक्ती स्वयंसिद्ध फलदायी आहे असे नारद सांगतात. ज्ञान हे भक्तीचे साधन आहे आणि ज्ञान व भक्ती परस्परावलंबी आहेत अशी दोन मते नारदानी सांगितली. आता स्वतःचे मत व अनुभव सांगताना हा माझा अनुभव आहे असे न म्हणता ब्रह्मकुमार असे म्हणतात असा स्वतःचा उल्लेख केला आहे. पूर्वी एकोणिसाव्या सूत्रात मात्र त्यांनी परंतु नारद म्हणतात असे म्हटले आहे. कदाचित त्यांना ब्रह्मकुमाराचे मत म्हणून सांगताना स्वतःच्या मताविषयी कोणताही अभिमान न बाळगता त्याच वेळी आपला अधिकार सूचित करावयाचा असावा. काही ग्रंथात या सूत्रात ब्रह्मकुमाराः असे बहुवचन आढळते. नारदांप्रमाणे सनक, सनंदन, सनातन व सनत्कुमार हे चारही ब्रह्मदेवाचे मानसपुत्र होत. तेव्हा हा बहुवचनी पाठ घेतला तर ब्रह्मदेवाच्या पाचही मानसपुत्रांचे हे मत आहे असा अर्थ होतो. सनत्कुमारांची व नारदांची कुलपरंपरा व ज्ञानपरंपरा एकच आहे. म्हणून नारद एकटे असोत वा सनत्कुमारांसह असोत ते भक्ति हेच साधन व भक्ति हेच साध्य, भक्तीतूनच समाधान मिळते, केवळ ज्ञानाने, योगाने वा वेदान्ताच्या अभ्यासाने मिळत नाही हेच सांगत आहेत. कर्मयोगाच्या आचरणाने चित्त शुद्ध होते पण त्यापासून समाधान मिळत नाही. कारण कर्म प्रकृतीत घडत असल्यामुळे ते स्वभावतःच अपूर्ण असते आणि अपूर्णातून पूर्णाचा लाभ संभवत नाही.

भक्ती हेच भक्तीचे साधन होय. परमात्मा हा सर्व मानवी कल्पनांपलीकडे आहे. ईश्वर सगुण आहे आणि निर्गुणही आहे. म्हणून ज्ञानेश्वर महाराज एका अभंगात म्हणतात, "तुज सगुण म्हणों कीं निर्गुण रे। सगुण निर्गुण एक गोविंदु

रे॥ तुज स्थूळ म्हणों कीं सूक्ष्म रे। स्थूळ सूक्ष्म एक गोविंदु रे॥'' तेव्हा अशा या स्थूल आणि सूक्ष्माची गाठ नामानेच घालता येते. संत तुलसीदास सांगतात, ''अगुन सगुन बिच नाम सुसाखी। उभय प्रबोधक चतुर दुभाषी॥'' रामचरितमानस १.२०.४॥ ज्ञानेश्वर महाराज म्हणतात की सच्चिदानंदरूप परमात्मा आनंदातून जग रूपाने प्रकट झाला आहे. ''कां बीजचि जाहलें तरू। अथवा भांगारचि अळंकारु। तैसा मज एकाचा विस्तारू। तें हें जग॥'' ज्ञानेश्वरी अ.९.६५॥ माती, पाणी, सूर्यप्रकाश, वारा, खते, मशागत इत्यादी सर्व असले तरी बीजाशिवाय वृक्ष होऊ शकत नाही त्याप्रमाणे मुळात भक्ती नसेल तर पूजा पाठाचे सर्व आडंबर व्यर्थ ठरते. साधन म्हणून भक्तीला, उदाहरणार्थ नामस्मरणाला सुरुवात झाली तरी त्यातूनच साध्य भक्तीचा उगम होतो. जे नामस्मरण साधन होते तेच साध्य होते. नाम तेच राहाते पण भक्त त्याच्याशी समरस होतो. ''ध्यानीं ध्याता पंढरीराया। मनासहित पालटे काया॥'' म्हणून नाम घेताना साधक मी तुझा आहे हा भाव ठेवतो. स्वामी रामतीर्थ सांगतात, ''राम कहनेका मज़ा जब ज़बानपर चढ गया। जीव मुक्त हो गया, चारों पदारथ पा गया॥'' नामस्मरणात दंग झाल्यानंतर जीव मुक्त झाला व चारी पुरुषार्थांची प्राप्ती झाली. साधन करत असताना आपण साध्याजवळ जात आहोत याची साधकाला प्रचीति येऊ लागते. तो निर्भय होतो, निश्चिंत होतो, शांत होतो. त्याच्या वागण्याबोलण्यातून समता आणि प्रसन्नता जाणवू लागते. प्रपंचात कसाही सुखदुःखाचा प्रसंग आला तरी त्याची प्रसन्नता कमी होत नाही. ''जे जे कांहीं करिसी तें माझें स्वहित। ऐसें सप्रचीत कळों आलें॥'' अशी तुकाराम महाराजांची खात्री झाली. त्यामुळे दुःखाचे कारणच राहिले नाही. भगवंताला विसरणं हे दुःखाचं कारण आहे. म्हणून भगवंताचे अखंड स्मरण राहिले की दुःख राहाणार नाही असे श्रीमहाराज सांगत असत. भक्ती स्वयंफलरूपा आहे. तिच्यासाठी दुसऱ्या कोणत्या साधनाची जरुरी नाही. भक्ती करताना शेवटी भक्त भगवंताशी तादात्म्य पावतो व नंतर भक्तिसुखासाठी भक्त आणि भगवंत वरकरणी वेगळे राहातात. म्हणून ज्ञानेश्वर महाराजांनी ''देव देऊळ परिवारु। कीजे कोरूनि डोंगरू। तैसा भक्तीचा व्यवहारू। कां न व्हावा॥'' अमृतानुभव ९.४१॥ असा प्रश्न विचारला आहे.

स्वामी वेदान्तानन्द सांगतात : ''भक्ति कोई साधना नहीं है। इसे ज्ञानका आश्रय लेकर रहनेकी भी आवश्यकता नहीं है। यह साध्य वस्तु है। यह स्वयंफलस्वरूप है।... नारद के मतानुसार घिसनेमाँजनेसे प्रेम नहीं होता।

भाग्यवान् साधक के सौभाग्य से यह स्वयं ही आ जाता है। यह नित्यसिद्ध वस्तु है, साधना के द्वारा इसे किस प्रकार पाया जा सकता है? साधना के द्वारा अहं का नाश होता है, चित्तशुद्धि होती है। किन्तु चित्तशुद्धिही ईश्वर-लाभ नहीं है। प्रेमस्वरूप भगवान स्वयं ही कृपा कर भक्त के हृदय में प्रकाशित होते है।

नारदभक्ति-सूत्र पृष्ठ ४८

## सूत्र एकतिसावे

**राजगृह-भोजनादिषु तथैव दृष्टत्वात् ॥ ३१ ॥**

**राजगृह= राजवाडा. भोजनादिषु= भोजन वगैरे बाबतीत. तथैव= त्याच प्रकारे. दृष्टत्वात्= दिसून आल्यामुळे.**

**राजवाडा, भोजन यांसारख्या उदाहरणात तसेच दिसून येते.**

## सूत्र बत्तिसावे

**न तेन राजपरितोषः क्षुधाशान्तिर्वा ॥ ३२ ॥**

**तेन= त्याने (केवळ माहितीने). राजपरितोषः= राजाची मर्जी. क्षुधाशान्ति= भुकेची तृप्ती. वा= अथवा. न= नाही (होत नाही). राजवाड्याच्या अथवा खाण्याच्या पदार्थांच्या केवळ ज्ञानाने (वर्णनाने) राजाची मर्जी बसत नाही अथवा (पक्वान्नांच्या वर्णनाने) भूक शमत नाही.**

**विवरण** : परमार्थामध्ये शब्दज्ञानापेक्षा अनुभूतीला महत्त्व आहे हे स्पष्ट करण्यासाठी नारदानी दोन उदाहरणे दिली आहेत. ते म्हणतात, एखाद्या माणसाने राजवाडा पाहिलेला नाही पण त्याचे वर्णन वाचून, ऐकून त्याला त्या राजवाड्याबद्दल खूप माहिती आहे. त्या राजवाड्यात किती महाल आहेत, अंतर्गृह कोठे आहे, तटाची उंची किती आहे इत्यादी माहिती आहे. त्याचप्रमाणे नाट्यशाला, तलाव, बागा इत्यादींचीही माहिती आहे. पण जोपर्यंत त्याने तो राजवाडा पाहिलेला नाही आणि राजाची सेवा केली नाही तोपर्यंत राजाची मर्जी होण्याच्या दृष्टीने या ज्ञानाचा काय उपयोग? त्याचप्रमाणे एखाद्याला अनेक पक्वान्नांची माहिती आहे, ती कशी तयार करतात हेही माहीत आहे पण जोपर्यंत ती पक्वान्ने प्रत्यक्ष त्याला मिळत नाहीत तोपर्यंत त्यांच्या केवळ वर्णनाने त्याचे पोट कसे भरेल?

राजवाड्याची माहिती आहे, राजाला दुरून पाहिले आहे पण त्याच्याशी ओळख नाही आणि अप्रत्यक्षपणेही ज्याने राजाची सेवा केली नाही त्याच्यावर

राजाची मर्जी कशी होईल? त्यासाठी त्याने राजाची सेवा करूनच त्याला खूश केले पाहिजे. त्याचप्रमाणे जेवणाचे पदार्थ प्रत्यक्ष खावयाला मिळाले तरच माणसाचे पोट भरेल; पदार्थांच्या वर्णनाने नाही. "बोलाचीच कढी, बोलाचाच भात। जेऊनिया तृप्त कोण झाला॥" एकदा एका माळ्याच्या हातून काही गुन्हा झाला म्हणून त्याला तुरुंगात टाकले. तुरुंगातल्या एका ओसाड जागी त्याने खूप कष्ट करून एक सुंदर फुलबाग तयार केली. त्या बागेतील सुवासिक आणि टपोरी गुलाबाची फुले रोज राजवाड्यात जाऊ लागली. इतके चांगले गुलाब कोठून येतात म्हणून राणीने चौकशी केली. स्वतः राजा व राणी तुरुंगातील ती फुलबाग पहावयास गेले. माळ्याचे कौशल्य आणि नम्र वागणूक पाहून राजाने त्याची शिक्षा रद्द केली आणि राजवाड्यातील बागेची देखरेख करण्यासाठी त्याची नेमणूक केली. अशा प्रकारे सेवा केल्यामुळे त्याला केवळ राजदर्शनच घडले नाही तर राजाची त्याच्यावर मर्जी झाली.

या सूत्रांमध्ये दिलेल्या दोन्ही उदाहरणांवरून स्पष्ट होते की केवळ पुस्तकी ज्ञानाचा, पांडित्याचा व्यवहारातही जर उपयोग नाही तर अनुभवाचे शास्त्र असलेल्या परमार्थात त्याचा काय उपयोग होणार? भगवंत भेटावा अशी भूक निर्माण झाली की भगवंताचे वर्णन वाचून ती शांत होणे शक्य नाही. त्यासाठी शरण जाऊन भगवंताची भक्तीच केली पाहिजे. नारदभक्तिसूत्रांचा सखोल अभ्यास केला आणि त्या अभ्यासातून भगवंताचे प्रेम निर्माण झाले नाही तर भक्तिप्रेमाचा अनुभव येणार नाही, भक्तिशास्त्राचे केवळ बौद्धिक ज्ञान होईल. म्हणून सद्ग्रंथांचा अभ्यास करताना भक्तिप्रेम वाढण्यासाठी ते वाचावे. मी भगवंताचा आहे या गोष्टीचे सर्वकाळ भान ठेवून भगवंताचे अस्तित्व सर्वकाळ जाणवण्यासाठी त्याला शरण जाऊन अखंड नामस्मरणाचा अभ्यास करावा. या अभ्यासानेच भगवंताची कृपा होते आणि भक्ताला 'जेथें जातो तेथें तू माझा सांगाती' हा अनुभव येतो.

## सूत्र तेहतिसावे

**तस्मात्सैव ग्राह्या मुमुक्षुभिः ॥३३॥**

**तस्मात्= म्हणून. सा एव= भक्तीच. ग्राह्या= ग्रहण करण्यास योग्य. मुमुक्षुभिः= मुमुक्षूंनी**

**म्हणून (अन्य मार्गांपेक्षा) मुमुक्षूंनी ग्रहण करण्यास योग्य भक्तीच आहे.**

**विवरण** : पंचविसाव्या सूत्रात कर्मयोग, ज्ञानयोग आणि राजयोग यांच्यापेक्षा भक्ती श्रेष्ठ आहे असे नारदानी सांगितले. त्यानंतरच्या सूत्रांचा जणु समारोपच म्हणून आता ते सांगतात की भक्तीच करावी. "मना सज्जना, भक्तिपंथेचि जावें." ग्रह म्हणजे पकडणे. ग्राह्या म्हणण्यात आग्रह आहे, निश्चितता आहे. मुमुक्षूंनी म्हणतांना ज्यांच्या हृदयात भगवंत हवा अशी इच्छा म्हणजेच शुभेच्छा निर्माण झाली आहे त्यांना नारद सांगत आहेत.

मुक्त व्हावे असे वाटते पण होता येत नाही. कारण कशापासून मुक्त व्हावयाचे आहे याची माणसाला स्पष्ट कल्पना नसते. बद्धाला आपण बांधलेले आहोत याची जाणीवच नसते. पण ज्याला ही जाणीव झाली त्याला बंधनातून मोकळे व्हावे असे वाटते. अशा मुमुक्षूना नारद सांगतात की इतर कोणतेही मार्ग न शोधता भक्तीच करावी. भगवंताचे दर्शन व्हावे असे वाटू लागले की आपण वासनांनी बांधलेले आहोत हे साधकाच्या लक्षात येते. वासना कमी व्हाव्या, नाहीशा व्हाव्या असे वरवर वाटते पण त्यासाठी आवश्यक तो निश्चय होत नाही, वैराग्य कमी पडते. माझ्या शक्तीने मी वासनांच्या मगरमिठीतून सुटणे शक्य नाही याची प्रथम जाणीव व नंतर खात्री झाली की साधक भगवंताची प्रार्थना करू लागतो. "माझे मज कळों येती अवगुण काय करूं मन अनावर। आतां आड उभा राहे नारायणा दयासिंधुपणा। सार्थ करी॥" अशी तुकाराम महाराजानी विनवणी केली आहे. मला समाधान पाहिजे आणि ते भगवंताच्या पायाशीच मिळेल हे साधकाला स्वच्छपणे कळते. खरोखर भगवंताच्या पायाशी ठाव मिळण्याचा प्रेम हाच मार्ग आहे. ते प्रेम करण्यासाठी नवविधा भक्ति आहे. म्हणून भक्तीचाच स्वीकार करावा म्हणजे संसाराचे बंधन आपोआप गळून पडते.

* * *

## अध्याय दुसरा
# प्रेमरूपा भक्तीची साधने

### २.१ : सकारात्मक साधने

### सूत्र चौतिसावे

**तस्याः साधनानि गायन्त्याचार्याः ॥३४॥**

**तस्याः= (भगवंताविषयीच्या) त्या प्रेमरूपा भक्तीची. साधनानि= साधने. गायन्ति= गातात, प्रशंसा करतात. आचार्याः= आचार्य (आचरण करून दाखविणारे).**

**ती पराभक्ति साध्य होण्यासाठी भक्तीचे आचार्य अनेक साधने सांगतात. - अनेक साधनांची प्रशंसा करतात.**

**विवरण** : आपण पाहिले की भक्तिशास्त्राचे केवळ शाब्दिक ज्ञान हृदयात भगवंताचे प्रेम निर्माण होण्यास पुरेसे नाही. भक्ती आचरणात यावी लागते. सुरुवातीला भक्ती साधकाच्या जीवनाचे अंग असली तरी शेवटी ती साधकाच्या संपूर्ण जीवनाला व्यापून टाकते. भक्ती कशी करावी, त्यासाठी साधने व उपाय कोणते याचा पुढील काही सूत्रांत विचार केला आहे. हे सूत्र त्या विषयी प्रस्तावना करते. इतर आचार्य ज्या साधनाना महत्त्व देतात त्यांची माहिती प्रथम देऊन नंतर नारदानी त्यांना जी साधने महत्त्वाची वाटतात ती सांगितली आहेत. ही विवेचनाची सर्वमान्य पद्धत आहे. आधीच्या आचार्यांनी सांगितलेले उपाय अथवा साधने प्रथम सांगताना ती चुकीची आहेत किंवा आपण सांगतो ती साधने जास्त महत्त्वाची आहेत अशा प्रकारच्या नारदांचा आविर्भाव नाही. त्यांनी या सूत्रात आचार्य शब्द वापरला आहे. ज्यांना पुस्तकी ज्ञान आहे पण अनुभव नाही अशा विद्वानांचे सांगणे चुकीचे नसले तरी त्याप्रमाणे आचरण करताना येणाऱ्या अडचणींची त्यांना कल्पना नसते. पण ज्यांनी प्रथम त्या मार्गावरून वाटचाल केलेली आहे असे आचार्य आणि संत त्या मार्गातील खाचखळगे लक्षात घेऊन साधकांना योग्य मार्गदर्शन करतात. पुस्तकी ज्ञान हे एखाद्या गावाचा रस्ता आणि त्या गावाचे अंतर सांगणाऱ्या रस्त्यावरच्या पाटीसारखे असते. सत्पुरुष जेव्हा अनुभव घेऊन सांगतात तेव्हा ते साधकाचा हात धरून त्याला आपल्याबरोबर चालवत असतात. तुकाराम महाराज म्हणतात, "भक्तिप्रेमसुख नेणवे आणिकां। पंडित वाचकां ज्ञानियासी" ॥१॥

प्रेमरूपा भक्तीच्या साधनांचा विचार करताना साधक, साधन आणि साध्य या तीन गोष्टींचा विचार करावा लागतो. भगवंताची प्राप्ती हे साध्य निश्चित ठरल्यावर ते साधण्यासाठी साध्याला अनुकूल अशा जीवनपद्धतीचा साधकाला स्वीकार करावा लागतो. काही गोष्टी प्रयत्नपूर्वक कटाक्षाने कराव्या लागतात तर दुसऱ्या काही गोष्टी प्रयत्नपूर्वक टाळाव्या लागतात. यालाच विधि आणि निषेध म्हणतात. साध्य साधण्यासाठी विविध साधने असली तरी सर्व साधकांना त्या सर्व साधनांचा उपयोग करता येणे शक्य नसते. म्हणून प्रत्येक साधकाला त्याची प्रवृत्ति, प्रकृति आणि परिस्थिती लक्षात घेऊन साधनांची निवड करावी लागते. सर्व संतांचा व आचार्यांचा भगवद्दर्शनाचा अनुभव जरी सारखा असला तरी त्यासाठी त्यांना ज्या साधनांचा उपयोग झाला त्यांना ते महत्त्व देतात.

साधकाला साध्याची आणि त्यासाठी त्याला योग्य वाटणाऱ्या साधनांची स्पष्ट जाणीव असावी लागते. देह, मन आणि आत्मा या तीन्ही पातळ्यांवर साधन करावे लागते. भक्तीच्या बाबतीत देहाच्या पातळीवर सगुणाची उपासना हा साधनाचा आरंभ म्हणता येईल. माणसाचे स्वतःच्या देहावर प्रेम असते. देहाला सुख व्हावे म्हणून तो देहाचे विविध उपचार मोठ्या प्रेमाने करतो. सुग्रास अन्न, तलम वस्त्रे, अलंकार इत्यादींची त्याला आवड असते. देहाच्या पातळीवर सगुणाचे प्रेम निर्माण होण्यासाठी सगुण मूर्तीची विविध उपचारांनी पूजा करावी. जेथे प्रेम आहे तेथे आपलेपणा असतो. प्रेमास्पदाचा नित्य सहवास घडावा असे वाटत असते. नित्य सहवासाची ओढ वाढू लागली की साधक देहाच्या पातळीतून मनाच्या पातळीत जातो. मन वृत्तिरुप आहे. ते सगुणाला स्पर्श करते. भावना, कल्पना, विचार, स्मृति इत्यादी वृत्ती प्रेमास्पदाशी सतत घोटाळू लागल्या आणि त्याचे क्षणभर विस्मरण झाले तरी जीव कासावीस होऊ लागला तर मन इष्टाने म्हणजे ज्या सगुण मूर्तीची उपासना भक्त करतो त्या मूर्तीने भरल्याचे ते लक्षण समजावे. आत्म्याच्या पातळीवर भगवंताशी एकरूप व्हावयाला साधकाची तळमळ आणि भगवंताची कृपा एकत्र येतात तेव्हाच ते घडते. साधकाची तळमळ वाढली की श्रीमहाराजांनी म्हटल्याप्रमाणे भगवंताची कृपा होण्यास वेळ लागत नाही.

या सूत्रात नारदानी आचार्याः गायन्ति म्हणजे गातात म्हटले आहे, उपदेश्यन्ति म्हटलेले नाही. उपदेश करावयाचा म्हणजे त्यात काहीसा औपचारिकपणा असतो. भगवंताची भेट झाल्यामुळे आचार्यांना जो आनंद होतो तो त्यांना स्वस्थ बसू देत नाही. साधन करून जो आनंद आपल्याला

लाभला तो सर्वांना मिळावा असे त्यांना वाटते. माणसाला अतिशय आनंद झाला की तो गाण्यातून आणि नृत्यातून व्यक्त होतो. गायन्ति या शब्दाने नारदानी तो आनंद सुचविला आहे. "कृष्ण विष्णु हरि गोविंद। या नामाचे निखळ प्रबंध। माजी आत्मचर्चा विशद। उदंड गाती॥" ज्ञानेश्वरी ९.२१०॥ असे भक्तांचे वर्णन ज्ञानेश्वर महाराजांनी केले आहे. भगवंताची भेट झाली की प्रेमाचा उद्रेक होतो, म्हणून नारदानी केलेली गायन्ति ही शब्दयोजना अतिशय समर्पक आहे.

भक्ती सिद्ध होण्यासाठी पुढील सूत्रात नारदानी महत्त्वाची अट सांगितली आहे.

## सूत्र पस्तिसावे

तत्तु विषयत्यागात् सङ्गत्यागाच्च ॥३५॥

**तत्= ते (भक्ति हे साधन). तु= परंतु, खरोखर. विषय त्यागात्= इंद्रिय विषयांचा जगातील दृश्य गोष्टींच्या त्यागापासून - त्याग केल्यावर संगत्यागात्= जगातील वस्तू व व्यक्ती यांची आसक्ती सोडल्यावर. च= आणि.**

**खरोखर भक्तीचा साधन म्हणून परिणामकारक वापर विषयभोगांचा त्याग केल्यावर आणि आसक्ति सोडल्यावरच करता येतो.**

**विवरण** : आजार बरा होऊन रोग्याचे आरोग्य सुधारावे म्हणून वैद्य रोग्याला औषध देतात. पण त्या औषधाचा योग्य परिणाम होण्यासाठी रोग्याला पथ्य व अनुपान सांभाळावे लागते. आपण भवरोगी आहोत. ह्या रोगावर संतांनी रामनामाचे (भक्तीचे) औषध सांगितले आहे. ह्या औषधाचा चांगला परिणाम होण्यासाठी साधकाला काही गोष्टींचा त्याग करावा लागतो व दुसऱ्या काही गोष्टींचा स्वीकार करावा लागतो. "जेणें विठ्ठलमात्रा घ्यावी। तेणें पथ्यें सांभाळावी॥" यालाच साधनामधील विधिनिषेध (Do's and Don'ts) म्हणतात. प्रस्तुत सूत्रात त्याग करावयाच्या गोष्टी सांगितल्या आहेत. विषय आणि संग या दोन गोष्टी सोडल्याखेरीज भक्तीचा लाभ होणार नाही. ज्ञानेंद्रियांच्या सहाय्याने आपल्याला बाह्य जगाचे ज्ञान होते. इंद्रिये खिडक्यांसारखी असून त्यातून चित्त जगाचे ज्ञान करून घेते आणि दृश्याचा भोग घेते. भगवद्गीता सांगते, "श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च। अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते" ॥१५.९॥ कान, डोळे, त्वचा, जीभ

आणि नाक यांच्या ठिकाणी मनाची स्थापना करून जीवात्मा विषयांचा भोग घेतो. ह्यातून अनिवार सुख मिळविण्याची धडपड साधनाचा घात करते. इंद्रियांमार्फत व्यक्त होणाऱ्या जगाचा मन अर्थ लावते. मन स्वभावतः बहिर्मुख आहे. पण त्याला जर आवरता आले तर इंद्रियविषय असूनही नसल्यासारखे होतात. उदाहरणार्थ, एखादे चांगले पुस्तक वाचण्यात एखादा माणूस गढलेला असला तर शेजारी चालू असलेल्या टी.व्ही. वरील कार्यक्रमाचा त्याला पत्ता नसतो. साधक, साध्य व साधन यांपैकी साध्य (भगवद्दर्शन) व साधन (भक्ति) ही स्वयंसिद्ध आहेत. म्हणून साधकात बदल व्हावा लागतो. त्यासाठी साधकाच्या बुद्धीत बदल व्हावा लागतो. हा बदल घडवून आणण्यासाठीच विषयत्याग आणि संगत्याग सांगितलेले आहेत.

जगात दृश्य म्हणजे विषय असणारच. साधकाच्या निर्वाहासाठी ते आवश्यक आहेत. सामान्य माणसाची भोगविषयांकडे अनिर्बंध ओढ असते. पण साधकाची ध्येयनिश्चिती झाली असेल आणि ते ध्येय साध्य करण्याची तळमळ निर्माण झालेली असेल तर कोणत्या विषयांचा किती प्रमाणात स्वीकार करावयाचा आणि कोणत्या गोष्टींना नकार द्यावयाचा ते साधकाला समजते आणि त्याप्रमाणे तो वागतो. पण सामान्य साधक विषयांना बळी पडतो. उदाहरणार्थ, नामस्मरणाची वेळ झालेली असते पण त्याचवेळी टी.व्ही. वर क्रिकेट मॅच किंवा त्याला आवडणारा कार्यक्रम असला तर नामस्मरण नंतर करू असे तो म्हणतो आणि विसरून जातो. म्हणून विषयांपासून इंद्रियांना आवरण्याचा साधकाने अभ्यास केला पाहिजे. योगमार्गात याला प्रत्याहार म्हटले आहे. अर्थात असे करताना साधकाला तारतम्य ठेवावे लागते. भूक लागली की माणूस जेवणारच. पण खरा साधक इतकेच जेवेल की त्याच्या साधनावर प्रतिकूल परिणाम होणार नाही; जप करताना झोप येणार नाही. श्रीमहाराज म्हणत की दारू पिऊन झिंगलेला माणूस आणि आकंठ श्रीखंड खाऊन झोपलेला माणूस, दोघेही परमार्थाच्या दृष्टीने सारखेच! विषयभोगाशिवाय जगणे अशक्य असले तरी तुकाराम महाराजांनी म्हटल्याप्रमाणे "विधीने सेवन। विषय त्यागाचे समाधान॥" समर्थ रामदास सांगतात, "सबळ विषय त्यागणें। शुद्ध कार्याकारण घेणें। विषयत्यागाचीं लक्षणें। वोळखा ऐसीं॥" दासबोध १२.७.२७॥ या ओवीत समर्थांनी वैराग्याचे आणि त्यागाचे मर्म सांगितले आहे. "मर्यादा सोडून असणारे, प्रमाणाबाहेर जाणारे देहसुख सोडावे. शरीराचे धारण करण्यास जरूर तेवढेच

देहसुख सेवावे. विषय त्यागाची लक्षणे अशी आहेत हे ओळखून असावे."...
"परमार्थी माणूस साधना करण्यासाठी देह उपयोगी पडावा म्हणून त्याला खायला प्यायला घालतो आणि आचार विचारांनी पवित्रता पाळतो. आचार विचारांनी भ्रष्ट झालेल्या माणसांना परमार्थ साधत नाही. वैराग्य ही मनाची अवस्था आहे. प्रापंचिकाचे वैराग्य असे की भगवंतासाठी देह व्यवस्थित जगवणे अवश्य आहे. त्यासाठी अत्यंत प्रमाणशीर देहसुख भोगायला काहीच हरकत नाही. अत्यंत माफक विषय भोगणे हाच प्रापंचिकाचा त्याग आहे. तेच त्याचे वैराग्य होय." (सार्थ दासबोध- के. वि. बेलसरे - श्रीसमर्थ सेवा मंडळ, सज्जनगड १९७५. पृष्ठ ६६७ व ६६३)

खाणे-पिणे, कपडालत्ता, पैसा, लौकिक इत्यादींच्या मागे माणूस धावतो कारण त्यातून सुख मिळेल असे त्याला वाटते. पण त्याला मिळणारे सुख मर्यादित व तात्पुरते असते. म्हणून या बाबतीत साधकाने विवेक केला पाहिजे. वस्तु जेवढी तेवढेच सुख तिच्यापासून मिळते; आणि त्या सुखाबरोबर दुःख सोसावयाची तयारी ठेवावी लागते. वास्तविक सुख सर्वदा, सर्वत्र आणि वस्तुरहित मिळावे हे ध्येय साधकाने ठेवले पाहिजे. अशा सुखाला दुःखाची बाजू असता कामा नये. म्हणजेच सुख स्वावलंबी व कारणरहित पाहिजे. ते केवळ साधकावर अवलंबून असले पाहिजे. श्रीमहाराज म्हणत, "माझा आनंद माझ्या मालकीचा पाहिजे." त्यांनी एक गोष्ट सांगितली. एकदा एका माकडिणीचे पिलू मेले. पण काही झाले तरी ती त्याला सोडीना. त्याला पोटाशी कवटाळून बसली. माणसेही त्या माकडिणीसारखीच वागतात. ज्या वासना तृप्त केल्या त्या न सोडता स्मृतिरूपाने पोटाशी कवटाळून धरतात. त्यामुळे त्यांना विषयत्याग साधत नाही. परमार्थाला मारक न ठरणारा आवश्यक तेवढाच विषय साधकाने सेवावा. शरीराची आणि मनाची बंधने सोडून साधकाने स्वतंत्र झाले पाहिजे. म्हणून ज्ञानेश्वर महाराज सांगतात, "आहार तरी सेविजे। परी युक्तीचेनि मापें मविजे। क्रियाजात आचरिजे। तयाचि स्थिती॥" ज्ञानेश्वरी ६. ३४९॥

**संगत्याग** : संग शब्द सञ्ज् या धातुपासून होतो. सञ्ज् म्हणजे मिठी मारणे, चिकटणे, बांधणे. विषयापेक्षा विषयाचे चिंतन घातक असते, कारण चिंतनामध्ये माणूस त्या विषयाला मनाने चिकटतो, धरून ठेवतो. त्यामुळे त्याला दुसरे काही सुचेनासे होते. विषयापेक्षाही विषयी माणसाचा संग जास्त घात करतो असे नाथांनी म्हटले आहे. वस्तूतून सुख मिळते या समजातून जसा

माणसाला वस्तूंचा लोभ असतो तसा व्यक्तींपासून सुख मिळते अशा भावनेने माणसाचा व्यक्तिंकडे ओढा असतो. अशा व्यक्तीचा नित्य सहवास असावा असे वाटते. हे वाटणे म्हणजेच संग अथवा आसक्ति. आसक्ति देहबुद्धीतून येते. तिच्या मुळाशी वासना, अहंकार, माझेपण असते. विषयांच्या चिंतनातून निर्माण होणारी आणि माणसाचा नाश करणारी परंपरा भगवद्गीतेत दोन श्लोकांत सांगितली आहे. "ध्यायतो विषयान्पुंसः। सङ्गस्तेषूपजायते। सङ्गात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते॥ क्रोधात्भवति सम्मोहः सम्मोहात्स्मृतिविभ्रमः। स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति॥" गीता अ. २.६२,६३॥ (विषयाचे चिंतन करणाऱ्या पुरुषाची त्या विषयात आसक्ती उत्पन्न होते. आसक्तीमुळे त्या विषयांची कामना उत्पन्न होते. कामना पूर्ण झाल्या नाहीत की राग येतो. रागामुळे अत्यंत मूढता येते. मूढतेमुळे स्मरणशक्ती भ्रष्ट होते. स्मरणशक्ती भ्रष्ट झाली की बुद्धीचा म्हणजे ज्ञानशक्तीचा नाश होतो. आणि बुद्धीचा नाश झाल्यामुळे माणसाचा अधःपात होतो.)

संगतीचा माणसाच्या मनावर मोठा परिणाम होतो. म्हणूनच परमार्थात सत्संगती महत्त्वाची मानतात. या सूत्रात भक्तीला मारक असणाऱ्या संगतीचा व आसक्तीचा त्याग सांगितला आहे. प्रपंचातील आसक्ती भगवंताकडे वळवली की भक्ती होते. सत्संगतीमुळे माणूस देहबुद्धीतून आत्मबुद्धीकडे वळतो. समर्थ रामदास सांगतात, "देहेबुद्धि ते आत्मबुद्धि करावी" आणि त्यासाठी "सदा संगती सज्जनाची धरावी" (मनाचे श्लोक १६३.) संगामध्ये ज्याची आपण संगत करतो त्याच्याबरोबर मनाने जातो. केवळ देहाची संगत ही खरी संगत नव्हे. मने जुळली, मनाच्या एका पातळीवर जाता आले तरच खरी संगत घडते. दिवाळसणासाठी सासुरवाडीला गेलेल्या जावयाला रात्रभर ढेकूण चावले. म्हणजे रात्रभर त्याला ढेकणांची संगत झाली असे म्हणता येईल का असे श्रीमहाराज विचारत असत. प्रस्तुत सूत्रात विषयत्यागाच्या बाबतीत जसा विवेक पाहिजे तसा संगत्यागातही विवेक पाहिजे. जो संग परमार्थाला बाधक ठरतो त्याचा त्याग करावा आणि जो संग परमार्थाला पोषक ठरतो त्याचा स्वीकार करावा. विषयाचा संग सोडल्याखेरीज संतांचा खरा संग होऊ शकत नाही. संतांकडे जाऊन विषय मागणाऱ्याला सत्संग कसा मिळेल? विषयांची ओढ सुटण्यासाठी, माझेपणा जाण्यासाठी, मी तुझा आहे आणि म्हणून जे जे माझे आहे ते खरोखर तुझे आहे असे भगवंताला अथवा सद्गुरूंना सांगावे म्हणजे आसक्ती कमी होते असा साधकांचा अनुभव आहे. विषयांचा आणि संगाचा

कंटाळा आला आहे, पण सोडावे असे वाटले तरी सुटत नाहीत अशी स्थिती झाली आणि भगवंताला अथवा सद्गुरूंना त्यातून सोडवण्यासाठी हाक मारली तर ते साधकाला सहाय्य करतात.

जोपर्यंत विषयाच्या वासना नाहीशा होऊन केवळ भगवत्प्राप्तीची वासना तीव्र होत नाही तोपर्यंत भगवत्प्राप्ती होत नाही. दोऱ्याला लहानशी गाठ असली तरी तो सुईच्या नेढ्यातून जाऊ शकत नाही. म्हणून विषयाचे चिंतन सोडून भगवंताचे चिंतन, नामस्मरण सतत करावे. आपण ज्याचे सतत चिंतन करतो तेथे मनाचा लय होतो. श्रीकृष्ण उद्धवाला सांगतात की "विषयान् ध्यायतश्चित्तं विषयेषु विषज्जते। मामनुस्मरतश्चित्तं मय्येव प्रविलीयते॥" भागवत ११.१४.२७॥ प्रपंचात जी आसक्ती तीच भगवंताकडे वळविली की भक्ति होते. स्थूल विषयभोगांचा त्याग हा विषयत्याग आणि मनाला व्यापणाऱ्या विषयवासनांचा त्याग म्हणजे संगत्याग होय. संगत्याग हा सूक्ष्म असल्यामुळे साधणे जास्त अवघड असते. विषयत्याग केला पण संगत्याग करणे जमले नाही किंवा तसा प्रयत्नच केला नाही तर ते दांभिक आचरण -ढोंग होते. भगवद्गीता सांगते, "कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन्। इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते॥" विषयत्याग केवळ कर्मेंद्रियांच्या पातळीवर न राहता तो चित्तातून झाला पाहिजे. संगत्याग ही विषयत्यागाच्या पुढची सूक्ष्म आणि जास्त अवघड पायरी आहे. ती साधण्यासाठी साधकाला अखंड सावधानता ठेवावी लागते. आत्मदर्शन झालेले सिद्ध पुरुष काहीवेळा विषयात आहेत असे वाटले तरी ते त्यात नसतात. म्हणून सत्पुरुष सांगतात तसे वागावे, ते वागतात तसे वागू नये. चित्तातून उठणाऱ्या वृत्तींच्या मुळाशी वासना असतात. वृत्ती जलाशयातील पाण्यावरच्या तरंगांप्रमाणे येतात आणि जातात. पण काही वृत्ती मात्र तीव्र झाल्या की त्याप्रमाणे कृती करण्याची ऊर्मि मनात येते आणि ती आवरता आली नाही तर प्रत्यक्ष कृती होते. म्हणून वृत्ती आवरण्यासाठी प्रथम प्रयत्नपूर्वक कृती टाळली पाहिजे. ऊर्मीनुसार कृती घडेनाशी झाली की ऊर्मींचा जोर आणि वरचेवर उठणे कमी होते आणि नंतर वृत्ती निर्माण होणे थांबते. मनात एकसारख्या उठणाऱ्या वृत्ती थांबविण्यासाठी नामस्मरण हा उत्तम उपाय आहे. सतत नामस्मरणाचा अभ्यास जमला की नामाच्या वृत्तीच सतत येतात आणि मग नामाची संगत घडते.

काय टाळावयाचे ते प्रथम सांगून काय करावे ते पुढच्या सूत्रात सांगितले आहे.

## सूत्र छत्तिसावे

**अव्यावृत भजनात् ॥३६॥**

**अव्यावृत= अखंड. भजनात्= भजनाने - (भजनापासून)**

**ते भक्तिसाधन अखंड भजनाने सिद्ध होते.**

**विवरण** : मागच्या सूत्रात विषय त्याग व संग त्याग सांगितला. आता विषय आणि संग यांचा त्याग केलेले चित्त अखंड भजनात, हरिनामात, प्रेमपूर्वक भगवंताची पूजा करण्यात गुंतवावे असे नारद सागंत आहेत. व्यावृत म्हणजे परतणारे, अव्यावृत म्हणजे न परतणारे - अखंड. थोडाही वेळ व्यर्थ न दवडता साधकाने सर्वकाळ भगवंताच्या भजनात रहावे. भज् हा धातु सेवा या अर्थाने वापरतात. भगवंताच्या अखंड भजनामध्ये - अखंड सेवेमध्ये साधकाने रहावे. भगवंताची प्रेमपूर्वक अखंड सेवा केली म्हणजे भक्ति सिद्ध होऊन भगवंताची प्राप्ती होते. मूर्तीची पूजा करताना बाह्य उपचारांना महत्त्व असतेच. पण त्याहीपेक्षा ते उपचार करताना भक्ताचे अंतरंग त्यात लीन होणे जास्त महत्त्वाचे असते. साधनाच्या सुरुवातीच्या काळात साधकाचे मन एकाच गोष्टीत जास्त वेळ रमत नाही. म्हणून काही वेळ पूजा, काही वेळ भजन, काही वेळ कीर्तन करणे, ऐकणे अशा प्रकारे भगवंताच्या संगतीत सर्वकाळ राहाण्याचा अभ्यास करावा. ह्या अभ्यासात प्रेमाला आणि तळमळीला महत्त्व आहे. भजन करताना त्यात रस निर्माण व्हावा. पण त्यासाठी तबला, हार्मोनियम यांच्या साथीत प्रमाणाबाहेर गुंतू नये. कारण भक्ताला उपाधींच्या पलीकडे जाऊन उपाधिरहित आनंद मिळवावयाचा असतो. म्हणून भगवंताच्या प्रेमापेक्षा गायनाला, ताना पलट्यांना आणि तालाला जास्त महत्त्व देऊ नये. एका प्रवचनात (१९ जुलै) श्रीमहाराज म्हणतात, ''मी जेव्हां भजन करीत असें त्या वेळेस मी आणि देव यांच्याशिवाय मला कुणीच दिसत नसे. तसेंच तुम्हाला व्हावें अशी माझी इच्छा आहे, आणि तसें तुम्हांला होऊं शकेल म्हणूनच हें मी सांगतो आहे.'' भजनासाठी निवडलेले अभंग करुणापर, शरणागतीचे असावे. अभंगाच्या ओळी घोळून म्हणताना म्हणणाऱ्यांच्या आणि ऐकणाऱ्यांच्या हृदयात तो भाव निर्माण व्हावा. उदाहरणार्थ, ''आतां होई माझे बुद्धीचा जनिता। अवरावें चित्ता पांडुरंगा॥'' किंवा '' इतुलें करीं देवा ऐकें हें वचन। समूळ अभिमान जाळीं माझा॥'' हे चरण म्हणतांना हृदयात तो तो भाव निर्माण होऊन स्थिर व्हावा. भजन करताना ही विनवणी तुकाराम

महाराजांची न रहाता भजन करणाऱ्यांची व्हावी. भजन रसपूर्ण व्हावे आणि ज्याचे भजन करतो त्याच्या अस्तित्वाची सर्वकाळ जाणीव रहावी. खरोखर नामात किंवा भजनात रस येणे हा अतीन्द्रिय अनुभव आहे. भगवंताच्या कृपेनेच हा दिव्य अनुभव येतो; पण त्यासाठी म्हणजे कृपापात्र होण्यासाठी सत्पुरुषांकडून श्रवण केले पाहिजे.

प्रेमपूर्ण सेवाभजन अखंड होणे महत्त्वाचे आहे. जयंत्या, पर्वकाळ, उत्सव इत्यादी नैमित्तिक कारणांनी काही दिवस भजन करावयाचे आणि नंतर पुन्हा प्रपंचात बुडी मारावयाची हे भक्तीचे लक्षण नव्हे. नित्य भक्ती करीत असतानाही झोप, आळस, गप्पागोष्टी वा अन्य करमणुकीमध्ये साधक वाहवत जाण्याची भीती असते म्हणून अव्यावृत हे सूत्रातील पद महत्त्वाचे आहे. भगवंताची सेवा हे कर्म न होता ती जीवनपद्धती झाली पाहिजे. भगवंतावरील प्रेमाची खूण म्हणजे उपासनेचे कष्ट वाटता कामा नये. प्रेमात कष्ट नसतात. सुरुवातीला हे शक्य होणार नाही. पण म्हणूनच साधकाने स्वतःच एक शिस्त लावून घेतली पाहिजे. एखाद्या परीक्षेला बसावयाचे झाले तर विद्यार्थ्याला अभ्यासाची शिस्त असावी लागते. सुरुवातीपासून नियमित आणि सतत अभ्यास करावा लागतो. हा अभ्यास महत्त्वाचा आहे, माझ्या हिताचा आहे अशी धारणा टिकवावी लागते. येथे तर भगवंताची परीक्षा पास व्हावयाचे आहे. त्यासाठी सर्वस्व वेचण्याची भक्ताची तयारी पाहिजे. त्यासाठी पतंजलींनी योगशास्त्रात सांगितल्याप्रमाणे अभ्यास करावा लागतो. त्यांनी म्हटले आहे की वृत्तिनिरोधासाठी अभ्यास आणि वैराग्य असावे लागतात. एखाद्या गोष्टीमध्ये प्राविण्य मिळेपर्यंत ती पुन्हा पुन्हा करीत रहाणे यालाच अभ्यास असे म्हणतात. अभ्यास चांगला होण्यासाठी तीन गोष्टी आवश्यक असतात. (१) अभ्यास दीर्घकाल केला पाहिजे. (२) तो निरंतर केला पाहिजे. त्यात खंड पडता कामा नये. आणि (३) तो अभ्यास मौल्यवान, हितकारक आणि पवित्र आहे अशी साधकाची श्रद्धा पाहिजे. कोणताही अभ्यास करताना सुरुवातीला मन एकाग्र होत नाही. कंटाळा येतो, झोप येते. अखंड भजनाचे हे शत्रूच होत. पण ध्येयनिष्ठा आणि तळमळ यांच्या जोरावर हे शत्रू जिंकता येतात. भगवंताचे भजन करताना विशेषतः ते साधन गुरूंनी दिलेले असेल तर त्यावर प्रगाढ श्रद्धा पाहिजे. गोस्वामी तुलसीदास म्हणतात, ''बारि मथे बरु होइ घृत, सिकतातें बरु तेल। बिनु हरि-भजन न भव तरहिं, यह सिद्धान्त अपेल॥'' (काकभुशुंडी गरुडास सांगतात की एक वेळ पाणी घुसळल्यावर त्यापासून तूप

मिळेल, वाळू रगडून तेल मिळेल पण हरि भजनाखेरीज हा संसार सागर तरून जाता येणार नाही हा निरपवाद सिद्धान्त आहे.)

## सूत्र सदतिसावे

**लोकेऽपि भगवद्‌गुणश्रवणकीर्तनात् ॥३७॥**

**लोके= प्रपंच व्यवहारातील कामे करताना; लोकांमध्ये वावरताना. अपि= देखील. भगवद्‌गुण= भगवंताचे गुण. श्रवण कीर्तनात्= ऐकून व गाऊन.**

**साधकाने प्रपंच व्यवहारातील कामे करताना व लोकसमुदायात वावरताना देखील भगवंताच्या गुणांचे श्रवण व कीर्तन करावे म्हणजे भक्ती संपन्न होते.**

**विवरण** : भगवंताच्या अस्तित्वाची जाणीव ठेवून त्याचे निरंतर भजन करावे असे छत्तिसाव्या सूत्रात सांगितले. ज्यांनी सर्वस्वी परमार्थाला वाहून घेतले आहे त्यांना हे शक्य आहे. आता सामान्य प्रापंचिक साधकांसाठी नारद सांगतात की त्यांनी त्यांचे लौकिक व्यवहार करताना आणि जनसमुदायात वावरताना भगवंताच्या गुणांचे श्रवण व कीर्तन करावे. निर्गुण निराकार परमेश्वर भक्तांकरिता सगुण साकार बनतो तेव्हा त्याला भगवान म्हणतात. अशा सगुण साकार भगवंताविषयीचे - त्याच्या लीलांचे श्रवण, कीर्तन आणि वाचन शब्दांच्या माध्यमातून होते. म्हणून शब्द हे भक्तीचे आणि ज्ञानाचे महत्त्वाचे साधन आहे. शब्दामध्ये वर्ण, त्याचा ध्वनि आणि अर्थ यांचा संयोग असतो. मनात वाचताना ध्वनीचा उच्चार झाला नाही तरी वाचणाऱ्याच्या मनात त्याचा नाद व अर्थ असतो. ज्यावेळी शब्दाचा उच्चार होतो त्यावेळी ऐकणाऱ्याला ध्वनि व अर्थ यांचा बोध होतोच पण त्याचबरोबर शब्दाचा उच्चार होताना उच्चार करणाऱ्याकडून श्रवण करणाऱ्याकडे शक्तीचे संक्रमण होते. श्रवण आणि कीर्तन परस्परांना पूरक असतात.

जे साधक सुदैवाने सत्संगतीमध्ये असतात त्यांना भगवंताच्या गुणांचे श्रवण आणि कीर्तन विनासायास घडते कारण संत त्याशिवाय दुसरे काही बोलतच नाहीत आणि जीवनात घडणाऱ्या सर्व घटनांचा संबंध भगवंताशी जोडतात. वाचनातही शब्द असतो आणि श्रवणातही शब्द असतो; पण श्रवणातील शब्द जिवंत असतो. त्याला विशेष सामर्थ्य असते. एखाद्या माणसाने पत्रातून दुसऱ्या माणसाला लिहिलेला अपशब्द आणि समोर दिलेली

शिवी यांच्या परिणामात किती फरक असतो. अपशब्द तोच असला तरी त्यामध्ये उच्चारणाऱ्याची शक्ती संक्रमित होते. म्हणून श्रीमहाराज एकदा म्हणाले की शिवी देणाऱ्याची शक्ती त्या शिवीत येते हे तुम्हाला पटते पण गुरु नाम देताना त्यात आपली शक्ती देतात हे पटत नाही याला काय करावे! ऐकणाऱ्याला तळमळ लागलेली असेल, भावनेची पार्श्वभूमी असेल तर एकदाच ऐकून देखील ते वज्रलेप होते. ब्रह्मज्ञानाची तीव्र तळमळ निर्माण झालेल्या शिष्याला गुरूने तत्त्वमसि म्हणून सांगितल्याबरोबर ते ऐकून तो तें (परब्रह्म) झाला!

वर दिलेले उदाहरण अपवादात्मक होय. सामान्य माणसाच्या बाबतीत कोणतीही गोष्ट, आणि विशेषतः पारमार्थिक शिकवण एकदा ऐकून मनात रुजत नाही. म्हणून तीच शिकवण पुनः पुन्हा ऐकावी लागते. समर्थ रामदास सांगतात, "सेविलेंचि सेवावें अन्न। घेतलेंचि घ्यावें जीवन। तैसें श्रवणमनन। केलेंचि करावें॥" दासबोध ७.८.४७॥ ज्या विषयाची आपल्याला आवड नाही पण त्याचा अभ्यास करणे हिताचे आहे त्या बाबतीत मन आवरावे लागते. म्हणून "मनाच्या तोडून वोढी। श्रवणीं बैसावें आवडी। सावधपणें घडीने घडी। काळ सार्थक करावा॥" दासबोध ८.६.५॥ ज्ञानेश्वर महाराजांनीही श्रवण कसे करावे व त्याने काय साधते ते सांगताना म्हटले आहे, "तरी अवधान येकलें दीजे। मग सर्व सुखासि पात्र होइजे। हें प्रतिज्ञोत्तर माझें। उघड आइका॥" ज्ञानेश्वरी ९.१॥ ऐकताना मन एकाग्र झाले तरच ऐकलेले हृदयात ठसते, आचरणात येते आणि आत्मसात होते. म्हणून श्रवण कसे करावे ते सांगताना एकनाथ महाराज म्हणतात, "चुकल्या पुत्राची शुद्धिवार्ता। जेणें सादरें ऐकें माता। तेणें सादरें हरिकथा। सार्थकता परिसावी॥" नाथभागवत २.५२६॥ ऐकताना उत्कटता असावी आणि जे ऐकतो ते आचरणात आणण्यात जीवनाची सार्थकता आहे अशी दृढ श्रद्धा असावी.

श्रवण करताना कोण सांगतो आहे यापेक्षा तो काय सांगतो आहे याकडे लक्ष देणे महत्त्वाचे असले तरी सांगणाऱ्याचे आचरण तो सांगतो त्याप्रमाणे असले तर त्याचा ऐकणाऱ्यांवर जास्त परिणाम होतो. म्हणून शक्यतो सत्पुरुषांचे ऐकावे. पंडित सांगतात ते बरोबर असले तरी त्यांचे वागणे त्याप्रमाणे नसेल तर ऐकणाऱ्यांच्या मनामध्ये संशय निर्माण होतो. ऐकताना मी हे कशाकरता ऐकतो आहे याचे ऐकणाऱ्याने भान ठेवले पाहिजे. त्यामुळे साधनात वाढ झाली नाही तर ती केवळ करमणूक ठरते. सांगणारा आप्त

(Authority) असावा. तो जे सांगतो त्या विषयातील तज्ञ आणि अनुभवी असावा. ऐकणाऱ्यांच्या बद्दल त्याच्या मनात हितबुद्धी असावी. त्यामुळे मग न कंटाळता पुनःपुन्हा सांगण्यास तो तयार असतो. व्यवहारातील विषय सांगताना श्रोत्यांना काही माहीत नाही असे समजून सांगावे लागते पण अध्यात्मात श्रोत्यांविषयी आदरबुद्धी ठेवावी लागते. ते जाणकार आहेत असे मानून तरीही सांगण्यात ठामपणा असावा लागतो. असे सांगणे केवळ संत सत्पुरुषांचेच असते. संशयरहितता आणि लीनता यांचा तो मनोहर संगम असतो. ''तुम्ही श्रोते जगदीश मूर्ती। तेथें माझी व्युत्पत्ति किती। बुद्धिहीण अल्पमती। सलगी करितों॥'' दासबोध १.६.१७ असे समर्थ रामदास म्हणतात.

नारदानी भगवंताच्या गुणांचे श्रवण व कीर्तन करावयास सांगितले आहे. भगवंत म्हणजेच ब्रह्म अथवा परमात्मा असे भागवतात म्हटले आहे. भगवंताच्या स्मरणाला उपकारक होईल ते श्रवण करावे. श्रवणानंतर कीर्तन येते. काही नवीन ऐकले की माणसाला ते दुसऱ्याला सांगावे असे वाटते. भगवंताचे गुणवर्णन आणि त्याच्या वेगवेगळ्या अवतारांमधील लीलांचे वर्णन आणि भजन कीर्तन केल्यामुळे सामान्य माणसाच्या मनात भगवंताविषयी प्रेम निर्माण होते. भगवंताच्या विविध लीलांमधून त्याच्या गुणांचे दर्शन घडते. भगवंत अनंत अपार गुणांचा साठा आहे. तथापि त्याचे चार मुख्य गुण सांगता येतील.

(१) तो सर्वज्ञ आहे. त्याला अज्ञात असे काही नाहीच.

(२) तो सर्वशक्तिसमन्वित आहे. त्यामुळे तो काहीही करू शकतो आणि केलेले बिघडवू शकतो अथवा वेगळे काही करू शकतो. म्हणून कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् असे त्याचे वर्णन करतात.

(३) तो सर्वव्यापक आहे. तो नाही असे ठिकाण नाही.

(४) तो करुणामय आहे.

आपल्या गुरूंचे, निवृत्तिनाथांचे वर्णन करताना ज्ञानेश्वर महाराजांनी 'अमूर्तचि परि मूर्ती कारुण्याचा।' असे म्हटले आहे.

श्रवण आणि कीर्तन यांच्या इतकेच नामजप आणि नामसंकीर्तन महत्त्वाचे आहे. देहाची परिस्थिती कशीही असली तरी नामजप करता येतो. त्याला कोणतीही अट-उपाधि नाही. नामाच्या बाबतीत स्मरण हा विधी आणि विस्मरण हा निषेध होय. ''स्मर्तव्यः सततं विष्णुः विस्मर्तव्यो न जातुचित्। सर्वे विधिनिषेधाः स्युरेतयोरेव किङ्कराः॥'' एकाच देवतेची अथवा गुरूची उपासना

करणारी भक्त मंडळी एकत्र आली तर श्रवण कीर्तनात रंग भरून तात्पुरता का होईना, देहाचा विसर पडतो. मग अशा प्रकारे देहाचा विसर पडणे वारंवार घडू लागते आणि काही काळाने ते स्थिर होते. म्हणूनच तच्चिन्तनं तत्कथनं अन्योन्यं तत्प्रबोधनम् महत्त्वाचे असते. भागवतात म्हटले आहे :

मृषा गिरस्ता ह्यसतीरसत्कथा न कथ्यते यद् भगवानधोक्षजः।
तदेव सत्यं तदुहैव मङ्गलं तदेव पुण्यं भगवद्गुणोदयम्॥
तदेव रम्यं रुचिरं नवं नवं तदेव शश्वन्मनसो महोत्सवम्।
तदेव शोकार्णवशोषणं नृणां यदुत्तमश्लोकयशोऽनुगीयते॥
भागवत १२.१२.४८,४९.

(ज्या वाणीने सर्वांच्या हृदयात वास करणाऱ्या भगवंताच्या नाम, गुण आणि लीलांचा उच्चार होत नाही ती वाणी भावपूर्ण असली तरी निरर्थक-सारहीन, सुंदर असूनही असुंदर आणि उत्तम विषयांचे प्रतिपादन करीत असली तरी असत् कथा म्हटली जाते. जी वाणी भगवंताच्या गुणांनी परिपूर्ण असते तीच परम पावन, मंगलमय आणि परम सत्य असते. ज्या शब्दांनी भगवंताच्या परम पवित्र यशाचे गुणगान केले जाते तेच शब्द अतिशय रमणीय, गोड आणि प्रतिक्षणी नवे वाटतात. अशा शब्दांनी, वचनांनी मनाला परमानंदाची अनंत काल पर्यंत अनुभूती प्राप्त होते. माणसाचे दुःख समुद्राप्रमाणे विस्तीर्ण आणि खोल असले तरी अशा वचनांच्या प्रभावाने ते सर्व दुःख शोषून नाहीसे होते.)

यानंतर पुढच्या ३८ व्या सूत्रात नारदानी सत्संगतीने अथवा भगवत्कृपेने भक्ती सिद्ध होते असे सांगितले आहे.

## सूत्र अडतिसावे

**मुख्यतस्तु महत्कृपयैव भगवत्कृपालेशाद्वा ॥३८॥**

**मुख्यतः = मुख्य म्हणजे. तु= परंतु, खरोखर. महत् कृपया एव= केवळ सत्पुरुषांच्या (बुद्धीच्या) कृपेनेच. भगवत् कृपा लेशात्= भगवंताच्या कृपेच्या अल्प अंशाने. वा= अथवा (म्हणजे).**

**परंतु (खरोखर) ही पराभक्ती केवळ संत सत्पुरुषांच्या (बुद्धीच्या) कृपेमुळेच अथवा (म्हणजे) भगवंताच्या कृपेच्या अल्पशा अंशाने सिद्ध होते.**

**विवरण** : भक्ती सिद्ध होण्यासाठी संत सत्पुरुषांची कृपा व्हावयास पाहिजे आणि / किंवा त्यासाठी भगवंताच्या कृपेच्या थोड्याशा तरी अंशाचा लाभ

झाला पाहिजे. खरोखर, सद्‌गुरूंची कृपा म्हणजे भगवंताची कृपाच होय. कृपा ही विलक्षण शक्ती आहे. जगातील सर्व गोष्टी कालाधीन आहेत. काल त्यांच्यावर सत्ता गाजवतो. पण अशा कालालाही कृपा ताब्यात ठेवते. ती जीवाला शिव बनवते. शिव सर्वज्ञ आहे म्हणजे त्याला ज्ञात नाही असे काहीच नाही. तो पूर्ण आहे; सर्व शक्तींनी परिपूर्ण आहे. त्याच्या अनंत शक्तींपैकी कृपा ही महत्त्वाची शक्ती आहे आणि मौज अशी की अशा या शिवाचे-भगवंताचे ज्ञान गुरुकृपेशिवाय होत नाही. कृपेमध्ये दया (mercy) आहेच, पण त्यापेक्षाही अनुकम्पा (compassion) आहे. भगवंताच्या कृपेचे काही वेळा अहैतुकी कृपा असे वर्णन करतात. ज्या कृपेचे कारण सांगता येत नाही अशी कृपा म्हणजे अहैतुकी कृपा. भगवंत कोणावर आणि का कृपा करतो हे सांगता येत नाही. पाऊस केव्हा पडेल हे माणसाच्या हातात नसले तरी शेताची चांगली मशागत केली नसेल तर पाऊस पडूनही चांगले पीक मिळणार नाही. त्याप्रमाणे साधकाने चित्तशुद्धीसाठी व भगवत्प्राप्तीच्या हेतूने निरंतर साधन केले नाही तर कृपेचा जितका फायदा व्हावयास पाहिजे तितका होणार नाही. मात्र याचा अर्थ प्रयत्नापेक्षा कृपा गौण आहे असा नाही.

संतांच्या कृपेने परमप्रेमरूपा भक्तीचा लाभ होतो. संतांना परमात्मस्वरूपाचे साक्षात् म्हणजे तादात्म्याने ज्ञान झालेले असते. त्यांच्या हृदयात भगवंत स्थिर झालेला असतो. "पांडवांशी सदा काळीं। कृष्ण राहिला जवळी। ज्ञानदेवा हृदयकमळीं। तैसाचि स्थिरावला॥" असे ज्ञानेश्वर महाराजांनी स्वतःबद्दल सांगितले आहे. समर्थ सांगतात, "जया अंतरीं भगवंत। अचल राहिला निवांत। तो स्वभावें जें बोलत। तें ब्रह्मनिरूपण॥" दासबोध १४.३.२५॥ संतांच्या सामर्थ्याविषयी ते म्हणतात, "मोक्षश्रिया आळंकृत। ऐसे हे संत श्रीमंत। जीव दरिद्री असंख्यात। नृपती केले॥" दासबोध १.५.२१॥ संतांना सामान्य जीवांविषयी कळवळा असतो. त्यांची कृपा झाली की भगवंताची कृपा होते. तुकाराम महाराज म्हणतात, "संतांचिया पायीं हा माझा विश्वास। सर्वभावें दास झालों त्यांचा ॥ १ ॥ तेंचि माझें हित करिती सकळ। जेणें हा गोपाळ कृपा करी ॥ २ ॥" तसेच "उजळलें भाग्य आतां। अवघी चिंता वारली। संतदर्शनें हा लाभ। पद्मनाभ जोडला॥" संत माणसाला वरच्या पातळीवर नेतात. ईश्वराला विन्मुख असलेल्या माणसाला ईश्वरसन्मुख करतात आणि त्याला शरण कसे जावे ते शिकवितात. ही त्यांची कृपाच होय. त्यांची कृपा झालेला साधक कोणताही प्रापंचिक हेतु मनात न ठेवता भगवंताला आवडते म्हणून त्याचे नाम

घेतो आणि भगवंता, अंतकाळपर्यंत तुझे नाम माझ्या मुखात राहू दे अशी याचना करतो. तो भगवंताला सर्वभावे शरण जातो. शरण जाण्याची बुद्धी त्याला झाली की भगवंताची त्याच्यावर कृपा होते आणि अशी कृपा झाली म्हणजे पूर्ण समर्पण होते. त्याला भगवंताचे तादात्म्याने ज्ञान होते आणि केवळ भक्तिसुख भोगण्यासाठी तो भगवंतापासून वेगळा रहातो.

संतांची आणि भगवंताची कृपा व्हावी म्हणून विषयत्याग, संगत्याग, कीर्तन, भजन, श्रवण, नामस्मरण आवश्यक आहे. भगवंताचे दर्शन व्हावे अशी ओढ साधकाच्या मनात निर्माण झाली की त्यासाठी सद्गुरूंची भेट व्हावी असे त्याला वाटू लागते. त्यांचा शोध चालू असताना क्वचित साधकाला भगवत्कृपालेश अशी महत्कृपा लाभते. या महत्कृपेनेच तो भगवंताच्या दर्शनात स्थिर होतो म्हणून नारदानी सूत्रामध्ये एव या पदाची योजना केली आहे. संतांच्या अथवा भगवंताच्या कृपेनेच भगवंताचे दर्शन किंवा आत्मज्ञान होत असेल तर साधकाच्या प्रयत्नांचे स्थान काय असा प्रश्न निर्माण होतो. कारण कठोपनिषदही सांगते की "नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन। यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनू स्वाम् ॥" १.२.२३॥ म्हणजे "हा आत्मा शिकवून समजत नाही, बुद्धिमत्तेने प्राप्त होत नाही किंवा मोठ्या विद्वत्तेने आकलन होत नाही. ज्याच्यावर त्याची नजर वळते त्या पुरुषालाच तो प्राप्त होतो. अशा कृपापात्र पुरुषाला आत्मा आपले स्वरूप प्रकट करतो." (उपनिषदांचा अभ्यास - के.वि.बेलसरे पृ. ९८). आत्मदर्शन अथवा भगवद्दर्शन त्याच्या कृपेशिवाय जरी होत नसले तरी चित्त शुद्ध झालेले नसेल त्याला ते होणे शक्य नाही. म्हणूनच वर दिलेला कठोपनिषदातील मंत्र देऊन मुण्डकोपनिषदात पुढील मंत्र दिला आहे. "नायमात्मा बलहीनेन लभ्यो न च प्रमादात्तपसो वाप्यलिङ्गात्। एतैरुपायैर्यतते यस्तुविद्वांस्तस्यैष आत्मा विशते ब्रह्मधाम॥" मुण्डक ३.२.४॥ म्हणजे "बलहीन, प्रमाद करणाऱ्या आणि भरमसाट तप करणाऱ्या पुरुषाला हा आत्मा प्राप्त होत नाही. जो पुरुष या उपायांनी योग्य यत्न करतो त्याचा आत्मा ब्रह्माशी समरस बनतो." (उपनिषदांचा अभ्यास. के.वि.बेलसरे पृ. १९५)

या सूत्राच्या विवरणाऱ्या तळटीपेत स्वामी त्यागीशानंद म्हणतात : "As a rule those who follow the path of knowledge are in favour of self-effort, while the followers of the path of devotion always advocate the necessity of grace... But even they agree that

selfeffort is also necessary for self purification and for enabling grace to manifest itself and be effective. Sutras 35-37 emphasize in what way active and strenuous self-effort can be made to achieve the end. --- while insisting on the fact that grace alone can save man, the scriptures are also unanimous in declaring that the Lord has no partiality to his devotees, and that He showers His grace equally on all. In order to justify the fact that it is only a few who are actually benefited the devotees fall back on the doctrine that even though the Lord's grace is equally available to all, through his own fault man does not take advantage of it. It is not the fault of the Sun if one shutting up within a room does not get light; ....self-effort is ... needed to remove the hindrances brought about by the past deeds but primarily it is the Lord's grace that saves and nothing else. The Bhakta's mind considers that even the pains and sufferings are messages from the Beloved and as such evidence of His grace." - Narada Bhakti sutras by swami Tyagisananda. Shri Ramkrishna Math- Madras 600 004 pp 170-171

(सामान्यतः ज्ञानमार्गाचे आचरण करणारे लोक स्वप्रयत्नांची बाजू घेतात तर भक्तिमार्गाचे आचरण करणारे लोक कृपा आवश्यक आहे असे प्रतिपादन करतात. तथापि चित्तशुद्धी होण्यासाठी आणि कृपा प्रकट होऊन ती परिणामकारक होण्यासाठी स्वतःच्या प्रयत्नांची आवश्यकता आहे हे त्यांनाही मान्य असते. वर ३५ ते ३७ या सूत्रांमध्ये साधकाने बुद्धिपुरःसर केलेले कठोर परिश्रम ध्येयप्राप्तीसाठी आवश्यक आहेत यावर भर दिला आहे.... केवळ कृपेमुळेच माणूस तरतो असे प्रतिपादन करणाऱ्या श्रुतीही भगवंताजवळ पक्षपात नाही, तो त्याच्या कृपेचा सर्वांवर सारखाच वर्षाव करतो हे एकमताने मान्य करतात. पण तरीही कृपेच्या या वर्षावापासून फारच थोड्या साधकांना लाभ होतो. या वस्तुस्थितीचे समर्थन म्हणून भक्त असा सिद्धान्त मांडतात की जरी भगवंताची कृपा सर्वांवर सारखी असली तरी तिच्यापासून लाभ न होण्यात साधकाची चूक असते. एखाद्याने स्वतःला जर अंधाऱ्या खोलीत कोंडून घेतले

तर त्याला प्रकाशाचा लाभ न होण्यात सूर्याचा दोष नाही. ... पूर्वकर्मांचे अडथळे दूर करण्यासाठी स्वतःच्या प्रयत्नांची गरज असते. पण साधक तरून जातो तो मुख्यतः भगवंताच्या कृपेमुळेच; दुसऱ्या कशानेही नाही. भक्ताला होणाऱ्या वेदना व दुःख हे इष्टाकडून - प्रियतमाकडून येणारे संदेश असून ते त्याच्या कृपेचा पुरावा आहेत असे भक्ताला वाटते - (नारदभक्तिसूत्रे - त्यागीशानंद. श्रीरामकृष्ण मठ. मद्रास ६०० ००४ पृष्ठे १७०-१७१)

सूत्रामध्ये भगवत्कृपालेशात् वा म्हटले आहे. येथे वा हे अव्यय संतांच्या कृपेला भगवंताच्या कृपेचा अंश हा पर्याय मानलेला नाही. जे भक्त भगवंताला पूर्णपणे शरण जातात त्यांना स्वतःची अशी इच्छा रहात नाही. भगवंताची कृपा अमर्याद असून ती अनंत मार्गांनी व्यक्त होते. म्हणून सत्पुरुषांनी केलेली कृपा ही त्यांच्या भगवंताशी असलेल्या तादात्म्यामुळे भगवंताचीच कृपा असते. जन्म आणि मृत्यू ही भगवंताची कृपा आहे. त्याचप्रमाणे माणसाची विकसित बुद्धी आणि त्यात अपूर्णतेची जाणीव ही देखील कृपाच आहे. ही जाणीव नसती तर माणसाने भगवंताचा शोध घेतला नसता. कृपालेश म्हणण्याचे कारण जीव अल्पशक्ती आहे. भगवत्कृपेचा लोंढा आला तर तो त्याला सहन होणार नाही. ईश्वराचे स्वरूप कृपामय आहे. त्याच्याजवळ आनंदाशिवाय दुसरे काही नाही. त्याची असीम कृपा साधकावर झाली आणि साधकाची तयारी झालेली नसली तर त्याला ती कृपा, तो आनंद सहन होणार नाही. श्रीमहाराज एका साधकांना म्हणाले, "मला तो आनंद तुम्हाला द्यावा असे वाटते, पण तुम्हाला तो सहन होणार नाही. तुम्ही वेडे तरी व्हाल नाहीतर मरून तरी जाल." व्यवहारात देखील माणसाला अनपेक्षित प्रचंड लाभ झाला तर वेड लागते अशी उदाहरणे आपण पहातो. मग साधकाची तयारी झालेली नसली तर भगवंताचा आनंद त्याला कसा सोसेल? म्हणूनच भगवंताची कृपा सत्पुरुषांच्या द्वारा काम करते. संत आईसारखे असतात. आई जशी मुलाला आवडणारा पदार्थ त्याला सोसेल इतकाच खाऊ देते, जास्ती मागितले तरी देत नाही तसे संत भक्ताला सोसेल इतकीच कृपा करतात किंवा आधी त्याला कृपापात्र बनवतात आणि मग त्याच्यावर कृपा करतात. काही वेळा कृपा अंतःस्फूर्त ज्ञानाच्या रूपाने प्रकट होते. भगवंत अंतर्यामी आहे. तो अंतःस्फूर्त आदेशांच्या द्वारा कार्य करवितो. उदाहरणार्थ, योगी अरविंद कलकत्त्यात होते तेव्हा त्यांना प्रथम चंद्रनगरला जाण्याचा आणि नंतर पाँडेचरीला जाण्याचा भगवंताचा आदेश झाला. स्वामी रामदासांच्या चरित्रातही त्यांनी त्यांना झालेल्या आदेशांचे वर्णन केले आहे. भक्ताला जेव्हां आदेश येतो तेव्हा त्याप्रमाणे वागावे किंवा नाही असा त्याला संशय

येत नाही, इतकेच नव्हे तर आदेशापेक्षा वेगळे तो वागूच शकत नाही. सर्वसामान्य साधकाच्या बाबतीत कोणताही संशय न रहाता साधनाची निश्चिती होणे ही भगवंताची कृपाच म्हटली पाहिजे.

संतांच्या कृपेने परमप्रेमा भक्तीचा लाभ होतो हे आपण पाहिले. पण श्रीमहाराजांनी महत्कृपया या पदातील महत् हे विशेषण न मानता नाम धरून या पदाचा अर्थ बुद्धीची कृपा असा केला आहे. संतांची कृपा म्हणताना एक अडचण उभी रहाते. जर सत्पुरुषाची भेट झाली नाही किंवा भेट होऊनही त्याला ओळखता आले नाही तर कृपेचा हा मार्ग बंद होतो. पण महत् म्हणजे बुद्धीची कृपा ज्याच्यावर होते त्याला श्रेष्ठ भक्तीचा लाभ होतो.

कृपा ही भगवंताची एक शक्ती आहे. माणसामध्ये ती कशी प्रकट होते ते समजण्यासाठी पंचकोशांचा थोडक्यात विचार करू. तैत्तिरीय उपनिषदात पंचकोशांसंबंधी सांगितले आहे.

(१) पहिला अन्नमय कोश. हा स्थूल शरीर व स्थूल इंद्रियांचा आहे. हा **Physical aspect of the self** होय.

(२) दुसरा प्राणमय कोश. हा सूक्ष्म शरीराचा असून त्यात पाच कर्मेन्द्रिये व पाच प्राण शक्तिरूपाने असतात. हा **Vital aspect of the self** होय.

(३) तिसरा मनोमय कोश. यामध्ये मन व पाच ज्ञानेन्द्रिये शक्तिरूपाने असतात. हा **Psychological aspect of the self** होय.

(४) चौथा विज्ञानमय कोश. हा बुद्धि व अहंकाराचा आहे. हा **Rational aspect of the self** होय.

(५) पाचवा आनंदमय कोश. या कोशात आत्मा रहातो. सर्व प्राणिमात्र झोपेमध्ये या कोशात जातात.

प्राणमय कोशापेक्षा मनोमय कोश जास्त सूक्ष्म आणि विज्ञानमय कोश त्याच्याहीपेक्षा सूक्ष्म असून व्यापक असतो. साधन करताना काय करावे, काय टाळावे हे बुद्धी सांगते पण मन ऐकत नाही असा बहुसंख्य साधकांना अनुभव येतो. प्राणमय कोश, मनोमय कोश व विज्ञानमय कोश शक्तिरूप आहेत. अनेक पर्यायातून योग्य वाटणाऱ्या पर्यायाची निवड करण्याचे कार्य बुद्धी करते पण त्याप्रमाणे वागण्यास मन तयार होत नाही. त्यामुळे **I know the right but I follow the wrong** अशी अवस्था होते. म्हणूनच मनाच्या श्लोकात समर्थांनी मनाची मनधरणी केली आहे! जीवनात अज्ञान असल्यामुळे माणूस दुःख भोगतो. ते दुःख नाहीसे होण्यासाठी ज्ञान उपयोगी पडते. पण त्यासाठी

बुद्धीची कृपा झाली पाहिजे. साधकाला त्याच्या परमार्थाच्या आड काय येते ते बुद्धीच सांगते. यालाच विवेक म्हणतात. गुरुकृपेने विवेक जागा होतो. "मज हृदयीं सद्गुरु। जेणें तारिलों हा संसारपूरु। म्हणऊनि विशेषें अत्यादरु। विवेकावरी॥" ज्ञानेश्वरी १.२२॥ असे ज्ञानेश्वर महाराज सांगतात. भगवद्गीतेत विवेकाला विशेष महत्त्व दिले आहे. कठोपनिषदात शरीरावर रथाचे रूपक केले असून बुद्धीला हा रथ चालविणाऱ्या सारथ्याचे स्थान दिले आहे.

"यस्तु विज्ञानवान्भवति युक्तेन मनसा सदा।
तस्येन्द्रियाणि वश्यानि सदश्वा इव सारथेः॥ कठोपनिषद् १.३.६

ज्याप्रमाणे चांगले घोडे लौकिक सारथ्याच्या ताब्यात राहतात, त्याचप्रमाणे ज्याचा बुद्धिरूपी सारथी कुशल असून ज्याचे मन आवरलेले असते, त्याची इन्द्रिये त्याच्या अधीन राहतात. म्हणून

विज्ञानसारथिर्यस्तु मनः प्रग्रहवान्नरः।
सोऽध्वनः पारमाप्नोति तद्विष्णोः परमं पदम्॥ कठोपनिषद् १.३.९

ज्याच्या शरीररूपी रथावर विवेकयुक्त बुद्धि सारथ्य करते आणि ज्याने मनाचा लगाम आवरून धरला आहे, असा पुरुष संसाराच्या पलीकडे असलेल्या परमात्म्याच्या परमपदास जातो.

बुद्धि आत्मनिष्ठ असून मन बुद्धीच्या अधीन राहाणे हें साधनाचें मर्म आहे. ... ज्याची बुद्धि भगवंताला चिकटली, ज्याचें मन भगवंतापाशी रमूं लागलें आणि ज्याची इन्द्रियें भगवंतासाठी कार्य करू लागली त्याच्या जीवनात आत्मदर्शनाचें निराळें साधन उरत नाहीं." (उपनिषदांचा अभ्यास - के.वि.बेलसरे पृष्ठे १०२ व १०४.)

भारतीय युद्धात अर्जुनाने श्रीकृष्णाची सारथी म्हणून निवड करून आपल्या जीवनाच्या दोऱ्या त्याच्या हाती सोपवल्या. दुर्योधनाने कृष्णाचे सैन्य घेतले तर अर्जुनाने त्या सैन्याचा प्राण - श्रीकृष्ण आपलासा केला यामध्ये त्याची श्रेष्ठ विवेक बुद्धि दिसते. सूर्य जगाचा आत्मा आहे. त्याची प्रार्थना करताना गायत्री मंत्रात सूर्य आमच्या बुद्धीला प्रेरणा देवो म्हटले आहे. भगवद्गीताही बुद्धीला शरण जावयाला सांगते. खरे-खोटे, चांगले-वाईट, हिताचे-अनहिताचे, श्रेय व प्रेय काय ते बुद्धी सांगते. भगवंताच्या ठिकाणी स्थिर रहाणे ही बुद्धीची कृपा होय. म्हणून मन आणि बुद्धी भगवंताकडे वळून स्थिर होणे ही महत्कृपा म्हणजे बुद्धीची कृपा असे श्रीमहाराज सांगतात. भगवंताचे अनुसंधान बुद्धीच्या कृपेनेच रहाते. अनुसंधानात बाकीचे व्यवहार चालू असतानाही त्यात भगवंताचे स्मरण रहाते.

निश्चयात्मक बुद्धि एकच आहे. ती निरंतर भगवंताच्या स्मरणात रहाणे तिच्या कृपेनेच शक्य होते. आपले विचार शब्दात चालतात आणि शब्द स्मरण करून देतो. म्हणून एकसारखे भगवंताचे स्मरण राहू लागले, त्याचे नाम घेताना तो आहे ही जाणीव सतत राहू लागली की बुद्धीची पूर्ण कृपा झाली म्हणता येईल.

मी कर्ता नाही हे कळूनही जोपर्यंत काळजी, चिंता जात नाही तोपर्यंत बुद्धीची कृपा झाली नाही हे निश्चित समजावे. होऊन गेलेल्या घटनांसंबंधी मनात येणारे नसते विचार बुद्धीची कृपा झाली तरच थांबतात. मला कळत नाही असे खरे वाटून साधक जेव्हा सत्पुरुषाच्या पायावर डोके ठेवून त्याने सांगितलेले ऐकावयास शिकतो तेव्हाच बुद्धी कृपा करते.

संतांच्या कृपेला नारदानी जे अनन्यसाधारण महत्त्व दिले आहे त्याचे कारण त्यांच्या चरित्रात आढळते. एका दासीच्या ह्या पाच सहा वर्षांच्या बालकावर चातुर्मासात मुक्कामाला राहिलेल्या संतांनी कृपा केली. त्यांच्या पानात राहिलेले अन्न त्यांची अनुज्ञा घेऊन हा बालक खात असे. त्यामुळे त्याची पूर्वजन्मींची सर्व पापें नष्ट झाली आणि श्रीकृष्ण कथेची गोडी निर्माण झाली. त्या महात्म्यांनी अनुग्रह केल्यामुळे भगवंताविषयीची त्याची भक्ती दृढ झाली. सर्पदंशामुळे झालेल्या आईच्या अनपेक्षित व अचानक मृत्यूमध्ये देखील त्याला भगवंताची कृपा दिसली. हिमालयात चित्त एकाग्र करून भगवंताच्या चरणकमलांचे ध्यान करीत असताना भगवत्कृपेच्या लेशाने त्याच्या हृदयात श्रीहरि प्रकट झाले. मात्र एकाएकी ते मनमोहन रूप अंतर्धान पावले. भक्ती वाढावी, दृढ व्हावी यासाठीच भगवंतानी त्याला दर्शन दिले होते. अशा प्रकारे या सूत्रात नारदानी खरोखर स्वानुभवच सांगितला आहे.

सत्संग मिळणे कसे कठीण असते ते नारद पुढील सूत्रात सांगत आहेत.

## सूत्र एकोणचाळिसावे

**महत्सङ्गस्तु दुर्लभोऽगम्योऽमोघश्च ॥ ३९॥**

**महत् संगः= साधूसत्पुरुषांची संगत. तु= परंतु, खरोखर. दुर्लभः= लाभ होण्यास कठीण. अगम्यः= ओळखण्यास, जाणण्यास कठीण. अमोघः= निश्चित फल देणारी, व्यर्थ न जाणारी. च= आणि**

**तथापि साधूसंतांची, सत्पुरुषांची संगत लाभणे आणि लाभली तरी ओळखता येणे (जाणणे) कठीण असले तरी त्यांची संगत (व्यर्थ न जाणारी) निश्चित फल देणारी असते.**

**विवरण** : जीवनामध्ये सत्पुरुष भेटणे कठीण असते आणि जरी भेटला तरी तो सत्पुरुष आहे हे ओळखता येणे कठीण असते. मात्र सत्पुरुषाची खरी खरी भेट झाली तर ती व्यर्थ न जाता निश्चित फलदायी होते असे नारद या सूत्रात सांगत आहेत.

सत्पुरुष भेटावा अशी तळमळ लागत नाही म्हणून त्याची भेट होत नाही. मुलगी लग्नाची झाली की तिला अनुरूप वर मिळावा म्हणून प्रापंचिक माणूस जेवढी धडपड करतो तेवढी तरी धडपड सत्पुरुष भेटावा म्हणून तो करतो का? सद्‌गुरूंची भेट व्हावी आणि त्यांनी कृपा करावी या तीव्र इच्छेने बालवयात समर्थ रामदासांनी किंवा श्रीमहाराजांनी घर सोडले. त्यांच्यासारखी गुरुभेटीची तळमळ किती जणांना असते? जोपर्यंत माणसाला सत्पुरुषाची भेट व्हावी, त्याचा सहवास घडावा अशी तीव्र इच्छा निर्माण होत नाही, तोपर्यंत त्याची भेट होणे कठीण आहे. सत्पुरुषाच्या भेटीला जाणाऱ्याचा भाव शुद्ध नसेल तर सत्पुरुष त्याला भेटत नाहीत. श्रीमहाराज इंदूरात असताना इंदूरचा राजा त्यांच्या दर्शनासाठी आला तेव्हा त्याच्या वाटेमध्येच श्रीमहाराज एका कुणबिणीचे लुगडे नेसून तिला जोडीला घेऊन जात्यावर दळत बसले होते. परंतु राजाच्या किंवा त्याच्या बरोबर आलेल्या कोणाच्याही ते लक्षात आले नाही आणि म्हणून श्रीमहाराज घरात असूनही राजाला त्या दिवशी त्यांचे दर्शन झाले नाही. (श्री ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महराज यांचे चरित्र व वाङ्मय. ले. प्रा. के. वि. बेलसरे प्र. ४ पृ. ६३) खरोखर सत्पुरुषांना ओळखता येणे कठीण असते. नित्य सहवास असूनही कित्येकदा लोक त्याला ओळखू शकत नाहीत आणि त्यामुळे त्याची संगत घडत नाही. श्रीमहाराजांच्या काळी गोंदवल्यातच रहाणाऱ्या एका सत्पुरुषाला लोक 'वेडा आप्पा' म्हणून ओळखत असत. त्याची खरी योग्यता त्याने श्रीमहाराजांची परवानगी घेऊन देह ठेवल्यानंतरच लोकांना समजली! (उपरोक्त चरित्र. पृष्ठ ३००-३०१) स्वामी स्वरूपानंदही ज्यांच्याजवळ रहात असत त्यानाही त्यांची खरी ओळख कितीतरी वर्षांनी झाली. बाह्य दिसण्यावरून सत्पुरुष ओळखणे कठीण असले तरी भाग्याने त्यांची भेट झाली तर तिचा चांगला परिणाम झाल्याशिवाय राहात नाही. म्हणून सत्संग अमोघ आहे असे नारद सांगतात. "गाढवाचे घोडे आम्ही करू दृष्टीपुढें" हे त्यांच्या शक्तीचे वर्णन तुकाराम महाराजांनी केले आहे.

बाहेरून सत्पुरुष इतर सामान्य माणसांसारखा दिसला तरी त्याची बुद्धी जे शुद्ध, निर्मल आणि निरंजन आहे तेथे म्हणजे ब्रह्मपदाशी अथवा भगवंताशी

चिकटलेली असते. त्याची बुद्धी शुद्ध बुद्धी असते. शुद्ध बुद्धीचे लक्षण ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितले आहे. "गांवा गेलिया वल्लभु। पतिव्रतेचा विरहक्षोभु। भलतेसणी हानिलाभु। न मनीं जेवीं॥ तेवीं सत्स्वरूप रुचलेपणें। बुद्धी जें ऐसें अनन्य होणें। ते सत्त्वशुद्धी म्हणे। केशिहंता॥" ज्ञानेश्वरी अ. १६.७९,८०॥ आणि म्हणून "जैसी दीपकळिका धाकुटी। परी बहु तेजातें प्रगटी। तैसी सद्बुद्धी हे थेकुटी। म्हणों नये॥" ज्ञानेश्वरी अ. २.२३८॥

भगवंताशी बुद्धी स्थिर झाल्यामुळे महत् झालेल्या सत्पुरुषाला ओळखणे अवघड असले तरी त्याची काही बहिरंग व अंतरंग लक्षणे सांगितलेली आहेत. तथापि ज्या रंगाचा चष्मा लावावा त्या रंगाचे जग दिसते त्याप्रमाणे ज्याची दोष शोधण्याची दृष्टी असते त्याला दुसऱ्याचे गुण देखील दोष वाटतात. आणि ज्याची दृष्टी गुणग्राहक असते तो दुसऱ्याचे दोष नजरेआड करुन केवळ गुणच पहातो. राजसूय यज्ञाच्या वेळी दुर्योधनाला सभेमध्ये एकही सज्जन दिसत नव्हता तर त्याच वेळी त्या सभेत युधिष्ठिराला एकही दुर्जन दिसत नव्हता अशी गोष्ट सांगतात. म्हणून साधूचा शोध घेताना हेतु चांगला पाहिजे. साधूची बाह्य लक्षणे त्याच्या बाह्य आचरणावरून लक्षात येतात ती प्रथम पाहू.

(१) सत्पुरुष सर्वाभूतीं नम्र असतो. या बाबतीत तुकाराम महाराज हे उत्कृष्ट उदाहरण (classic example) म्हणून सांगता येतील. अभंगांच्या रचनेचे श्रेय स्वतःकडे न घेता त्यांनी ते पांडुरंगाला दिले. "काय म्या पामरे बोलावी उत्तरें। परी त्या विश्वंभरें बोलवीली॥" असे ते म्हणतात. त्यांचे वर्णन करताना 'जयाची वदे शुद्ध वेदान्तवाणी। कसें हो म्हणावें तयालागि वाणी॥' असे वामनपंडितांनी म्हटले आहे तर 'भक्तिज्ञान आणि वैराग्यें आगळा। ऐसा नाहीं डोळां देखियेला॥' असे रामेश्वरभट्ट वाघोलीकरांचे उद्गार आहेत. असे असूनही ज्ञानराजांना लिहिलेल्या पत्रात ते म्हणतात, "मज पामरा हें काय थोरपण। पायींची वाहाण पायीं बरी॥" भगवद्गीतेत ज्ञानाची लक्षणे सांगताना अमानित्व हे पहिले लक्षण सांगितले आहे. सत्पुरुषाची नम्रता सहज असते. लोक मान देऊ लागले तर त्याला नकोसे होते. अशा सत्पुरुषाचे वर्णन करताना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "कां फळलिया तरूची शाखा। सहजें भूमीसी उतरे देखा। तैसें जीवमात्रां अशेखां। खालावती ते॥" ज्ञानेश्वरी ९.२२५॥

(२) सत्पुरुषाचा काम विकारावर पूर्ण ताबा असतो. सामान्य माणूस काम विकारापुढे लाचार असतो. सत्पुरुषाकडे गेलेल्या कोणत्याही स्त्रीच्या मनात त्याच्याबद्दल तो पुरुष म्हणून विकल्प येत नाही. त्याचे वर्तन असे असते की

कोणत्याही स्त्रीला तो तिच्या पित्यासारखा वाटतो. साध्वी स्त्रीच्या बाबतीत तिचे आचरण इतके शुद्ध असते की तिच्याकडे जाणाऱ्या पुरुषांच्या मनात पवित्र भाव निर्माण होतो.

(३) सत्पुरुषाचे तिसरे लक्षण म्हणजे त्याच्या ठिकाणी पैशांबद्दल अतीव अनासक्ती असते. व्यवहारात त्याला पैसा हाताळावा लागतो पण तो त्यात गुंतलेला नसतो. श्रीरामकृष्ण परमहंसांची अवस्था तर अशी होती की चांदीचे भांडे हातात धरले तर त्यांची बोटे वाकडी होत असत. भगवद्गीता सांगते, "ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेन्द्रियः। युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकाञ्चनः॥"६.८॥ म्हणजे ज्याचे अंतःकरण ज्ञान व विज्ञान यांनी तृप्त झाले आहे, ज्याची स्थिती विकार रहित आहे, जो जितेन्द्रिय आहे, ज्याला दगड, माती, सोने ही सारखीच वाटतात असा योगी युक्त म्हणजे भगवत्प्राप्ति झालेला आहे असे म्हटले जाते. पैसा माणसाला भ्रष्ट करतो. "पैशाची वासना आणि लौकिकाची लालसा माणसाला भगवंतापासून दूर नेतात, त्यांच्या तावडीत सापडता कामा नये," असे श्रीमहाराज सांगतात. (प्रवचने १ मे) म्हणून ते म्हणतात, "उद्या जर कोणी एक लाख रुपये माझ्या नकळत माझ्या उशाशी आणून ठेवले, तर मी ते विष्ठेसारखे बाजूला सारीन, आणि स्वतःच्या श्रमाने चार आणे मिळवून पोट भरीन." (प्रवचने २९ जुलै)

(४) लौकिकाची इच्छा सुटणे हे सत्पुरुषाचे चौथे बहिरंग होय. लोकांनी आपल्याला मोठा म्हणावे, मान द्यावा, प्रसिद्धी मिळावी असे वाटणे हे अहंकाराचे व्यक्त स्वरूप होय. परमार्थाच्या मार्गावर वाटचाल करणाऱ्या कित्येक अधिकारी व्यक्ती लौकिकाला बळी पडून खाली घसरतात. इतर अहंकार एक वेळ सुटेल, पण मी साधू आहे हा अहंकार सुटणे फार कठीण असते असे श्रीरामकृष्ण परमहंस म्हणत असत. लौकिकाची हाव आतून देहबुद्धीतून येते. म्हणून देहबुद्धी गेल्याखेरीज लौकिकाची हाव जात नाही. देहबुद्धी नाहीशी झाली म्हणजे त्याला संभावितपणाचे ओझे वाटू लागते. अशा पुरुषाच्या स्थितीचे वर्णन करताना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "आथिलेचि गुण वानितां। मान्यपणें मानितां। योग्यतेचें येतां। रूप आंगा ॥१८५॥ तैं गजबजों लागे कैसा। व्याधें रुंधला मृगु जैसा। कां बाहीं तरतां वळसां। दाटला जेवीं ॥१८६॥... पूज्यता डोळां न देखावी। स्वकीर्ती कानीं नायकावी। हा अमुका ऐसी नोहावी। सेचि लोकां ॥१८८॥ तेथ सत्काराची गोठी। कें आदरां देईल भेटी। मरणेंसी साटी। नमस्कारितां ॥१८९॥ वाचस्पतीचेनि पाडें। सर्वज्ञता तरी जोडे। परि वेडिवेमाजीं दडे। महिमेभेणें ॥१९०॥" ज्ञानेश्वरी अ.१३.

दारेषणा, वित्तेषणा व लोकेषणा म्हणजे कामिनी, कनक व प्रसिद्धीची हाव या तीन वासना परमार्थात अडथळे आणतात. या वासनांवर सत्पुरुषांनी विजय मिळविलेला असतो. सत्पुरुष हा समाजाचा घटक असल्यामुळे समाजाचा जसा त्याच्यावर परिणाम होतो तसा त्याचाही समाजावर परिणाम होतो. त्याची शक्ती भगवंताच्या शक्तीशी जोडली गेल्यामुळे त्याच्या वागण्याचा समाजावर चांगला परिणाम होतो. त्याचे वागणे हा समाजापुढे आदर्श असतो. त्याच्या अंतरंगातील गुणांमुळे समाज वरच्या पातळीवर जातो.

सत्पुरुषांची अंतरंग लक्षणे

(१) सत्पुरुषांची देहबुद्धी व अहंकार नाहीसे झाल्यामुळे त्यांचा मी भगवंताचा दास झालेला असतो. भगवंतासमोर मी दीन आहे हे सांगण्यापुरताच त्यांचा मी व्यक्त होतो. व्यवहारात सामान्य माणसाप्रमाणे ते मी करतो, करत नाही इत्यादी बोलत असले तरी खरा कर्ता भगवंत आहे अशी त्यांची दृढ श्रद्धा असते. ''माझ्यासारख्या हीन, दीन व्यक्तीला रामाने आपला केले हा माझ्या जीवनातला चमत्कार'' असे श्रीमहाराज म्हणत. राम कर्ता हा भाव संतांचा प्राण असतो. रघुनाथ पंडितांनी रचलेल्या समर्थ स्तोत्रात रामदासांचे वर्णन करताना ''लोकाभिरामगुण बोलत 'राम-कर्ता'' असे म्हटले आहे. श्रीमहाराजांच्या तोंडीही 'राम-इच्छा' व 'राम-कर्ता' हे शब्द नेहमी असत.

(२) भय आणि चिंता सामान्य माणसाच्या पाचवीला पुजलेली असतात तर सत्पुरुष निर्भय असतो; कारण तो देहापासून वेगळा झालेला असतो. पैशांचे नुकसान, स्वतःचे अथवा कुटुंबातील व्यक्तींचे आजार, मृत्यू, बेअब्रू होण्याची भीती यांमध्ये सामान्य माणूस गुरफटलेला असतो तर जीवनात घडणाऱ्या सर्व घटनांकडे संत साक्षित्वाने पहातो. तथापि सामान्य माणसाच्या दुःखाची त्याला जाणीव असते. त्यामुळे त्याच्या शब्दांनीही संकटात असलेल्यांना धीर वाटतो.

(३) सत्पुरुष हवे-नकोपणाच्या म्हणजे वासनांच्या पलीकडे गेलेला असतो. त्यामुळे जीवनात जे मिळेल, जे घडेल त्यामध्ये तो समाधानी असतो. आशा आणि अहंभाव सुटलेले असल्यामुळे ''म्हणोनि अवसरें जें जें पावे। कीं तेणेंचि तो सुखावे। जया आपुलें आणि परावें। दोन्हीं नाहीं॥'' ज्ञानेश्वरी ४.१०९॥ असे ज्ञानेश्वर महाराज सांगतात. एकोणीसशे चार साली पेन्शन घेतल्यावर श्री. भाऊसाहेब केतकर सहकुटुंब गोंदवल्यास रहावयास गेले. तेथे त्यांचे एक मित्र त्यांना भेटावयाला गेलेले असताना त्यांनी श्रीमहाराजांचा दिनक्रम पाहिला. श्रीमहाराज त्यांच्याकडे येणाऱ्यांची चौकशी करीत, त्यांच्या अडचणी

विचारून सल्ला देत, मुलांशी खेळत, थट्टा विनोद करीत. त्यांची ही सर्वसामान्य कौटुंबिक माणसासारखी वागण्याची पद्धत पाहून त्या गृहस्थांनी 'काय पाहून तुम्ही यांच्याकडे रहायला आलात' असे श्री. भाऊसाहेबांना विचारले. तेव्हा ते म्हणाले, गेल्या आठ वर्षात मी यांच्या (श्रीमहाराजांच्या) तोंडून 'मला अमुक हवे' असे शब्द ऐकलेले नाहीत!

(४) सत्पुरुषांच्या अंगी अगाध क्षमा असते. श्रीमहाराजांनी त्यांना विष देण्यासाठी आलेल्या लोकांना देखील क्षमा करून अनुग्रह दिला. (ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज यांचे चरित्र व वाङ्मय. पृष्ठे २१७-२१९) सत्पुरुष सर्व प्राणिमात्रात स्वतःला पहात असतात. त्यामुळे त्यांना कोणाचाही राग येत नाही. आणि कोणी आगळिक केली तरी तो अविद्येचा परिणाम आहे म्हणून ते तिकडे काणाडोळा करतात. वृत्तींवर पूर्ण ताबा आल्याखेरीज क्रोध जिंकता येत नाही आणि क्षमेचा उदय होत नाही.

संतांची बाह्य लक्षणे खोटा साधूही दाखवू शकेल. त्यामुळे फसवणूक होण्याची भीती असते. संतांची अंतरंग लक्षणे समजावयाला साधकाच्या ठिकाणी पात्रता लागते. म्हणून श्रीमहाराज म्हणतात, "पुस्तकांतून साधूंचीं लक्षणे पुष्कळ दिलेलीं असतात. पण त्याप्रमाणे आपण पाहूं गेलों तर साधु ओळखता येईलच असें नाहीं. साधूचें एकच अचूक लक्षण सांगता येईल, तें हें कीं, जो सर्व ठिकाणीं देवाला पाहतो तो साधु. सर्व चराचर भगवद्रूप जो पाहतो तो साधु. तो आपल्यासारखाच देहधारी असतो, पण म्हणून तो साधु नाहीं असें होत नाहीं. ...जो सर्व ठिकाणीं भगवद्रूप पाहतो तो साधु, ह्यावरून आपल्याला तो ओळखता येईल का? नाहीं; तर आपण जेव्हां साधु व्हावें, तेव्हांच आपल्याला साधूला ओळखता येईल." (प्रवचनें. ३ एप्रिल) म्हणून वर संतांची जी लक्षणे दिली आहेत ती समजणे कठीण असते. त्यांनी दाखवली तरच ती कळतात. म्हणून सत्पुरुष अगम्य असतो. इतकेच नव्हे तर त्याला शरण जाणाऱ्या साधकाला तो अगम्य मार्गाने नेतो. कोणाला दृष्टिक्षेप करून, कोणाला स्पर्श करून, कोणाला प्रसाद देऊन, कोणाला स्वप्नात दर्शन देऊन अशा अनेक मार्गांनी तो शरणागतांना परमार्थाच्या मार्गात स्थिर करून त्यांचा उद्धार करतो. समर्थ सांगतात, "साधक भावें नमस्कार घाली। त्याची चिंता साधूस लागली। सुगम पंथें नेऊन घाली। जेथील तेथें॥" दासबोध ४.६.२४॥

सत्पुरुषांचा संग अमोघ म्हणजे कधीही व्यर्थ न होणारा असतो. त्यांची भेट होणे अवघड, पण भेट झाली आणि सद्भावाने त्याला शरण गेल्यानंतर त्याचा

सुपरिणाम झाला नाही असे होणे अशक्य असते. रावणाचा भाऊ बिभीषण श्रीरामाला शरण गेला आणि श्रीरामाने त्याला लंकाधिपति केले. शिवाय संतांची करुणा त्यांना स्वस्थ बसू देत नाही. त्यामुळे त्यांच्याजवळ असणाऱ्या सामान्य लोकांचीही त्यांच्या संगतीमुळे परमार्थात प्रगती होते.

"संताचे संगती मनोमार्गे गती। आकळावा श्रीपती येणें पंथें॥" असे ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितले आहे. मनाचा मार्ग सामान्य माणसाला अगम्य असतो. म्हणून संत ज्या मार्गाने गेले त्या मार्गाने म्हणजे नामस्मरण करूनच संतांना लाभलेल्या शांतीचा अनुभव घेता येतो. अर्थात जेवढा अभ्यास, जितकी चित्तशुद्धी तेवढे फळ. नाम किती घ्यावे? 'आपलं भांडं भरेपर्यंत नाम घ्यावें' असे गुरुदेव रानडे सांगत असत. नाम घेताना त्याची पथ्ये सांभाळावी. ते कर्मकांड होऊ नये. राग, लोभ, द्वेष इत्यादी विकारांची स्पंदने नामस्मरणाच्या आड येतात. म्हणून साधकाने सावध राहून हे विकार टाळले पाहिजेत. नामाची स्पंदने वाढू लागली म्हणजे साधकाला शांतीचा अनुभव येऊ लागतो. सामान्यतः नको तो माणूस भेटणे, मनासारखे न होणे, चिंता, भय, संकट वाटणे यांमुळे अशांती येते. म्हणून राम कर्ता हा भाव वाढवावा असे संत सांगतात. आपल्या कर्तेपणाच्या मर्यादा कळणे संतांच्या कृपेप्रमाणेच आपल्या बुद्धीच्या कृपेमुळे शक्य होते.

दुर्लभ, अगम्य आणि अमोघ अशा महत्संगाचा लाभ कसा होतो ते नारदानी पुढच्या सूत्रात सांगितले आहे.

## सूत्र चाळिसावे

**लभ्यतेऽपि तत्कृपयैव ॥४०॥**

**लभ्यते= लाभ होतो. अपि= तथापि. तत् कृपया= त्याच्या (भगवंताच्या) कृपेने. एव= केवळ.**

**तथापि केवळ भगवंताच्या कृपेनेच तो सत्संग लाभतो - त्या सत्संगाचा लाभ होतो.**

**विवरण** : संत सत्पुरुष हे भगवंताची पृथ्वीवरील रूपेच होत. जी गोष्ट करण्यास भगवंत असमर्थ असतो ती गोष्ट संत करतात! दुर्योधनाने माझ्या बुद्धीत तू बदल घडव असे श्रीकृष्णाला म्हटले. तेव्हा श्रीकृष्ण म्हणाला की बाबारे, केवळ संतच माणसाच्या बुद्धीत पालट घडवून आणतात. म्हणूनच, "गतीकारणें संगती सज्जनाची। मती पालटे सूमती दुर्जनाची॥" मनाचे श्लोक

१२९॥ असे समर्थांनी म्हटले आहे. प्रपंचात भीती, काळजी, दुःख आहे. ह्या गोष्टी नाहीत असा दिवसही जात नाही. बाह्य परिस्थितीवर आपला फारच थोडा ताबा असतो. म्हणून परिस्थितीच्या मनावर होणाऱ्या प्रतिक्रिया बदलल्या पाहिजेत. त्यासाठी मनामध्ये बदल झाला पाहिजे. सारासार विवेकाने हा बदल घडून येतो. संतांच्या कृपेप्रमाणे सारासार विवेक जागा राहणे म्हणजे बुद्धीची कृपा होणे आहे. ही कृपा झाली म्हणजे भगवत्प्राप्तीसाठी प्रपंचात कोणत्या गोष्टीला किती महत्त्व द्यावयाचे ते समजू लागते. मी कर्ता नाही, खरा कर्ता भगवंत आहे हे पटण्यासाठी त्याचे अस्तित्व जाणवले पाहिजे. संतांच्या संगतीत हा भाव जागा होतो. भगवंताच्या अखंड स्मरणाच्या अभ्यासात राहणे, प्रत्येक गोष्ट त्याला सांगून करावयाची सवय लागणे आणि भगवंत माझ्या जीवनात जे काही करतो ते माझ्या अंतिम हिताचे आहे अशी निष्ठा निर्माण होणे ही त्याची कृपा होय. कारण केवळ त्याच्या कृपेनेच हे शक्य होते. परिस्थिती कशीही असो, सत्पुरुषाला नाराजी माहीत नसते. 'राजी है हम उसीमें, जिसमें तेरी रजा है।' तुला जे करावेसे वाटते ते आम्हाला मान्य आहे. त्यात आम्ही खूश आहोत असे त्यांचे भगवंताला सांगणे असते. त्यांच्या संगतीत साधक नकळत हे शिकू लागतो.

भगवंताच्या कृपेनेच संतसंग होतो. लोकांना सन्मार्गाला म्हणजे भगवंताच्या मार्गाला लावण्यासाठी भगवंताच्या इच्छेनेच ते पृथ्वीवर येतात. संतांच्या कार्याच्या संबंधी तुकाराम महाराज म्हणतात, "तुम्ही संत मायबाप कृपावंत। काय मी पतित कीर्ती वाणूं ॥१॥ अवतार तुम्हां धराया कारण। उद्धरावे जन जडजीव ॥२॥ वाढावया सुख भक्ति भाव धर्म। कुळाचार नाम विठोबाचे ॥३॥ तुका म्हणे गुण चंदनाचें अंगीं। तैसें तुम्ही जगीं संतजन ॥४॥" संतसंगाचा लाभ होऊन स्वतःच पांडुरंग स्वरूप झाल्यानंतर ते सांगतात, "आम्ही वैकुंठवासी। आलों याचि कारणासी। बोलिले जे ऋषी। साच भावें वर्ताया ॥१॥ झाडूं संतांचे मारग। आडरानें भरलें जग। उच्छिष्टाचा भाग। शेष उरला तो सेवूं ॥२॥ अर्थे लोपलीं पुराणें। नाश केला शब्दज्ञानें। विषयलोभी मनें। साधन हें बुडविलें ॥३॥ पिटूं भक्तीचा डांगोरा। कळीकाळासी दरारा। तुका म्हणे करा। जयजयकार आनंद ॥४॥"

संत सत्पुरुष देहात असताना साधकांना भक्तिमार्गात स्थिर करतातच, पण देह ठेवल्यानंतरही सूक्ष्मरूपाने ते कार्य करतात. श्रीमहाराजांनी सांगितले आहे की "सगुणाची उपासना, आल्यागेल्याला अन्नदान आणि भगवंताचे नामस्मरण

ह्या तीन गोष्टी ज्या घरात आहेत तेथें संत घोटाळत असतात.'' याचाच अर्थ श्रीमहाराजांना आवडणाऱ्या ह्या तीन गोष्टी ज्या घरात चालतात तेथे सूक्ष्म रूपाने ते साधकाला सहाय्य करीत असतात. जीवनात जे जे घडेल ते ते भगवंताकडे नेणारे कसे आहे ही दृष्टी येणे म्हणजेच संतांची कृपादृष्टी होणे होय. ही कृपादृष्टी भक्तावर आनंदाचा अनवरत वर्षाव करते. खडीसाखर ठेवली की मुंगळ्यांना आमंत्रण द्यावे लागत नाही. तुम्ही खडीसाखर बना की संत तुम्हाला शोधत येतील असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे.

खरा साधक जसा सद्‌गुरूच्या शोधात असतो तसे सत्पुरुषही सत्‌शिष्याच्या शोधात असतात. या बाबतीत ॲनी बेझंटनी एक गोष्ट सांगितली आहे. एक संन्यासी एका गावाहून दुसऱ्या गावाला जात असताना वाटेतच रात्र झाली. रात्री कोठे मुक्काम करावा हा प्रश्न होता. अंधार पडला होता. संन्यासी एका उंच ठिकाणी गेला. तेथून एका ठिकाणी दिव्याचा उजेड दिसत होता. संन्यासी तेथे गेला, आणि दिव्याच्या उजेडामुळे सापडलेल्या झोपडीत त्याची सोय झाली. ॲनी बेझंट सांगतात, त्या संन्याशाप्रमाणे सत्पुरुषही दुरून भगवत्प्रेमाचा दिवा कोणाच्या हृदयात लागला आहे ते पहातात आणि तेथे जाऊन त्या भक्तावर कृपा करतात. गुरुदेव रानड्यांनीही एकदा असेच एका माणसाला बोलावून नाम दिले तेव्हा ते म्हणाले, **Many people are after us, but we are also after some people !**

मारुतीने सीतेचा शोध घेण्यासाठी लंकेत प्रवेश केला तेव्हा लंकेच्या प्रवेश द्वाराचे रक्षण करण्याऱ्या राक्षसीला -लंकिनीला त्याने मारले. तेव्हा ती शापमुक्त झाली आणि त्याला म्हणाली, ''तात स्वर्ग अपवर्ग सुख धरिअ तुला एक अंग। तूल न ताहि सकल मिली जो सुख लव सतसंग॥'' स्वर्ग आणि मोक्षही संतांच्या संगतीपुढे कःपदार्थ आहेत. पुढे बिभीषणाची आणि मारुतीची भेट झाल्यावर बिभीषणाला अतिशय आनंद झाला आणि तो मारुतीला म्हणाला, ''अस मोहि भा भरोस हनुमंता। बिनु हरिकृपा मिलहिं नहिं संता॥'' हरिकृपेनेच संतांची संगती मिळते. मागच्या सूत्रात आपण पाहिलेच आहे की ती संगत मिळाली की कधीही व्यर्थ होत नाही. महत्पुरुषाची कृपा लाभली की साधक भगवत्कृपापात्र होतो. दोन्हींचा अर्थ एकच आहे.

शंकराचार्यांनी विवेकचूडामणीमध्ये तीन गोष्टी दुर्लभ असून त्या केवळ भगवंताच्या कृपेनेच प्राप्त होतात असे सांगितले आहे. ते म्हणतात, ''दुर्लभं त्रयमेवैतद्देवानुग्रहहेतुकम्। मनुष्यत्वं मुमुक्षुत्वं महापुरुषसंश्रयः॥''

विवेकचूडामणि - ३।। माणसाचा जन्म मिळणे, त्या जन्मात मोक्षप्राप्तीची तळमळ लागणे आणि संत सत्पुरुषांचा सहवास लाभणे ह्या तीन गोष्टी मिळणे फार अवघड असते. देवाच्या अनुग्रहानेच - म्हणजे अनुग्रह असेल तरच त्या प्राप्त होतात. भगवंताची कृपा आणि त्याच्या कृपेने मिळणारा संतांचा सहवास ही वेगळी नाहीतच. कारण व्यवहारात संत भगवंतापासून वेगळे दिसत असले तरी ते भगवंताच्या मूर्तीच असतात. भगवंत आणि त्याचे भक्त यांच्यामध्ये भेद नसतो असे नारद पुढील सूत्रात सांगत आहेत.

## सूत्र एकेचाळिसावे

**तस्मिंस्तज्जने भेदाभावात् ॥४१॥**

**तस्मिन्= भगवंतामध्ये. तत्जने= भगवंताच्या भक्तांमध्ये. भेदअभावात्= भेदाचा अभाव असल्यामुळे म्हणजे भेद नसल्यामुळे.**

**भगवंत आणि त्याचे भक्त यांच्यामध्ये भेदाचा अभाव असतो म्हणजे भेद नसतो म्हणून.**

**विवरण** : परमात्म्याला सद्वस्तु (Reality) म्हणतात आणि जीवात्म्याची परमात्म्याशी ऐक्यता घडवून आणणाऱ्या गुरुला सद्गुरु म्हणतात. दोहोंचेही सत् म्हणजे असणे हे लक्षण आहे. जे सदैव असते, नाही असे होत नाही, ते सत्. सद्गुरु देहाने भगवंतापासून वेगळा दिसला तरी तो देहबुद्धी ओलांडून भगवंताशी एकरूप झालेला असतो. अग्नीची दाहकता, वाऱ्याचे सुकवणे, पाण्याचे विरघळणे, पृथ्वीची सर्वांना धारण करण्याची शक्ती, आकाशाची सर्वांना सामावून घेण्याची शक्ती या भगवंताच्या बहिरंग शक्ती आहेत. प्रकृतीच्या या शक्ती हे भगवंताचे तटस्थ लक्षण (Accidental Quality) आहे. माणूस त्याने घातलेले कपडे ज्याप्रमाणे बदलू शकतो त्याप्रमाणे भगवंताच्या या शक्ती तो बदलू शकतो. सच्चिदानंद हे त्याचे स्वरूप लक्षण (Essential Quality) आहे. ही त्याची अंतरंग शक्ती आहे. त्याच्या ठिकाणी सच्चिदानंदपण नसेल तर तो भगवंत नाही. सत्पुरुषांच्या ठिकाणी देखील तसेच सच्चिदानंदपण असते. म्हणून सत्पुरुषाच्या पायांवर डोके ठेवले की तो आहे याची खात्री झाली पाहिजे. ज्यांची अशी खात्री होते त्यांनी ओळखावे की त्यांच्यावर भगवंताची कृपा झाली आहे.

सामान्य माणसाचे जीवन भय, चिंता, दुःख, काळजी इत्यादींनी ग्रासलेले असते. म्हणून जो साधक भगवंताला अथवा सद्गुरूला शरण जातो त्याने

रात्रंदिवस त्यांचे अस्तित्व न विसरण्याचा अभ्यास केला पाहिजे. त्यासाठी आपली सर्व कर्मे भगवंताला अर्पण करणे हे भक्तीचे महत्त्वाचे लक्षण नारदांनी एकोणिसाव्या सूत्रात सांगितले. कर्म करण्यापूर्वी, ते करताना आणि झाल्यानंतर भगवंताची आठवण राहावी म्हणून प्रत्येक गोष्ट त्याला सांगून करण्याची सवय लावून घ्यावी. शक्यतो सर्व काळ त्याच्या नामाचे अनुसंधान ठेवण्याचा प्रयत्न करावा. भगवंताची सर्व विश्वावर सत्ता चालते म्हणजे माझ्या जीवनावरही त्याचीच सत्ता आहे. सत्पुरुषांच्या कृपेने या गोष्टीची जाणीव होते व ती सर्व काळ टिकते. सत्पुरुषांची कृपा ही भगवंताचीच कृपा होय. ज्याच्यावर ही कृपा होते त्याची जीवनात जे जे घडते ते ते त्याच्या हिताचे असल्याची खात्री होते. त्यामुळे मग अमुक व्हावे आणि तमुक होऊ नये अशा प्रकारच्या सर्व इच्छा क्षीण होऊन मन शांत होते. समाधानाचा अनुभव येतो. हा अनुभव हाच सत्पुरुषाचा सहवास होय. सत्पुरुष समाधानरूपच असतात. त्यांना नाराजी माहीत नसते आणि शुद्ध भावनेने त्यांच्याकडे जाणाऱ्यांना ते नाराज ठेवत नाहीत.

भगवंत आणि त्याचे जन म्हणजे सत्पुरुष यांच्यामध्ये भेदाचा अभाव म्हणजे अभेद असतो. भक्तीची भक्त आणि भगवंत अशी भेदाने सुरुवात झाली तरी तिचा शेवट अभेदामध्ये होतो. आपल्याला जगातील भेदाचा अनुभव आहे. उदाहरणार्थ, माणसांमध्ये स्त्री-पुरुष भेद, रंग, रूप, नाक, डोळे, मन इत्यादींमध्ये भेद आढळतो. मग भक्त आणि भगवंतात भेद नाही हे कसे शक्य आहे? भेद म्हणजे वेगळेपणा संबंधाशिवाय असू शकत नाही. सर्व भेदात मी आणि जग हा महत्त्वाचा भेद आहे. मी स्वयंकेन्द्रित आहे. मी महत्त्वाचा असूनही मी जगाचा भाग आहे हे साधकाने विसरता कामा नये. या मी चा माझे हा विस्तार आहे. शत्रूही माझा आणि मित्रही माझा. भेदाप्रमाणे अभेद हाही संबंध आहे. न्यायशास्त्रात याला समवाय संबंध म्हणतात तर वेदान्तात तादात्म्य संबंध म्हणतात. सूत आणि वस्त्र यांचा समवाय संबंध आहे. धाग्याशिवाय वस्त्र नाही आणि वस्त्रात धाग्याशिवाय दुसरे काही नाही. याला **Relation of Identity** म्हणतात. सत्पुरुष आणि भगवंत वेगळे दिसत असूनही त्यांच्यामध्ये तादात्म्य संबंध किंवा समवाय संबंध असतो. कोणत्याही वस्तूला तिची संरचना (**Structure**) आणि कार्य (**Function**) अशी दोन अंगे असतात. उदाहरणार्थ, मिक्सरची रचना एका विशिष्ट प्रकारची असली तरी त्याची कार्ये अनेक असतात. तथापि रचना वेगवेगळ्या असूनही

कार्य एकच असू शकते. उत्तर हिंदुस्थानातील व दक्षिण हिंदुस्थानातील मंदिरांची रचना वेगळी असूनही दोन्हींमध्ये ईश्वराची उपासनाच चालते. अन्य वस्तूंप्रमाणे सद्वस्तूलाही रचना व कार्य आहे. भगवंताची रचना सच्चिदानंदात्मक आहे तर जीव अशाश्वत आहे. भगवंत ज्ञानस्वरूप आहे तर जीव अज्ञानी आहे. भगवंत आनंदरूप आहे तर जीव दुःख, भीती यांनी ग्रासलेला आहे. तथापि असा हा जीव जेव्हा भक्त होऊन सच्चिदानंदरूप होतो तेव्हा तो ज्ञानी आणि आनंदरूप होतो. तो अशाश्वत देहात रहात असला तरी त्याची देहबुद्धी गेलेली असते आणि देहपातानंतर तो जगदाकारे उरतो. संतसंगामुळे पांडुरंग झाल्यानंतर "तुका म्हणे आम्ही विधीचे जनिते। स्वयंभू आइते, केले नव्हो॥" असे सांगतात. रचना भिन्न असली तरी भगवंत आणि संत एकच कार्य करतात. दोघेही शरणागत जड जीवांचा उद्धार करतात. प्रचीतीच्या दृष्टीने भक्त परमात्मा होतो. म्हणूनच अहं ब्रह्मास्मि हे महावाक्य सांगितले आहे. सर्वोत्तमाच्या दासाचे वर्णन करताना समर्थ म्हणतात, "दिनाचा दयाळू मनाचा मवाळू। स्नेहाळू कृपाळू जनीं दासपाळू॥" खरोखर हे भगवंताचेच गुणवर्णन आहे. भगवद्गीतेच्या नवव्या अध्यायात आपले स्वरूप सांगताना भगवंत म्हणतात, "गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत्। प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम्॥" ९.१८॥ म्हणजे (प्रकृतीचे) विश्रांतिस्थान, पोषण करणारा, जगाचा नाथ, साक्षी, निवासस्थान, शरण जाण्यास योग्य ठिकाण, (जगाचा) सुहृद, जगाची उत्पत्ती, स्थिति, प्रलय, निधान (प्रलयानंतर सूक्ष्मरूपाने राहण्याचे ठिकाण) आणि त्याचे अविनाशी कारण (हे सर्व) मी आहे. भगवंताच्या या कार्यापैकी सृष्टी निर्माण करण्याचे व तिचा विलय करण्याचे अधिकार सोडून बाकी सर्व अधिकार ज्ञानी पुरुषाला असतात. जोपर्यंत देहाची मर्यादा असते तोपर्यंत भगवंत आणि संत यांच्यामध्ये पौर्णिमेचा चंद्र आणि चतुर्दशीचा चंद्र इतकाच फरक असतो.

भगवंत बापासारखा आहे तर संत आईसारखे असतात. म्हणून संतांची ज्यांच्यावर कृपा होते त्यांची पापे ते स्वतःवर घेतात. श्रीमहाराज म्हणत की त्यांच्या गुरूंनी दिलेल्या विद्येमुळे त्यांना भक्तांचा अंतकाळ साधता येतो आणि वाटेल तेव्हा वाटेल तिकडे जाता येते. श्रीमहाराजांचा कर्नाटकातील एक भक्त वाईट संगतीमुळे व्यसनाधीन झाला. काही काळानंतर त्याला पश्चात्ताप झाला आणि श्रीमहाराजांचे दर्शन घ्यावे असे वाटू लागले म्हणून त्याने श्रीमहाराजांकडे निरोप पाठवून भेटावयाला येऊ का म्हणून विचारले. श्रीमहाराजांनी ये असा

निरोप दिल्यानंतर तो जेव्हा भेटावयाला गेला तेव्हा त्याला बोलवेना आणि तो एकाएकी रडू लागला. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, थांब, आधी मी सांगतो ते ऐक. ज्याला मी आपला म्हटले त्याला जगाने सोडले तरी मी सोडणार नाही. खरोखर, हे भगवंताचेच ब्रीद नव्हे का? ज्ञानेश्वर महाराजांना सातशे वर्षे होऊन गेली पण आजही ज्ञानेश्वरीच्या वाचनाचा परिणाम होऊन कितीतरी लोक ईश्वरसन्मुख झालेले आढळतात. समर्थ रामदासांनी आत्मसाक्षात्काराच्या पहिल्या भरानंतर श्रीरामाशी केलेले संभाषण जुन्या दासबोधात आहे. ते श्रीरामाला म्हणतात, "तुवा पाषाण तारिले। तरी आम्हीही जड जीव उद्धरिले। तुवां देव मुक्त केले। बंधनापासुनी ॥५॥ तरी आम्हीही भाविकांसी। सोडवूनियां मोक्षपदासी। पावविलें तयांसी। मागुता जन्म नाहीं ॥६॥ तुवां जरामरण केलें दुरी। तें मुळींच नाहीं आमुचे घरीं। तूं राजा अकरासहस्रवरी। तरी आम्हांसि संख्या नाहीं ॥७॥ तुवां पुरी नेली वैकुंठा। आम्हीं वैकुंठींच्या बारा वाटा। करूनि मांडिला चोहटा। तया वैकुंठाचा ॥८॥ ऐसे बोलती रामदास। निधडे सर्वस्वें उदास। वैभव वाटे जयांस। कसपट जैसें ॥९॥ ऐसें बोलणें ऐकिलें। रामें मंदहास्य केलें। धांवोनियां हृदयीं धरिलें। आपुलिया निजदासा ॥१०॥... राम दासांमध्यें उभा। तेणें दासांसि आली शोभा। रामस्वरूपाची प्रभा। कोंदाटली सबाह्य ॥१२॥ रामें आपणासारिखें केलें। दास दासपणेंसि मुकलें। रामासि मिळोनि एकचि जाले। एकपणाहीवेगळे ॥१३॥... नवविधा भक्ति याचि कारणें। जे आपण स्वयें रामचि होणें। स्वयेंचि रामपणें ठाकणें। स्वानुभवेंकरूनी ॥१६॥" जुना दासबोध समास १६ वा. जडजीवांचा उद्धार करण्यासाठी भगवंत पृथ्वीवर अवतार घेतात. भगवंताचे हेच कार्य संतही करतात हे वर दिलेल्या रामदासांच्या ओव्यांवरून स्पष्ट होते.

सत्पुरुषाजवळ समाधान असते. त्याच्याजवळ भगवंताशिवाय दुसरा विचार नसतो. संतांची लक्षणे सांगताना श्रीमहाराज म्हणाले की जो आपल्याला पाहिजे ते देत नाही आणि तरीही हवाहवासा वाटतो तो संत म्हणून ओळखावा. मानवता आणि दिव्यता यांचा संतांच्या ठिकाणी मनोहर संगम झालेला असतो. म्हणून अशा संतांना साधकाने शरण जावे आणि त्यांच्या पावलांची धूळ मस्तकी धरावी. तुकाराम महाराज म्हणतात, "संतचरणरज लावतां सहज। वासनेचें बीज जळोनि जाय ॥१॥ मग रामनामीं उपजे आवडी। सुख घडोघडी वाढों लागे ॥२॥" स्वतः भगवान श्रीकृष्ण दुर्वास ऋषींना सांगतात की "अहं भक्तपराधीनो ह्यस्वतंत्र इव द्विज। साधुभिर्ग्रस्तहृदयो भक्तैर्भक्तजनप्रियः॥"

भागवत ९.४.६३॥ (हे द्विजा, मी भक्तांच्या आधीन असल्यामुळे खरोखर पराधीन असल्याप्रमाणेच आहे. साधु आणि भक्तजनांची माझ्या हृदयावर सत्ता आहे. मी भक्तांचा प्रिय आहे आणि भक्त मला प्रिय आहेत.) शिवाय "साधवो हृदयं मह्यं साधुनां हृदयं त्वहम्। मदन्यत् ते न जानन्ति नाहं तेभ्यो मनागपि॥" भागवत ९.४.६८ (प्रेमी भक्त माझे हृदय आहेत आणि मी त्यांचे हृदय आहे. माझ्याखेरीज ते दुसरे काहीही जाणत नाहीत आणि मलाही त्यांच्याखेरीज दुसरे काही माहीत नाही.)

अशा या संतांची आणि भगवंताची कृपा प्राप्त करून घ्यावी म्हणून नारद निश्चयपूर्वक द्विवार सांगत आहेत -

## सूत्र बेचाळिसावे

**तदेव साध्यतां तदेव साध्यताम् ॥४२॥**

**तत्= ते. एव= केवळ. साध्यताम्= साधावे, प्राप्त करून घ्यावे.**

**केवळ तें साधावे, केवळ तेंच प्राप्त करून घ्यावे.**

**विवरण :** प्रेमाभक्तीची साधने मागे सांगितली. पस्तिसाव्या सूत्रात विषयत्याग व संगत्याग सांगितले. छत्तिसाव्या सूत्रात सर्व काळ भजन करावयास सांगितले. भगवंताच्या गुणांचे श्रवण व कीर्तन सदतिसाव्या सूत्रात सांगितले. भक्त ह्या साधनात राहण्याचा प्रयत्न करू लागला की त्याच्या लक्षात येते की त्याच्या प्रयत्नाने भगवंताचे प्रेम व कृपा प्राप्त होत नाहीत. त्याला आपल्या प्रयत्नांच्या मर्यादा समजू लागतात. उदाहरणार्थ. प्रत्येक गोष्ट आपल्या गुरूंना अथवा भगवंताला सांगून करावयाची असे तो ठरवितो. सकाळी उठल्यावर तशी सुरुवातही करतो. पण नंतर आपण हे विसरलो याचीही त्याला बऱ्याच वेळाने आठवण होते. नामस्मरणाच्या बाबतीतही असेच घडते. मग त्याला स्वतःची लाज वाटू लागते. साधनातला अहंकार पातळ होतो आणि आपणच माझे साधन करून घ्या अशी तो सद्गुरूंना विनवणी करतो. साधनाची तळमळ वाढून शरणागति आली की कृपा होते. साधन करून हेच साधायचे असते. साधन करून साधत नाही हे समजण्यासाठी साधन करावयाचे असते असे श्रीमहाराज म्हणत.

भगवंताचे प्रेम कसे लागावे, त्यासाठी काय करावे हे संतांजवळ समजते. त्यासाठी साधकाला संतांनी आपला म्हणावे अशी तळमळ लागली पाहिजे. संतांना जे आवडते ते भगवंताचे नाम साधकाला आवडू लागले की संतांची

त्याच्यावर कृपा होते. संत परमात्मस्वरूप झाले तरी भगवंताचे जीवांचा उद्धार करण्याचे कार्य स्वतः न करता साधकाला ईश्वराच्या समोर आणून उभे करतात. श्रीमहाराज म्हणत की ज्याने आपला हात माझ्या हातात दिला त्याचा हात मी थेट रामाच्या हातात नेऊन दिला! आणखी एका वेळी ते म्हणाले, आजपर्यंत मी जे सांगितले त्याला रामाने नाही म्हटले नाही. नारद तदेव साध्यताम् म्हणून सांगत आहेत. जगात भगवंताशिवाय दुसरे काहीही मूल्यवान नाही असे साधकाला वाटू लागले की साधले. मग साधकाला वस्तुरहित समाधान मिळावे असे वाटू लागून जे असेल त्यात त्याचे समाधान टिकते.

जगात प्रत्येकजण वेगळा असतो. **Every personality is unique.** तथापि सत्पुरुषांच्या सहवासात त्यांचे अनुकरण करून साधक अनेक गोष्टी शिकतो. मुख्य म्हणजे जीवनात घडणाऱ्या गोष्टींविषयीच्या त्याच्या प्रतिक्रिया बदलतात आणि बदललेल्या प्रतिक्रियांमधून एक नवा हितकारक दृष्टिकोन **(attitude)** तयार होतो. म्हणून ज्यांनी अशा प्रतिक्रिया बदलल्या अशा साधकांचा आणि संतांचा सहवास करावा. त्यांचे अनुकरण करावे. नुसता देहाचा सहवास होऊन चालत नाही. त्यांचा धर्म तो साधकाचा धर्म झाला पाहिजे. ते साधावे. श्रीमहाराज म्हणाले, माझा धर्म रामाच्या इच्छेने सगळे घडते हा होता. तो ज्यांनी पाळला त्यांना माझा सहवास घडला. सत्पुरुषांची भेट होईपर्यंत साधकाने सद्ग्रंथांची आणि सद्विचारांची संगत करावी. परमात्म्याचे अखंड स्मरण ठेवता आले तर ह्या तीन्ही संगतींचा लाभ होतो. हीच महत्कृपा होय.

स्वामी त्यागीशानंद म्हणतात.

**"Divine grace is already with us; we have only to allow its free play in us by surrendering ourselves to the Divine completely; it will then guide us to our natural birth right with the aid of external stimulus, or without it. External helps are only secondary; they may not work unless the primary condition of an unconditional and sincere acceptance of the guiding Divine voice is fully recognized, and acted upto, by a complete surrender of individuality and egoisitc impulses." - Narada Bhakti Sutras by swami Tyagishananda. Shri Ramkrishna Math, Madras pp.186-187.**

(भगवंताची आपल्यावर कृपा असतेच; मात्र आपण त्याला पूर्णपणे शरण जाऊन त्या कृपेचा आपल्या जीवनात मुक्त संचार होऊ दिला पाहिजे; असे केले म्हणजे बाह्य उद्दीपनाच्या साहाय्याने अथवा त्याशिवाय आपला नैसर्गिक जन्मसिद्ध हक्क (आत्मज्ञान) मिळविण्यास ती आपल्याला मार्गदर्शन करेल. बाहेरून होणारे साहाय्य दुय्यम असते. मुख्य म्हणजे आपण कोणतीही अट न घालता आपल्याला मार्गदर्शन करणाऱ्या कृपेचा मनापासून स्वीकार करून आणि ती कृपा ओळखून आपले व्यक्तिमत्त्व आणि अहंवृत्ती त्याला पूर्णपणे अर्पण केल्याशिवाय दुय्यम साहाय्याचा उपयोग होणार नाही.)

## २.२ निषेधात्मक साधने

संतांच्या संगतीची महती सांगितल्यानंतर कोणाची संगत टाळावी ते नारद सांगत आहेत. संतांची संगत लाभावी म्हणून साधक त्यांच्या शोधात असतो. ती लाभण्यापूर्वी आणि लाभल्यानंतरही दुष्टांची, विषयी माणसांची संगत साधकाने प्रयत्नपूर्वक टाळली पाहिजे. वाईट संग माणसांचाच होतो असे नाही. चित्रे, पुस्तके, करमणुकीचे प्रकार यांचाही वाईट परिणाम होतो. सज्जनांची संगत मिळण्यास साधकाच्या प्रयत्नांबरोबर भगवंताची कृपाही व्हावी लागते. पण वाईट संगत टाळण्यासाठी सावधानता ठेवून साधकाने प्रयत्न करावा लागतो. म्हणून पुढील तीन सूत्रांत नारदानी निषेधात्मक साधने सांगितली आहेत.

## सूत्र त्रेचाळिसावे

**दुःसंगः सर्वथैव त्याज्यः ॥४३॥**

**दुःसंग= वाईट (लोकांची) संगत. सर्वथा= सर्व प्रकारे (पूर्णपणे). त्याज्यः= टाकून देण्यासारखी. एव= केवळ.**

**वाईट (लोकांची) संगत सर्व प्रकारे (सर्व प्रकारचे प्रयत्न करून) प्रयत्नपूर्वक (पूर्णपणे) केवळ टाकून देण्यासारखी असते (टाकली पाहिजे).**

**विवरण :** वाईट संग पूर्णपणे सोडला पाहिजे. जीव भक्ती करू लागला म्हणजे तो ईश्वरसन्मुख होतो. जीव हे सद्‌वस्तूचे प्रतिबिंब होय. तो परा प्रकृतीतून येतो. त्याला अष्टधा प्रकृतीचे कवच अथवा आवरण असते. ही अष्टधा प्रकृती अपरा प्रकृती म्हणून ओळखली जाते. पृथ्वी, आप, अग्नि, वायू,

आकाश, मन, बुद्धि व अहंकार यांचे हे आवरण असते. जीव सूक्ष्म तर देह जड आहे. तो पंच महाभूतात्मक आहे. भगवंताच्या प्राप्तीसाठी तो नुसता शुद्ध नव्हे, तर पवित्र केला पाहिजे. त्यासाठी देहाने म्हणजे पंच ज्ञानेन्द्रियांनी आणि पंच कर्मेन्द्रियांनी भगवंताला आवडेल असेच कर्म केले पाहिजे. कानांनी भगवंताची कथा ऐकावी, डोळ्यात भगवंताचे रुप साठवावे, त्याच्या पावलांवर मस्तक ठेवावे, मुखाने त्याचे गोड नाम घ्यावे, हातांनी त्याची पूजा करावी. श्रीमहाराज म्हणत की चित्तशुद्धीसाठी सर्व काळ असे कर्म करावे की कोणीही केव्हाही पाहिले तरी पहाणाऱ्याला आणि कर्म करणाऱ्याला संकोच वाटू नये. कान, नाक, डोळे इत्यादी खिडक्या आहेत. त्यांना मन प्रेरणा देते आणि त्यांच्या द्वारा बाह्य जगाचा भोग घेते. आपले मन ज्याची आवड आहे तेथे सहजच चिकटते. ज्यांचे मन सहजच भगवंताला आवडेल अशा ठिकाणी चिकटते त्यांना साधनाचे कष्ट होत नाहीत. पण सर्वसाधारण माणूस बहिर्मुख असल्यामुळे त्याचे मन सहजपणे बाह्य इन्द्रिय भोगात रमते आणि तेथून काढून ते भगवंताकडे वळविण्यात कष्ट असतात. संतांची संगत लाभली तर हे थोडे सोपे होते. संतांनी वेळोवेळी केलेला उपदेश ऐकून, त्यांचे वागणे प्रत्यक्ष पाहून आणि त्यांच्या कृपेने बहिर्मुख वृत्ती हळूहळू कमी होतात. पण दुर्दैवाने माणसाला दुर्जनाची संगत लागली तर त्याचे आध्यात्मिक पतन होते. प्रत्यक्ष विषयांपेक्षा विषयी माणसाची संगत जास्त हानी करते. कामवासनेपेक्षाही कामलंपट माणसाची संगत जास्त हानिकारक असते असे एकनाथ महाराजांनी म्हटले आहे. म्हणून साधकाने संगतीच्या बाबतीत अतिशय सावध राहून वाईट माणसांची संगत कटाक्षाने टाळली पाहिजे. त्याचबरोबर इन्द्रियसंयम साधण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. हे अवघड आहे म्हणूनच तुकाराम महाराज पांडुरंगाला विनवितात की ''पापाची वासना नको दावूं डोळां। त्याहुनि अंधळा बराच मी ॥ १ ॥ निंदेचें श्रवण नको माझे कानीं। बधिर करोनि ठेवीं देवा ॥ २ ॥ अपवित्र वाणी नको माझ्या मुखा। त्याजहुनि मुका बराच मी ॥ ३ ॥ नको मज कधीं परस्त्रीसंगति। जनांतून माती उठतां भली ॥ ४ ॥ तुका म्हणे मज अवघ्याचा कांटाळा। तूं एक गोपाळा आवडसी ॥ ५ ॥''

वरील अभंगाच्या शेवटच्या चरणात म्हटल्याप्रमाणे बाकीच्या सर्व गोष्टींचा कंटाळा वाटून केवळ गोपाळ आवडू लागला की साधन स्थिर होऊन साधकाची प्रगती जलद होते. ध्येयनिश्चिती होऊन ते प्राप्त करून घेण्यासाठी साधकाची तळमळ वाढते. पण जोपर्यंत मन विषयासक्त आहे तोपर्यंत नकळत माणूस

विषयाला बळी पडतो. उदाहरणार्थ, नामस्मरण करण्याची वेळ झालेली असते; पण त्याच वेळी टेलिव्हीजनवर एखादा आवडणारा कार्यक्रम असतो. अशा वेळी ज्याचे वैराग्य जागे असते तो साधक मन आवरून जपाला बसतो. पण सर्वसामान्य साधक कार्यक्रम पाहून नामस्मरण करू म्हणतो. कार्यक्रम पाहून होतो आणि झोपावयाची वेळ झाली म्हणून नामस्मरण उद्यावर जाते! हाही दुःसंगच होय. साधकाने अशा प्रकारचे मोह टाळले पाहिजेत. योगामध्ये यासाठीच प्रत्याहार सांगितला आहे. इन्द्रियांना त्यांना आवडणाऱ्या विषयांपासून प्रयत्नपूर्वक दूर करावे लागते. त्यासाठी सत्पुरुषांची संगत फार उपकारक ठरते. मनात उठणारे पापसंकल्प सोडून सत्यसंकल्प धारण करण्यास त्यांची मदत होते.

वाईट माणसांची संगत टाळावी; पण त्यांच्या विषयीही आपल्या मनात द्वेष निर्माण होऊ देऊ नये. कारण अशा प्रकारची द्वेषभावना चित्तशुद्धीच्या आड येते. दुसऱ्यांचे दोष पाहून आपण आपले मन कलुषित करून घेऊ लागलो तर ते स्वच्छ कसे होईल? शिवाय तुकाराम महाराज म्हणतात त्याप्रमाणे "कासया गुणदोष पाहों आणिकांचे। मज काय त्यांचें उणें असे॥" ज्या जगात मी जगतो त्या जगात इतरांनाही जगण्याचा हक्क आहे हे मान्य केले पाहिजे. यालाच respect for the individual (व्यक्तीचा सन्मान) म्हणतात.

वाईट माणसाची संगत नको म्हणताना मी वाईट वागत नाही ना हे पाहिले पाहिजे. त्यासाठी साधकाने नेहमी आत्मनिरीक्षण केले पाहिजे. दुसऱ्यांविषयी वाईट विचार मनात येऊ देऊ नयेत; कारण त्यामुळे आपले मन गढूळ होते. काही वेळा साधक दुःसंगाला बळी पडतो कारण मनाने तो खरोखर त्याच बाजूचा असतो. नको ते बोलणे, नको तसे वागणे घडून गेल्यावर लक्षात येते की आपण चुकलो, घसरलो. अशा वेळी खरा पश्चात्ताप होऊन भगवंताची प्रार्थना केली तर भगवंत मन आवरण्यासाठी मदत करतो असा साधकांचा अनुभव आहे. शहाणी गृहिणी ज्याप्रमाणे ज्या भांड्यात हिंगाची पुडी ठेवलेली होती त्या भांड्यात दूध ठेवत नाही तसा अशुद्ध, अपवित्र मनात भगवंत राहू शकत नाही हे लक्षात ठेवले पाहिजे. बाह्य दुःसंग म्हणजे वाईट, व्यसनी लोकांची, नास्तिकांची आणि दुर्जनांची संगत टाळली पाहिजे. व्यवहारात काही वेळा हे अशक्य असते. अशा वेळी मन खंबीर करून आपले ध्येय साधण्यासाठी स्वतःला आवरले पाहिजे. आतील दुःसंग म्हणजे चित्तातील भोग विषयांची ओढ. बाह्य उद्दीपनाने चित्तात असे विषय उठले तरी त्या वृत्ती आवरण्याचा अभ्यास केला पाहिजे. कोणत्याही कारणाने मनात वाईट वृत्ती

उठल्या तरी त्यांचे चिंतन करू नये. कारण असे चिंतनच त्या वृत्तींना बळ देते आणि त्याचे ऊर्मीत म्हणजे अनिवार ओढीत रूपांतर होते आणि मग प्रत्यक्ष ती कृती घडते. हा आतील दुःसंग टाळण्यासाठी प्रथम कृतीवर ताबा आणावा. अनेकदा प्रबळ ऊर्मी येऊनही साधकाने कृती केली नाही की ऊर्मी येणे कमी होते व नंतर वृत्ती उठणे थांबते. म्हणून "आली उर्मी साहे। तुका म्हणे थोडे आहे।" मनात वाईट विचार आले तरी अशा वेळी नामस्मरण चालू केले तर ते विचार प्रथम क्षीण होतात व नंतर येईनासे होतात.

सन्मार्गाने चालणाऱ्या माणसाचीही वाईट संगतीमुळे कशी अवस्था होते ते भागवतात सांगितले आहे. भगवान कपिलदेव माता देवहूतीला म्हणतात : "यद्यसद्भिः पथि पुनः शिश्नोदरकृतोद्यमैः। आस्थितो रमते जन्तुस्तमो विशति पूर्ववत्॥ सत्यं शौचं दया मौनं बुद्धिः श्रीर्ह्रीर्यशः क्षमा। शमो दमो भगश्चेति यत्संगाद्याति सङ्क्षयम्॥ तेष्वशान्तेषु मूढेषु खण्डितात्मस्वसाधुषु । संङ्गं न कुर्यात् शोच्येषु योषित्क्रीडामृगेषु च॥" भागवत ३.३१.३२,३३,३४. (सन्मार्गाने जाणाऱ्यालाही स्त्री व धनामध्ये आसक्त असलेल्या माणसांची संगत घडली तर तो आपला मार्ग सोडून त्याचे अनुकरण करून पुन्हा नरकाच्या मार्गात पडतो. ज्या कुसंगामुळे सत्य, शौच, आणि अंतर्बाह्य पवित्रता, दया, वाणीचा संयम, बुद्धि, धन-संपत्ति, लज्जा, यश, क्षमा, मनाचा व इंद्रियांचा संयम आणि ऐश्वर्य इत्यादि सर्व सद्गुणांचा नाश होतो अशा अतिशय अपवित्र स्त्रियांच्या हातचे खेळणे बनलेल्या अस्वस्थ, मूढ आणि देहच खरा मानणाऱ्या वाईट लोकांची संगत कधीही करू नये.)

वाईट संगतीमुळे काय होते ते नारद पुढील सूत्रात सांगतात.

## सूत्र चव्वेचाळिसावे

**कामक्रोधमोहस्मृतिभ्रंशबुद्धिनाशसर्वनाशकारणत्वात् ॥४४॥**

**काम= भोगवासना, विषयवासना. क्रोध= राग, संताप. मोह= मोह, मूढता. स्मृतिभ्रंश= स्मृति नाहीशी होणे. बुद्धिनाश= बुद्धि, विवेक नाहीसा होणे. सर्वनाश= सर्व बाजूंनी, सर्व प्रकारे नाश होणे. कारणत्वात्= कारण असल्यामुळे.**

**दुःसंग हा भोगवासना, राग आणि मोह निर्माण करून स्मृतिनाश करतो आणि विवेक नष्ट करून सर्व प्रकारे माणसाच्या सर्वनाशास कारण होतो. (म्हणून तो टाळावा.)**

**विवरण** : वाइटांची संगत सोडून सज्जनांचा सहवास केला नाही तर माणसाच्या जीवनात अनर्थ परंपरा कशी ओढवते ते या सूत्रात सांगितले आहे. भगवद्गीतेतील पुढील श्लोकांची या सूत्रावर छाया पडलेली दिसते.

''ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते।
संगात्संजायते कामः कामात् क्रोधोऽभिजायते॥
क्रोधाद्भवति संमोहः सम्मोहात्स्मृतिविभ्रमः।
स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति॥'' अ. २.६२,६३.

म्हणजे विषयांचे चिंतन करणाऱ्या माणसाला त्या विषयांची आसक्ति निर्माण होते; आसक्तीमुळे त्या विषयांची कामना निर्माण होते आणि (ती इच्छा पूर्ण करण्यात विघ्ने आली म्हणजे) कामापासून क्रोध उत्पन्न होतो. क्रोधापासून अविवेक अर्थात मूढता उत्पन्न होते. मूढतेमुळे स्मरणशक्तीचा नाश होतो. स्मरणशक्तीचा नाश झाला म्हणजे बुद्धीचा, ज्ञानशक्तीचा नाश होतो आणि बुद्धीचा नाश झाला म्हणजे माणूस आपल्या साधनापासून च्युत होतो - त्याचा सर्वनाश ओढवतो.

अर्जुनाने भगवंताला विचारले की इच्छा नसताना देखील माणसाच्या हातून जबरदस्तीने पाप का होते? तेव्हां भगवंत म्हणाले, ''काम एष कोध एष रजोगुणसमुद्भवः। महाशनो महापाप्मा विध्येनमिह वैरिणम्॥'' भगवद्गीता अ. ३.३७॥ - रजोगुणापासून निर्माण झालेल्या भोगेच्छेचे क्रोधात रूपांतर होते. हा क्रोध अति खादाड व मोठा पापी आहे. यालाच तू या लोकींचा वैरी मान. सोळाव्या अध्यायात आसुरी संपत्तीचे वर्णन करताना भगवान सांगतात की काम, क्रोध व लोभ ही तीन प्रकारची नरकाची दारे आत्म्याला अधोगतीला नेतात.

वर वर्णन केलेली अनर्थ परंपरा लक्षात घेऊन साधकाने अतिशय सावधपणे आपल्या इंद्रियांवर आणि मनावर ताबा ठेवला पाहिजे. हे दुर्गुण अतिशय गोंडस मायावी रूप घेऊन माणसासमोर येतात. जोपर्यंत माणसाचा विवेक जागा असतो तोपर्यंत हे दोष आहेत हे माणूस ओळखतो पण त्याचे मन थोडे जरी बेसावध राहिले तरी विवेक नष्ट होऊन त्याचा अधःपात होण्यास वेळ लागत नाही. या बाबतीत विश्वामित्र व पराशर ऋषींची उदाहरणे प्रसिद्ध आहेत. म्हणून ''बलवान् इन्द्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति'' असे महाभारतात म्हटले आहे.

कोणतीही वृत्ति चित्तामधून येते. विवेक जागा ठेवून ती योग्य नसल्यास तिची वाढ संयमपूर्वक रोखावी लागते. असे केले नाही तर ती साधकाचा ताबा घेऊन त्याचा केव्हा अधःपात घडविते याचा त्याला पत्ता लागत नाही. म्हणून

पुढच्या सूत्रात वृत्ति सूक्ष्म असल्या तरी दुःसंगामुळे त्यांना कसे बळ प्राप्त होते ते नारदानी सांगितले आहे.

## सूत्र पंचेचाळिसावे

**तरंगायिता अपीमे संगात्समुद्रायन्ते ॥४५॥**

**तरंगायिता= तरंगांप्रमाणे, लहरींप्रमाणे. अपि= जरी. इमे= या (काम, क्रोध इत्यादींच्या वृत्ति). संगात्= (वाईट) संगतीमुळे. समुद्रायन्ते= सागराप्रमाणे विशाल होतात.**

**दुःसंगाने जडणारे विकार सुरुवातीला जरी मंद लहरींप्रमाणे वाटले तरी त्या दुःसंगामुळेच (त्यांची झपाट्याने वाढ होऊन) ते सागराप्रमाणे विशाल (व अनुल्लंघ्य) बनतात.**

**विवरण** : गवताच्या गंजीमध्ये पडलेली विस्तवाची एखादी ठिणगीच दुर्लक्ष झाले तर अनुकूल वारा मिळून केवळ ती गंजी नव्हे तर तिच्या आसपासच्या घरांच्या, झाडांच्या राख रांगोळीस कारण होते; तसेच विकारांच्या बाबतीतही आहे. विकार अग्नीप्रमाणेच खादाड असतात. त्यांची कधीच तृप्ती होत नाही. म्हणून त्यांना वेळीच आवरले पाहिजे. पुरूरव्याचे तारुण्य भोगून झाल्यावर काम कधीही तृप्त होत नाही हे ययातीच्या लक्षात आहे आणि तो म्हणाला, ''न जातु कामः कामानां उपभोगेन शाम्यति। हविषा कृष्णवर्त्मेव भूयएवाभिवर्धते॥'' उपभोगाने कामतृप्ती होत नाही. उलट अग्नीत (तुपाची) आहुती टाकल्याप्रमाणे तो आणखी वाढतो.

या सूत्रात नारदानी पाण्यावरील तरंगांचे उदाहरण दिले आहे. माणसाचे चित्त एखाद्या जलाशयाप्रमाणे असून त्यामधून वृत्तींचे तरंग उठत असतात. काही वृत्तींचे तरंग उठतात व आपोआप नाहीसे होतात. पण कामक्रोधासारख्या विकारांच्या वृत्तींचे तरंग उठले आणि त्यांना अटकाव झाला नाही तर त्या माणसाचे मन आणि देह व्यापून टाकतात. मग आलेली ऊर्मी तृप्त करण्याखेरीज माणसाला दुसरे काही सुचत नाही. अशा वेळी सुदैवाने सत्संग लाभला तर माणूस मन आवरण्याचा प्रयत्न करतो. पण दुर्दैवाने कुसंग झाला तर त्या विकारांच्या वृत्ती सागराप्रमाणे विशाल बनतात आणि त्या तृप्त करण्यात माणसाला कोणताही विधिनिषेध रहात नाही आणि त्याची माणुसकी नाहीशी होते.

आपण समाजात रहातो. समाजात जसा चांगल्या माणसांशी संबंध येतो तसा इच्छा नसली तरी वाईट माणसांशी संबंध येतो. रेल्वेच्या डब्यातील गर्दीत

आपल्या शेजारी दारुडा माणूस येऊन बसला तर आपण त्याला टाळू शकत नाही तसा व्यवहारात काही वेळा वाईट माणसांचा संबंध टाळता येत नाही. म्हणून श्रीमहाराजांनी सांगितले आहे की आपण लबाडीने वागू नये पण दुसऱ्याची लबाडी ओळखता येईल इतके सावध असावे. अशा प्रकारची सावधानता ठेवली म्हणजे वाईट माणसांची संगत टाळता आली नाही तरी अशा संगतीच्या दुष्परिणामांपासून साधक दूर राहतो.

कामवासनेप्रमाणे क्रोधाच्या बाबतीतही साधकाने सावध राहिले पाहिजे. पुराणांतील कथांमध्ये एखाद्या ऋषीच्या तपश्चर्येमुळे आपले इंद्रपद धोक्यात आहे असे वाटले तर इंद्र एक तर अप्सरा पाठवून त्या ऋषीला तपोभ्रष्ट करतो किंवा काहीही करुन त्याला क्रोध आणून तपोभ्रष्ट करतो अशी वर्णने आहेत. म्हणूनच या दोन विकारांना गीतेत अतिशय खादाड व महापापी म्हटले आहे. एकनाथ महाराज म्हणतात, "अंगा येता क्रोधसंग। अपवित्र होय सर्वांग। ब्रह्मचर्या होय भंग। तपसंहार होतसे॥" म्हणून साधकाने न रागावण्याचा निश्चय करावा. व्यवहारात काही वेळा असे प्रसंग येतात की त्यावेळी रागवावे लागते. म्हणून साधकाने आतून शांत राहून बाह्यतः रागावल्यासारखे दाखविण्याचा अभ्यास करावा. एकनाथ महराजांनी त्यांची अवस्था सांगताना म्हटले आहे की जनार्दनाच्या कृपेने राग व चीड यांचे दयेत रूपांतर झाले!

सत्संग करावा व दुःसंग टाळावा हे सांगून झाल्यानंतर पुढच्या पाच सूत्रांत मायेच्या पार कोण जातो आणि मग तो काय करतो ते नारदानी सांगितले आहे.

## २.३ : मायेच्या पार कोण जातो?

### सूत्र सेहेचाळिसावे

**कस्तरति कस्तरति मायाम्? यः सङ्गाँस्त्यजति,**
**यो महानुभावं सेवते, यो निर्ममो भवति ॥४६॥**

**कः= कोण. तरति= तरतो, पार जातो. मायाम्= मायेला. यः जो संगान्= आसक्तींना. त्यजति= टाकतो. यः= जो. महानुभावं= सत्पुरुषांची. सेवते= सेवा करतो. यः= जो. निर्ममो= ममत्वरहित. भवति= होतो.**

**माया तरून कोण जातो, मायेच्या पार कोण जातो? जो आसक्तींचा त्याग करतो, जो सत्पुरुषांची सेवा करतो, जो ममत्वरहित होतो. (तोच मायेच्या पलीकडे जातो.)**

**विवरण** : मायेच्या पार कोण जातो असे नारदानी दोनदा विचारले आहे यावरून ही गोष्ट किती महत्त्वाची आहे हे स्पष्ट होते. सत्संगाचे महत्त्व, सत्संगतीचा स्वीकार आणि वाईट संगतीचा त्याग करावयास सांगितल्यानंतर नारदानी मायेचा आणि ती तरून जाण्याचा प्रश्न का उपस्थित केला आहे? जे मुमुक्षु असतात, ज्यांना हे जग, त्यांचा प्रपंच आणि त्या प्रपंचात मिळणारे सुख सर्वस्वी खरे वाटत नाही ते खऱ्या सुखाचा, शाश्वत सुखाचा शोध घेण्यासाठी परमार्थाकडे वळतात. पूर्वसंस्कार, मनोरचना आणि परिस्थितीनुसार ते ज्ञानमार्ग, योगमार्ग, भक्तिमार्ग यांपैकी त्यांना आवडणाऱ्या मार्गावरून वाटचाल करू लागतात. भक्तिमार्गावरील साधकांना भगवंताचे दर्शन व्हावे असे वाटते. त्यासाठी सगुण मूर्तीची पूजा, तीर्थयात्रा, भजन, कीर्तन, नामस्मरण इत्यादी साधन ते करू लागतात. पुष्कळ नामस्मरण करावे, भगवंताचे प्रेम लागावे असे त्यांना वाटते. पण प्रयत्न करूनही त्यांपैकी फारच थोड्यांना भगवंताच्या प्रेमाचा लाभ होतो. असे होण्याचे कारण माया आहे. या पूर्वीच्या तीन सूत्रांत काय टाळावे आणि ते का टाळावे ते नारदानी सांगितले. वाईट लोकांची संगत टाळावी, वाईट ऐकू नये, वाईट पाहू नये, वाईट बोलू नये असे वाटते पण मायेमुळे नकळत त्याच्या उलट क्रिया होते. म्हणून नारदानी या सूत्रात मायेचा उल्लेख करून तिला ओलांडून पलीकडे कोण जातो असा प्रश्न विचारला आहे. मायेच्या पलीकडे जाण्यासाठी त्यानी तीन गोष्टी आवश्यक म्हणून सांगितल्या आहेत. वास्तविक या तिन्ही गोष्टींचा निर्देश पूर्वी साधनाच्या संदर्भात त्यांनी केलेला आहे.

मायेच्या पलीकडे जावयाचे म्हणजे काय हे समजण्यासाठी मायेचे स्वरूप आणि तिचे कार्य थोडक्यात जाणून घेतले पाहिजे. यासाठी प्रथम माया शब्दाचे अर्थ पाहू. (१) माया हे नाम असून त्याचा अर्थ चुकीची कल्पना असा होतो. (२) सांख्य तत्त्वज्ञानात प्रकृतीला माया म्हटले आहे. (३) मा या धातूचा अर्थ मावणे असा आहे. म्हणून हे विश्व ज्यामध्ये सामावले आहे ती माया. (४) मा धातूचा मोजणे किंवा मर्यादित करणे असाही अर्थ आहे. म्हणून जी भगवंताला मोजावयाला पहाते, अनंत भगवंताला अंतवंत रूप देते, त्याला सांत म्हणजे मर्यादित करते ती माया. (५) मा म्हणजे नाही. या म्हणजे जी. म्हणून जी अस्तित्वात नसूनही भासते ती माया.

परमात्म्याचे सत् म्हणजे केवळ असणे (Reality किंवा Being) हे रूप आहे. त्या असण्यातून जेव्हा होणे घडते (Being becomes Becoming)

तेव्हा माया निर्माण होते; आणि जेव्हा होण्याचे पुन्हा असणे होते तेव्हा माया लयाला जाते. ज्या माणसाला दृश्य जग खरे वाटते, दृश्याच्या मागे सूक्ष्म आहे असे जो मानत नाही, जो या अज्ञानातच सुख मानतो आणि या क्षणभंगुर सुखापलीकडे शाश्वत सुख आहे याचे ज्याला केवळ कल्पनेनेही ज्ञान नाही त्याच्या बाबतीत मायेच्या पलीकडे जाण्याचा प्रश्नच निर्माण होत नाही. पण ज्याचा नित्यानित्यविवेक जागा झाला आहे त्याला मायेच्या पलीकडे जावे असे वाटते. कारण माया ओलांडल्याशिवाय भगवंताचे दर्शन होत नाही. म्हणून संत मायेचा पडदा दूर सारा असे सांगतात. मायेला नदीची किंवा सागराचीही उपमा देतात. ही माया नदी अथवा सागर आपल्या शक्तीने ओलांडून जाणे शक्य होत नाही. सद्गुरु अथवा भगवंत यांनी कृपा केली तरच साधक ती ओलांडू शकतो. माया सत्याला असत्य करते, अनंताला सांताचा आभास निर्माण करते, ज्ञानावर अज्ञानाचे आवरण टाकते. त्यामुळे आनंद नाहीसा होऊन दुःख निर्माण होते. माया ही भगवंताची शक्ती आहे. ह्या शक्तीला जाणणे कठीण आहे. म्हणूनच शंकराचार्यांनी मायेचे वर्णन अनिर्वचनीय असे केले आहे. अमृतानुभवात ज्ञानेश्वर महाराज म्हणतात की शिवाच्या संकल्पातून शक्ति अथवा प्रकृति निर्माण होते आणि ती शिवाच्या आधारानेच जग निर्माण करते. भगवद्गीतेत भगवंत अर्जुनाला सांगतात की हे अर्जुना, माझ्या अधिष्ठानामुळे प्रकृती चराचरासह सर्व जग निर्माण करते - "मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम्॥" ९.१०॥ माया अनादि आहे पण तिचा नाश होतो. समर्थ सांगतात, "नाना रूप नाना रंग। तितुका मायेचा प्रसंग। माया भंगे ब्रह्म अभंग। जैसें तैसें॥" दासबोध ६.५.२२॥ मायेमुळे जे खरे नाही ते खरे वाटते. समर्थ सांगतात, "अहं ऐसें जें स्फुरण। तेंचि मायेचें लक्षण। तये मायेपासून त्रिगुण। गुणापासून भूतें॥" आत्माराम २.११॥ परा म्हणजे श्रेष्ठ प्रकृतीमुळे जग धारण केले जाते. अपरा प्रकृतीमध्ये पंच महाभूते, मन, बुद्धि व अहंकार यांचा समावेश होतो.

जीव शिवाला भेटण्याची इच्छा करतो पण गुणमाया त्या भेटीच्या आड येते. ती जीवाला सूक्ष्मातून स्थूलाकडे खेचून बुडवते म्हणून तिला अविद्यामाया म्हणतात. या उलट जीवाला स्थूलातून सूक्ष्माकडे नेणाऱ्या शक्तीला विद्यामाया म्हणतात. ही शक्ती शारदा म्हणून ओळखली जाते. "जे अनंत ब्रह्मांडें घडी। लीला विनोदेंचि मोडी। आपण आदिपुरुषीं दडी। मारून राहे॥" दासबोध १.३.६॥ असे समर्थांनी तिचे वर्णन केले आहे. भगवंताची त्रिगुणमयी माया

ओळखून तिला ओलांडून जाणे भगवंताला शरण जाणाऱ्यानाच शक्य होते. "दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया। मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते॥" भगवद्गीता ७.१४॥ स्वरूपाच्या अंगी असलेली मायाशक्ती ज्ञान्याला खरे रूप दाखवते तर अज्ञान्याला भलतेच रूप दाखवते. ती वस्तु आहे तशी दाखवीत नाही. सद्वस्तु असूनही मायेच्या आवरणामुळे तिचे अस्तित्व जाणवत नाही. पण माया येवढे करून थांबत नाही. वस्तु जशी नाही तशी म्हणजे विपरीत रूपात ती दाखवते. याला अतस्मिन् तत् बुद्धिः असे शंकराचार्यांनी म्हटले आहे. माया विश्वाला व्यापून आहे. ह्या विश्वव्यापी मायेला व्यक्तीच्या संदर्भात अविद्या म्हणतात. मी देह आहे असा निश्चय होणे ही अविद्या होय. एकदा मी देह आहे असा निश्चय झाला की त्याच्या पाठोपाठ मायेची सगळी भुतावळ येते. घराची भिंत पडली तर भिंत पडली म्हणता, घर पडले म्हणत नाही; पण ठेच लागून पडलात तर मी पडलो असे म्हणता, माझा देह पडला म्हणत नाही. मायेचे कार्य ते हेच असे श्रीमहाराज म्हणत. मायेच्या पलीकडे जाण्यासाठी भगवंताला शरण जाणे हा राजमार्ग आहे. पण जो शरण जाऊ शकत नाही त्याने देहाला वेगळेपणाने पहाण्याचा म्हणजे साक्षित्वाचा अभ्यास केला पाहिजे. हा अभ्यास करताना परमार्थाला विरोधी व्यक्तींची व वस्तूंची संगत टाळली पाहिजे. प्रपंच, प्रपंचातले संबंध आणि प्रपंचातील कर्तव्ये रहाणारच. पण त्यामधील आसक्ती सोडल्याशिवाय मायेच्या पार जाता येणार नाही. माझेपण हा मीचाच विस्तार आहे. मी आणि दुसऱ्या व्यक्ती आणि वस्तु यांचा संबंध निर्माण झाला की माझेपण निर्माण होते. मग मित्रही माझा आणि शत्रूही माझा असतो. मायेच्या पलीकडे जाण्यासाठी हा माझेपणा गेला पाहिजे असे संत सांगतात. ते सांगतात की माझेपणाचा एक एक संबंध सोडण्याचा प्रयत्न करण्यापेक्षा मीच भगवंताला देऊन टाकावा म्हणजे जे माझे आहे ते आपोआप भगवंताचे होते.

माझेपणाच्या फांद्या तोडण्यापेक्षा या वृक्षाचा बुंधा मी ज्यांनी तोडला अशांची म्हणजे महानुभावांची - सत्पुरुषांची सेवा करावी असे नारद सांगतात. माया म्हणजे अज्ञान (Error). अज्ञानात असणाऱ्या साधकाला अज्ञानाच्याच साहाय्याने त्यातून बाहेर पडणे शक्य नसते. म्हणून जे सत्पुरुष मायेच्या प्रवाहाला पार करून गेले आहेत त्यांना शरण जावे व त्यांचे ऐकावयाला शिकावे. चुका करून त्यांचे समर्थन करू नये. म्हणजे मग माया नदी ओलांडण्याची युक्ती ते शिकवितात. सत्पुरुष आपले हितकर्ते आहेत, निस्वार्थी

आहेत ही खात्री असावी. मन विकाराधीन होऊ नये यासाठी भगवंताचे अखंड स्मरण असावे. अहं ममत्व शून्य होण्यासाठी संगत्याग आणि महानुभावांच्या सेवेबरोबरच निर्ममो भवति म्हणताना नारदानी साधकाने या बाबतीत स्वतः करावयाच्या प्रयत्नाचे महत्त्व अधोरेखित केले आहे. भागवतात म्हटले आहे की "यथोपश्रयमानस्य भगवन्तं विभावसुम्। शीतं भयं तमोऽप्येति साधून् संसेवतस्तथा॥" भागवत ११.२६.३१॥ अग्नीचा आश्रय घेतला तर ज्याप्रमाणे थंडी, भय व अंधार एकाच वेळी नाहीसे होतात त्याप्रमाणे साधूंच्या सेवेमुळे त्यांच्या आश्रयास गेल्यामुळे - साधन भजनातील आळसरूपी थंडी, पुनः पुन्हा जन्मण्याचे आणि मरण्याचे भय आणि संसार बंधनाचे मूल कारण असणारा अज्ञानरूपी अंधार एकाच वेळी नष्ट होतात.

यानंतर मायेच्या पलीकडे जाण्यासाठी आवश्यक असलेल्या आणखी काही गोष्टी नारद पुढील सूत्रात सांगत आहेत.

## सूत्र सत्तेचाळिसावे

**यो विविक्तस्थानं सेवते, यो लोकबन्धमुन्मूलयति,**
**(यो) निस्त्रैगुण्यो भवति, (यो) योगक्षेमं त्यजति ॥४७॥**

**यः= जो. विविक्त स्थानं= निर्जन स्थळ. सेवते= आश्रय घेतो. यः= जो लोकबन्धं= लौकिक संबंधांमुळे निर्माण झालेली बंधने. उन्मूलयति= समूळ उखडून टाकतो -त्याग करतो. यः=जो. निस्त्रैगुण्यो= तीन गुणांच्या रहित. भवति= होतो. यः= जो. योगक्षेमं= अप्राप्य वस्तूंच्या प्राप्तीसाठी व प्राप्त वस्तूंच्या रक्षणासाठी करावी लागणारी धडधड. त्यजति= सोडतो. - तो मायेच्या पार जातो.**

**जो निर्जन स्थळाचा आश्रय घेतो, जो लौकिक संबंधांमुळे निर्माण झालेल्या बंधनाचा समूळ त्याग करतो, जो सत्त्व, रज व तम या तीन गुणांच्या रहित होतो आणि जो अप्राप्य वस्तूंच्या प्राप्तीसाठी आणि प्राप्त वस्तूंच्या रक्षणासाठी कराव्या लागणाऱ्या प्रयत्नांचा त्याग करतो तो मायेच्या पार जातो.**

**विवरण :** मागील सूत्रामध्ये मायेच्या पलीकडे जाण्यासाठी संगत्याग, महानुभावांची सेवा आणि ममत्वाचा त्याग करावा असे सांगितले. हा अभ्यास साधला की प्रस्तुत सूत्रात सांगितलेल्या चार गोष्टी करण्यास तो प्रवृत्त होतो.

**विविक्तस्थानं सेवते.**

भगवद्गीतेच्या तेराव्या अध्यायात ज्ञानाची लक्षणे सांगताना भगवंतानी "विविक्तदेशसेवित्वमरतिर्जन संसदि" ॥ १३.१०॥ म्हणजे एकांतात शुद्ध, पवित्र ठिकाणी राहाण्याचा स्वभाव आणि (विषयासक्त) मनुष्यांच्या समुदायात मिसळण्याची नावड या दोन गोष्टी सांगितल्या आहेत. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "बहु एकांतावरी प्रीति। जया जनपदावरी खंती। जाण मनुष्याकारें मूर्ती। ज्ञानाची तो॥" ज्ञानेश्वरी १३.६१३॥ समर्थ रामदासही सांगतात, "कांहीं गल्बला कांहीं निवळ। ऐसा कंठीत जावा काळ॥" दासबोध १९.८.२९॥ तसेच "जयास येकांत मानला। अवघ्याआधीं कळे त्याला॥" दासबोध १८.१०.५०॥ लोकांच्या गर्दीपासून दूर अशा निर्जन शांत ठिकाणी विशेषतः ज्या ठिकाणी संत महात्मे रहात असतील, किंवा पूर्वी रहात होते अशा ठिकाणी साधकाने काही काळ तरी रहावे. अशा ठिकाणी ईश्वर चिंतन केल्यामुळे ज्ञान, भक्ति आणि वैराग्य यांची प्राप्ती होते. प्रपंचामध्ये आणि प्रापंचिकांच्या समुदायात संसाराचेच चिंतन होते. माणसाचे वागणे, बोलणे त्याच्या प्रतिमेत बंदिस्त झालेले असते. एकांतात साधक स्वतःस समोरासमोर पहातो आणि आपल्या खऱ्या स्वरूपाविषयी त्याचा विचार आणि चिंतन सुरू होते. म्हणून बाहेरच्या एकांतापेक्षा या आतल्या एकांताला जास्त महत्त्व आहे. भगवंतामध्ये मी विरघळून जाणे हे साधकाचे ध्येय असते. हे ध्येय साध्य होण्यास बाहेरच्या एकांताची मदत होते. एकांतात नित्यानित्य विवेक होतो. आपल्या खऱ्या वासना कोणत्या आहेत, आपण कशामध्ये गुंतलेले आहोत हे एकांतात लक्षात येते. लोकसमुदायात रहात असताना आपले खरे शत्रू ओळखणे कठीण असते, आणि शत्रूच ओळखता आले नाहीत तर लढणार कोणाशी? संसारात मायेच्या प्रभावामुळे शत्रू मित्राचा वेष घेऊन समोर येतात. निर्जन ठिकाणी राहून स्वतःचा शोध घेऊ लागल्यावर सत्य कोणते आणि भ्रम कोणता हे समजते. ज्यांना प्रपंच सोडून जाणे शक्य नसते त्यांना एकांत कोठला असा प्रश्न एका साधकांनी श्रीमहाराजांना विचारला होता. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, रात्री सगळे जग झोपते तेव्हा बारा ते पहाटे चार वाजेपर्यंत प्रापंचिकाला एकांतात साधन करणे शक्य आहे. म्हणून ज्यांना एकांत स्थळी जाणे शक्य नाही त्यांनी श्रीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे एकांताचा लाभ घ्यावा.

**लोकबन्धमुन्मूलयति.**

आपण समाजात राहतो. त्यामुळे समाजातील अनेक व्यक्तींशी आपला संबंध येतो. कुटुंबातील माणसे, आप्तेष्ट, नातेवाईक, नोकरी धंदा करीत असू

तेथील माणसे, अन्य राजकीय, सामाजिक, धार्मिक, सांस्कृतिक संस्थांमध्ये कार्य करत असलो तर तेथील माणसे, या सर्वांशी आपला संबंध येतो. संबंध शब्दातच बंधन आहे. सम्यक् बध्नाति; जो सर्व बाजूंनी बांधतो तो संबंध. लौकिक जीवनात ज्याचा खूप लोकांशी संबंध येतो तो मोठा, यशस्वी असे मानतात. पण आध्यात्मिक जीवनात एका भगवंताखेरीज माझे दुसरे कोणीही नाही अशी अनन्यता असणे आवश्यक असते. वेळप्रसंगी भगवंतासाठी इतर सर्व संबंध तोडावे लागतात. तुलसीदासानी मीराबाईस सांगितले की "जाको प्रिय न राम बैदेही। त्यजिये कोटि कोटि बैरीसम जद्यपि परमसनेही॥" आणि मीराबाईही म्हणाली, "मेरे तो गिरिधर गोपाल दूसरो न कोई॥" श्रीमहाराजांचे एक वचन आहे, "आप्तइष्ट सगे सज्जन यांचे राखावें समाधान; तरी चुकों न द्यावें अनुसंधान." या वचनातला तरी चुकों न द्यावें अनुसंधान हा भाग महत्त्वाचा आहे. आप्तइष्टांचे समाधान राखण्याच्या प्रयत्नात अनुसंधान रहात नसेल तर त्यांचे समाधान राखण्याच्या खटाटोपात पडू नये. विवाह, उपनयन, अन्य समारंभ, अंत्यसंस्कार इत्यादी अनेक कारणांनी आप्तेष्टांशी संबंध येतो. त्यामध्ये जपाचा वेळ तर जातोच, शिवाय ज्या सांसारिक गोष्टी अनित्य म्हणून साधकाला सोडाव्या असे वाटावयाला लागलेले असते त्यांच्याबद्दलच गप्पागोष्टी होऊन त्यांचेच चिंतन घडते, आणि साधक खाली घसरतो. म्हणून अशा प्रकारचे लोकबंध ध्येय निश्चित झालेल्या साधकाने टाळून भगवंताचे अनुसंधान पक्के व्हावे म्हणून साधनात जास्तीत जास्त वेळ घालवला पाहिजे. अशा वागण्यामुळे लोक साधकाला विक्षिप्त समजतील पण त्याने तिकडे दुर्लक्ष केले पाहिजे. याचा अर्थ विक्षिप्तपणाने जो वागतो तो साधक असा नव्हे आणि साधकानेही मुद्दाम विक्षिप्तपणे वागावे असा नव्हे. या बाबतीत साधकाने तारतम्याने वागले पाहिजे.

प्रपंचातील आसक्ती कमी झाल्याखेरीज लौकिक बंधनांचा त्याग घडत नाही. प्रपंचातील कर्तव्ये बाधत नाहीत; त्यांमधील आसक्ती बाधते. ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटल्याप्रमाणे "देह तरी वरीलीकडे। आपुलिया परि हिंडे। परि बैसका न मोडे। मानसींची॥" ज्ञानेश्वरी १३.४८५॥ अशी अवस्था झाल्यावर साधकाला प्रपंच बाधक होत नाही. पण ते घडण्यासाठी सुरुवातीला साधकाने लौकिक बंधनांचा समूळ त्याग करावा. शेतातली हरळी कापली तरी पाणी मिळाले की पुन्हा वाढते कारण मुळे जमिनीत असतात. म्हणून चांगला शेतकरी हरळी मुळासकट खणून काढतो. तसे लौकिक संबंधांच्या बाबतीत केले

पाहिजे. साधक एकांत स्थळी जाऊन राहिला तर त्याचा लोकांशी संबंध येणार नाही. पण अमुक दिवशी मित्राचा वाढदिवस आहे, त्याला शुभेच्छापत्र पाठविले पाहिजे असे त्याच्या मनात येते तोपर्यंत ते खरे एकांतसेवनही नव्हे आणि लोकबंध तोडणेही नव्हे. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ''जैसी वरिवरी पालवी खुडिजे। आणि मुळीं उदक घालिजे। तरी कैसेनि नाशु निपजे। तया वृक्षा॥'' ज्ञानेश्वरी २.३०५॥ एखादी गोष्ट मुळापासून उखडण्यात कष्ट असतात पण ध्येय निश्चित झाल्यावर ते साधण्यासाठी वैराग्य आवश्यक असते. ज्ञानमार्गात याला कष्ट असतात. भक्तिमार्गात भक्त आपले अनेक ठिकाणी वाटलेले प्रेम तेथून काढून भगवंताकडे वळवतो. त्यामुळे भगवंताखेरीज इतर सर्व संबंध समूळ नाहीसे होताना भक्ताला कष्ट होत नाहीत.

**निस्त्रैगुण्यो भवति.**

भगवद्गीतेच्या दुसऱ्या अध्यायात भगवंतानी निस्त्रैगुण्यो भवार्जुन असे सांगितले आहे. सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण प्रकृतीतून निर्माण होतात आणि जीवाला बांधतात. त्यांच्यामुळे मी देह आहे अशी बुद्धी होते आणि जीव संसार बंधनात सापडतो. ''सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः। निबध्नन्ति महाबाहो देहे देहिन मव्ययम्॥'' अ.१४.५॥ हे अर्जुना, सत्त्वगुण, रजोगुण व तमोगुण हे प्रकृतीपासून उत्पन्न झालेले तीन गुण अविनाशी जीवात्म्याला शरीरात बांधून ठेवतात. सर्व जीवांमध्ये सत्त्व, रज आणि तम हे तीन्ही गुण कमीजास्त प्रमाणात आढळतात. सत्त्वगुणप्रधान माणूस सज्जन, शांत, दयाळू, ईश्वर चिंतन करणारा, निर्हेतुक दान करणारा असतो. नीतिधर्माचे पालन करून तो द्रव्यार्जन करतो. तथापि त्याच्या सात्त्विक वृत्तीचेही त्याला बंधनच असते. रजोगुणप्रधान व्यक्तीला सतत काहीतरी कर्म केल्याशिवाय चैन पडत नाही. द्रव्यार्जन करताना तो नीतिबाह्य वागण्यास तयार असतो. स्वतःचे नांव व्हावे म्हणून मोठी जाहिरात करून तो दानधर्म करतो. आपल्या विद्वत्तेचाही तो देखावा करतो. अशा प्रकारे रजोगुणी माणूस देह व देहसुख यांच्या बंधनात अडकलेला असतो. अज्ञान, मोह, आळस, निद्रा ही तमोगुणप्रधान माणसाची लक्षणे होत. त्याच्याजवळ विवेक नांवालाही नसतो. त्यामुळे योग्य काय अयोग्य काय हेही त्याला समजत नाही. त्यामुळे त्याची पापाकडे सहज प्रवृत्ति असते. आपण अज्ञानी आहोत याचेही त्याला ज्ञान नसते.

परमार्थात तमोगुणी माणसाने प्रथम रजोगुणी बनण्याचा आणि रजोगुणी माणसाने सत्त्वगुणी होण्याचा प्रयत्न केला पाहिजे. सत्त्वगुणात वाढ झाली की

माणूस शुद्धसत्त्व होऊन ईश्वर दर्शनास पात्र होतो. म्हणून भगवद्गीतेच्या सोळाव्या अध्यायात सत्त्वसंशुद्धि हा दैवी गुण म्हणून सांगितले आहे. तथापि देहबुद्धि नाहीशी होऊन ईश्वर प्राप्ति होण्यासाठी या तीन्ही गुणांच्या पलीकडे जावे लागते. मी देह नाही; मी अकर्ता सत्तारूप आहे असे ज्ञान झाले की जीव त्रिगुणातीत होतो. तो मायेच्या बंधनातून मुक्त होतो. म्हणून नारदांनी निस्त्रैगुण्यो भवति असे म्हटले आहे. देह आहे तोपर्यंत देहामध्ये त्रिगुणांचे कार्य चालते पण त्यामागचा अहंभाव नाहीसा होतो. देहात राहणारा आत्मा देहाकडे कसा पाहतो, त्याची अवस्था कशी झालेली असते ते ज्ञानेश्वर महाराजांनी पुढील ओवीत समर्पक रीतीने सांगितले आहे. "सांडूनि आंगीची खोळी। सर्प रिगालिया पाताळीं। ते त्वचा कोण सांभाळी। तैसें जालें॥" ज्ञानेश्वरी १४.३१२॥

मायेपासून मुक्त होण्यासाठी, तीन्ही गुणांच्या पलीकडे जावे लागते. त्यासाठी अव्यभिचारिणी भक्ती हा उपाय अथवा मार्ग आहे असे भगवंत सांगतात. "मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते। स गुणान्समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते॥" भगवद्गीता १४.२६॥ म्हणजे जो पुरुष अव्यभिचारी भक्तिरूप योगद्वारा स्वार्थाचा व अभिमानाचा त्याग करून श्रद्धा-भक्तियुक्त परम प्रेमाने मला निरंतर भजतो तो या तीन्ही गुणांना ओलांडून सच्चिदानंदघन ब्रह्मात ऐक्य पावण्याला योग्य होतो.

**योगक्षेमं त्यजति.**

भोगवासना पूर्णपणे नाहीशी झाली नाही तोपर्यंत जे आपल्याजवळ नाही ते मिळावे आणि जे मिळालेले आहे ते सुरक्षित राहावे असे माणसाला वाटते. त्यासाठी तो खटपट करतो. पण वासना नाहीशा झाल्या, साधक गुणातीत झाला की साहजिकच त्याची ही खटपट थांबते. मग त्याची अवस्था भगवद्गीतेच्या चौथ्या अध्यायात सांगितल्याप्रमाणे आपोआप जे काही प्राप्त होईल त्यात संतुष्ट राहाणाऱ्या बंधनांपासून मुक्त झालेल्या पुरुषाची असते. ममत्व नाहीसे होऊन समत्व आल्यामुळे कशाचे आणि कोणापासून रक्षण करावयाचे असा त्याला प्रश्न पडतो. भगवद्गीतेच्या नवव्या अध्यायात भगवंत सांगतात, "अनन्याश्चिंतयन्तो माम् ये जनाः पर्युपासते। तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्॥" ९.२२॥ म्हणजे अनन्य भावाने माझ्या ठिकाणी स्थित झालेले भक्तजन माझे निरंतर चिंतन करून मला निष्काम भावाने भजतात. त्या नित्य ऐक्यभावाने माझ्या ठिकाणी स्थित झालेल्या भक्तांचा योगक्षेम मी

चालवतो. म्हणून मुमुक्षुने देखील योगक्षेमाची चिंता करणे सोडावे. ही चिंता माणसाला भगवंतापासून दूर नेते. साधकाने देहाच्या बाबतीत उदासीन व निर्मम व्हावे. जे काही मिळेल त्याचा भगवंताचा प्रसाद मानून संतोषाने स्वीकार करावा. ज्याचा पैशाचा हव्यास कमी होत नाही त्याला परमार्थ साधणे शक्य नाही. "अन्न धन मान हें तों प्रारब्धाआधीन" असे तुकाराम महाराज सांगतात.

पुढच्या सूत्रात नारद माया तरून जाण्यासाठी आणखी दोन गोष्टींचा त्याग व या सर्वाचा होणारा परिणाम सांगत आहेत.

## सूत्र अठ्ठेचाळिसावे

**यः कर्मफलं त्यजति, कर्माणि संन्यस्यति ततो निर्द्वन्द्वो भवति ॥४८॥**

**यः= जो. कर्मफलं= कर्माचे फळ. त्यजति= त्याग करतो. कर्माणि= कर्मे. संन्यस्यति= सर्वथा सोडतो. ततः = त्यानंतर. निर्द्वन्द्वो= द्वंद्वरहित. भवति= होतो.**

**जो कर्मफलांचा त्याग करतो, समस्त कर्मे सर्वथा सोडतो आणि त्यामुळे द्वन्द्वरहित होतो. (तोच मायेच्या पलीकडे जातो.)**

**विवरण** : कोणीही माणूस कर्म न करता क्षणभरही राहू शकत नाही. काही नाही तरी श्वासोच्छ्वासाचे कर्म चालू असते. श्वासही काही वेळ प्रयत्नपूर्वक थांबवला तर तो तसा थांबवणे हेही कर्मच होते! भगवद्गीता सांगते, "न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्॥" ३.५॥ कर्म न करण्यापेक्षा कर्म करणे श्रेष्ठ आहे. कर्माखेरीज माणसाचा शरीर निर्वाह होऊ शकत नाही. म्हणून गीता कर्म सोडावयास सांगत नाही तर कर्माच्या फलाविषयी असलेली आसक्ती सोडावयास सांगते. वासना आहेत तोपर्यंत माणसाला काहीतरी मिळावे आणि काहीतरी टळावे असे वाटत असते. पण वासना नाहीशा झाल्या, साधक गुणातीत झाला की त्याला योगक्षेमाची चिंता राहात नाही. वासनांच्या प्रेरणेतून माणूस जे कर्म करतो त्याचे फळ मिळावे म्हणून त्याची दृष्टी फळावर असते. पण वासना क्षीण झाल्या म्हणजे फळावरची दृष्टी कर्मावर जाऊन कर्म जास्त चांगले होते. परगावी जायचे असेल तर तिकीट काढताना त्या गावाचे नांव जसे सांगावे लागते त्याप्रमाणे कर्म करताना त्या कर्माचा हेतु स्पष्टपणे माहीत असावा लागतो. तथापि तो हेतु साध्य होईलच अशी कर्म करणाऱ्याला खात्री नसते. मी कर्ता नसून राम कर्ता आहे अशी ज्याची खात्री झालेली असते

त्याचा कर्मफलाचा त्याग सहज घडतो. कारण कर्मात यश मिळाले तर हे मी केले असा अहंकार त्याच्या ठिकाणी नसतो. म्हणून कर्म सोडू नकोस तर आसक्ती सोडून कर्म कर, फलावर तुझा अधिकार नाही असे गीता सांगते.

ज्याच्या मनात कर्मफलाची ओढ आहे त्याची मायेपासून सुटका होणे शक्य नाही. म्हणून कोणतेही काम करताना ते ईश्वरार्पण बुद्धीने करावे. खरा कर्ता भगवंत आहे. दृश्यामध्ये कार्य करणारा केवळ निमित्त असतो. भारतीय युद्धाच्या प्रसंगी दोन्ही सैन्यांच्या मध्ये अर्जुनाचा रथ उभा केलेला असताना भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणाले, ''मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्॥'' ११.३३॥ हे (सर्व) माझ्याकडून पूर्वीच मारले गेले आहेत. हे सव्यसाची, तू केवळ निमित्तमात्र हो. श्रीमहाराज म्हणत की श्रीकृष्ण सारथ्य करीत होते त्या रथात अर्जुनाच्या ऐवजी एखादे बाण सोडणारे यंत्र असते तरी तेच कार्य झाले असते! म्हणूनच श्रीरामकृष्ण मी यंत्र तू यंत्री असे म्हणत असत. ईश्वरार्पण बुद्धीने कर्म केले की कर्मे करूनही त्यांच्या शुभाशुभ फलरूप बंधनांपासून कर्म करणारा मुक्त होतो.

निष्काम भावाने कर्मे करीत असताना अशी एक अवस्था येते की कर्म करण्याची प्रवृत्तीच रहात नाही. भक्ताचा अहंबोध नाहीसा होतो. त्याच्या हृदयात भगवंत स्थिर होतो आणि अतिशय सहजपणे कर्मत्याग घडतो. म्हणूनच श्रीमहाराज म्हणत असत की कर्म सोडू नये, ते सुटावे. संसार सोडू नये, तो सुटावा. मीपणा आणि माझेपणा गेला की भक्त कर्मे करूनही अकर्ता होतो. सत्त्वगुणी भक्ताचे कर्म आपोआप सुटते. त्याचप्रमाणे साधकाला आत्मज्ञान झाले की त्या ज्ञानाच्या उन्मादानेही त्याला काही काळ देहाचा व कर्माचा विसर पडतो. तथापि ते ज्ञान स्थिर झाल्यानंतर मात्र त्याच्या हातून कर्म घडते. तो ते करीत नाही.

मी कर्ता नाही; खरा कर्ता भगवंत आहे. हे जगत् ही त्याची निर्मिती आहे आणि त्याने केलेल्या नियमांनुसार जग चालते याची खात्री झाली की भक्ताच्या ठिकाणी समत्व येते. अनुकूल आणि प्रतिकूल हे भाव नाहीसे होतात. जे जे दिसते ती ती भगवंताची कृती आहे, ते भगवंताचेच रूप आहे असा भाव दृढ होतो आणि सुख-दुःख, लाभ-हानि, शत्रू-मित्र, शीत-उष्ण इत्यादी द्वंद्वांपलीकडे भक्त जातो. मायेच्या पार जाण्यासाठी भक्ताकडून होणारा शेवटचा त्याग अथवा अर्पण नारदानी पुढील सूत्रात सांगितले आहे.

## सूत्र एकोणपन्नासावे

**(यो) वेदानपि सन्यस्यति; केवलमविच्छिन्नानुरागं लभते ॥४९॥**

**यः= जो. वेदान् अपि= वेदांना- वेदांचा देखील (वेदविहित विधिनिषेधात्मक कर्मांचा). सन्यस्यति= बाजूस करतो -त्याग करतो (सः=तो) केवलं=. केवळ, शुद्ध. अविच्छिन्न= अखंड एकरस. अनुरागं= (उत्तरोत्तर वाढणारे) प्रेम. लभते= लाभ होतो.**

**जो वेदांनी सांगितलेल्या विधिनिषेधात्मक कर्मसमूहाचा देखील त्याग करतो त्याला भगवंताच्या उत्तरोत्तर वाढणाऱ्या शुद्ध अखंड एकरस प्रेमाचा लाभ होतो. (तोच मायेपासून मुक्त होतो.)**

**विवरण** : नारदांचा निश्चित काळ सांगता येत नाही. या सूत्रात नारदानी जो वेदांनी सांगितलेल्या विधिनिषेधात्मक कर्मसमूहाचा त्याग करतो म्हटले आहे. म्हणजे त्यांच्या ह्या सूत्ररचनेचा काल हा वेदकालानंतरचा आहे हे स्पष्ट आहे. ज्या काळात नारदानी ही सूत्रे रचली त्या काळच्या धार्मिक परिस्थितीचा त्यांच्यावर परिणाम झालेला असणारच. म्हणून ते जेव्हा मायेच्या पलीकडे जाण्यासाठी वेद सोडा असे म्हणतात तेव्हा ते वेदांची संस्कृति सोडावयास सांगतात असा अतिव्याप्त अर्थ घेता येणार नाही. वेदांची तीन अंगे आहेत. पहिले अंग संहिता. यात वेदकालीन देवतांविषयीचे मंत्र आहेत. दुसरे अंग ब्राह्मण ग्रंथ. यात विविध प्रकारच्या यज्ञांसंबंधी ऊहापोह आहे. हे वेदांचे कर्मकाण्ड होय. तिसरे अंग आरण्यके. ऋषींनी अरण्यात राहून भगवंतासंबंधी अथवा ब्रह्मासंबंधी चिंतन करून जे अनुभव घेतले त्यांचे ग्रथन या अंगात आहे. उपनिषदे हे आरण्यकाचा भाग आहे. भारतीय संस्कृतीला वैदिक संस्कृति म्हणतात. भारतीयांचे समाजजीवन, धर्मविचार, तत्त्वज्ञान वेदांमध्ये आहे आणि भारतीय लोक वेदवचन प्रमाण मानतात. असे असताना वेदांचाही त्याग म्हणताना नारदाना काय अभिप्रेत आहे ते पाहिले पाहिजे. वेदांनी जीवनासंबंधी मार्गदर्शन केले असून ज्या काळात छापण्याची कला नव्हती त्या काळात शास्त्री पंडितांनी वेद मुखोद्गत करून वेदांची परंपरा टिकविली. तथापि मंत्रांचे पाठांतर करणाऱ्या सर्वांना त्यांचा अर्थ माहीत असेच असे नाही. त्याचप्रमाणे बदलत्या काळानुसार प्रत्यक्ष जीवनातील आचरण वेदांनी सांगितल्याप्रमाणे राहिले नाही. तथापि वेदाध्ययन केलेल्यांना मात्र त्यांच्या पांडित्याचा अहंकार होता. वेदांचे सांगणे आणि प्रत्यक्ष जीवन यात तफावत

निर्माण झाली. म्हणून भक्त वेदांचा त्याग करतो म्हणताना तो वेदांच्या अभ्यासातून आलेल्या अहंकाराचा त्याग करतो असे नारद सांगतात. म्हणून तुकाराम महाराज म्हणतात, "वेदांचा तो अर्थ आम्हांसीच ठावा। येरांनी वाहावा भार माथा ॥ १ ॥ खादल्याची गोडी देखिल्यासी नाहीं। भार धन वाही मजुरीचें ॥ २ ॥" शब्दज्ञानापेक्षा आत्मप्रचीति श्रेष्ठ आहे. म्हणून शब्दपांडित्याच्या मागे न लागता अहंकाराचा त्याग करून जो भगवंताला शरण जातो त्याला भगवंत भेटतो. वेदांचे मर्म तुकाराम महाराजांनी सांगितले आहे. ते म्हणतात, "वेद अनंत बोलिला। अर्थ इतकाच साधला ॥ १ ॥ विठोबासी शरण जावें। निजनिष्ठे नाम गावें ॥ २ ॥"

वेदांचे दुसरे कर्मकण्डाचे म्हणजे यज्ञयागादिकांचे अंग आहे ते सकाम कर्माचे असून स्वर्गप्राप्ति हा त्याचा प्रधान हेतु आहे. वेदांनी सांगितलेली कर्मे करताना सगळे लक्ष कर्मावर आणि त्याच्या फळावर केंद्रित होऊन भगवंताचा विसर पडतो. अठ्ठेचाळिसाव्या सूत्रात नारदानी कर्म व कर्मफल सोडावयाला म्हणजे आसक्ती सोडून संन्यास बुद्धीने कर्म करावयाला सांगितले आहे. खरा भक्त काम्य व निषिद्ध कर्मे करीत नाही. त्याची नित्य व नैमित्तिक कर्मेही वेदबाह्य असत नाहीत. मात्र त्याची कर्मे आसक्तिरहित व कर्मफलाची आशा न ठेवता केलेली असतात. म्हणजेच त्याने कर्मकाण्डाचाही त्याग केलेला असतो. खरा भक्त जीवनाला कंटाळत नाही. विश्वामध्ये त्याचे जे काही लहान मोठे नियत कर्म असेल ते करताना, प्रपंच प्रारब्धानुसार चालतो हे जाणून तो आपल्या मनाचे स्वातंत्र्य अबाधित राखतो आणि ते मन भगवंताला देतो. जीवनात सुखदुःखादि द्वंद्वे वाट्याला येणारच. ती सोसण्याची शक्ती दे अशी तो भगवंताजवळ प्रार्थना करतो. भक्ताला निर्द्वंद्व साधावयाचे असल्याने दुःखाप्रमाणे सुखही सोसण्याचा त्याला अभ्यास करावा लागतो. श्रीमहाराज म्हणत की विष गोडातून जास्त बाधते. म्हणून दुःखाप्रमाणेच सुखही मनाचे संतुलन न बिघडता भक्त सोसतो. वेदाज्ञेपेक्षा गुरुआज्ञा त्याला महत्त्वाची वाटते कारण वेदांच्या केवळ शब्दांपेक्षा गुरूंचे बोलणे प्रचीतीचे असते. परमार्थ हा प्रचीतीचा आहे. प्रचीति म्हणजे अनुभव. समर्थ रामदास सांगतात, "प्रचीतीवीण जें बोलणें। तें अवघेंचि कंटाळवाणें। तोंड पसरून जैसे सुणें। रडोन गेलें॥" दासबोध ९.५.१५॥ म्हणून नारद आत्मप्रचीति घ्या असे सांगत आहेत. केवळ वेदांच्या पांडित्याने ब्रह्मानुभव मिळणे शक्य नाही. विवेकचूडामणीमध्ये शंकराचार्य म्हणतात, "अविज्ञाते परे तत्त्वे शास्त्राधीतिस्तु निष्फला।"

**केवलम् अविच्छिन्नम् अनुरागम् लभते.**

राग म्हणजे प्रेम. राग म्हणजे रंग. अनु म्हणजे मागे जाणे किंवा - ला शोभणे. भगवत् प्रेमाचा मनाला रंग येणे हा अनुराग. भक्ताच्या हृदयात जेव्हां भगवंताबद्दल ओढ निर्माण होऊन ती सतत वाढू लागते तेव्हा त्या प्रेमाला अनुराग म्हणतात. भक्ताच्या ऐहिक वासना नाहीशा होऊन तैलधारेप्रमाणे अखंड नाम त्याच्या मुखात येऊ लागते. तुकाराम महाराज सांगतात, "प्रेम देवाचें देणें। देहभाव जाय जेणें। न धरावी मनें। शुद्धी देशकाळाची ॥१॥ मुक्त लज्जाविरहित। भाग्यवंत हरिभक्त। जाले वोसंडत। नामकीर्ति पवाडे ॥२॥" त्याचप्रमाणे, "प्रेम जडले तुझें पायीं। आणीक न सुचे मजला कांहीं ॥१॥ रात्रीदिवस तुझें ध्यान। तेंचि माझें अनुष्ठान" अशी भक्ताची अवस्था होते. त्यामुळे भगवंताकडूनही त्याच्या प्रेमाला प्रतिसाद मिळतो. मग वेदविहित कर्मे, लौकिक कर्मे व इतर बंधने गळून पडतात. तो मायेच्या पलीकडे जातो, पण अद्यापि त्याला सिद्ध दशा लाभलेली नसते. ज्ञानेश्वर महाराजांनी म्हटल्याप्रमाणे तो अजून चतुर्दशीचा चंद्र असतो. तथापि भगवंताशी एकरूप होण्याची पौर्णिमा आता दूर नसते. मायेच्या विषयाचा समारोप करण्यासाठी नारद पुढील सूत्रात म्हणतात :

## सूत्र पन्नासावे

**स तरति स तरति, स लोकांस्तारयति ॥५०॥**

**सः= तो. तरति= तरतो. सः= तोच. तरति= तरून जातो. सः= तो. लोकान्= इतरांना. तारयति= तारतो.**

**तो तरतो, तोच तरून जातो (आणि) तो जगामधील इतर लोकांनाही तारून मायेच्या पार नेतो.**

**विवरण** : सेहेचाळिसाव्या सूत्रात नारदानी कोण तरतो हा प्रश्न दोनदा केला आहे आणि त्याचे उत्तर देतानाही जोर देऊन केवळ तोच तरून जातो व इतर लोकांनाही मायेच्या पार तारून नेतो असे सांगितले आहे. ४६ ते ४९ या सूत्रात त्यासाठीचे साधन अथवा अटी सांगितल्या आहेत त्या पुन्हा थोडक्यात पाहू.

४६ व्या सूत्रात (१) आसक्तींचा त्याग (२) सत्पुरुषांची सेवा व (३) ममत्वाचा त्याग सांगितले आहेत.

४७ व्या सूत्रात (४) एकांत स्थानी रहाणे (५) लौकिक बंधनांचा समूळ त्याग (६) त्रिगुणांपलिकडे जाणे (७) योगक्षेमाचा त्याग सांगितले आहेत.

४८ व्या सूत्रात (८) कर्मफलाचा त्याग (९) कर्मसंन्यास आणि (१०) द्वंद्वांपलीकडे जावयास सांगितले आहे. आणि

४९ व्या सूत्रात (११) वेदांचा संन्यास सांगून हे सर्व ज्याला साधते त्याला भगवंताचे अखंड प्रेम लाभते म्हणून सांगितले आहे.

वरील अटी पाहिल्या आणि त्यासाठीच्या साधनांचा विचार केला की माया दुस्तर म्हणजे तरून जाण्यास कठीण आहे असे का म्हणतात ते लक्षात येते. भगवद्गीतेत यासाठी एकच गोष्ट करावयास सांगितली आहे. भगवंत सांगतात की जो केवळ मलाच शरण येतो तो या दैवी गुणमयी दुस्तर मायेतून तरून जातो. मायेच्या पलीकडे गेला की सान्त जीव अनंत होतो. तो सिद्ध होतो, तृप्त होतो. काही काळ तो आत्मानंदात मग्न रहातो. त्यानंतर मात्र या सत्पुरुषाला मायानदीत बुडणाऱ्या जीवांचा कळवळा येतो आणि आपल्या स्थानी आत्मानंदात मग्न राहूनही जणू खाली वाकून तो माया नदीत गटंगळ्या खाणाऱ्या जीवांवर कृपा करून त्यांना वर उचलतो. तुकाराम महाराज म्हणतात, "आपण तरेल नव्हे ते नवल। कुळें उद्धरील सर्वांची तो॥" असे करताना अहंता नाहीशी झालेली असल्यामुळे आपण दुसऱ्यांवर उपकार करतो आहोत अशा प्रकारचा भावतरंग त्याच्या मनात उठत नाही.

यानंतरच्या पाच सूत्रांत नारदानी प्रेमभक्तीचे वर्णन केले आहे ते आता पहावयाचे आहे.



अध्याय तिसरा

# प्रेमभक्तीचा महिमा

## ३.१ : प्रेमभक्तीचे वर्णन

### सूत्र एक्कावन्नावे

**अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम् ॥५१॥**

**अनिर्वचनीयं= ज्याचे शब्दांनी वर्णन करता येत नाही असे.**

**प्रेमस्वरूपम्= प्रेमाचे स्वरूप.**

**प्रेमाच्या स्वरूपाचे शब्दांनी वर्णन करता येत नाही.**

**विवरण** : नारदभक्तिसूत्रातील हे एक महत्त्वाचे सूत्र आहे. भक्तीची व्याख्या करताना दुसऱ्या सूत्रात ती परमप्रेमरूपा आहे असे म्हटले आहे आणि तिसऱ्या सूत्रात अमृतस्वरूपा म्हटले आहे. रूप आणि स्वरूप यांमध्ये फरक आहे. रूपात वस्तूचा आकार, रंग, वजन, आवरण इत्यादी बाह्य गुणधर्मांचा समावेश होतो. स्वरूप वस्तूच्या अंगभूत स्थायीभावाचे लक्षण सांगते. एखादा नट विविध भूमिका करताना त्या त्या भूमिकेला योग्य असा पोशाख, अंगविक्षेप इत्यादी करतो. म्हणजे एकाच व्यक्तीची अनेक रूपे असू शकतात. आपण बहुरूपी असा शब्द वापरतोच. पण रूपे अनेक असली तरी त्या नटाचा अंगभूत स्थायीभाव हे त्याचे स्वरूप असते. ह्या सूत्रात प्रेमस्वरूप म्हटले आहे. प्री धातूपासून प्रेम शब्द होतो. तृप्त होणे, समाधान पावणे, संतोष होणे असा याचा अर्थ आहे. प्रेम हा मनाचा असा अनुभव किंवा अवस्था आहे की त्यामुळे मनाला समाधान होते.

शंकराचार्यांनी विश्वाला सत्त्वासत्त्वाभ्याम् अनिर्वचनीयः म्हटले आहे. जग खरे म्हणावे तर सारखे बदलते आहे. आपण या जगाचाच भाग आहोत त्यामुळे प्रतिक्षणी होणारा बदल तादात्म्यामुळे आपल्या लक्षात येत नाही. म्हणून ते खरे म्हणावे तर मागच्या क्षणी ते जसे होते तसे या क्षणी नसते. बरे असत् म्हणावे तर ते आपल्या अनुभवाला येते. तथापि प्रत्येकजण आपआपल्या जगात जगत असतो. बरे, जग भ्रमरूप म्हणावे तर त्याच्यापासून आपल्याला सुखदुःख होते. मग खरोखर हे जग आहे कसे ? शंकराचार्य म्हणतात की ते अनिर्वचनीय आहे, म्हणजे त्याचे शब्दांनी वर्णन करता येत नाही. मायेचेही असेच वर्णन करतात. या सूत्रात प्रेमाचेही शब्दांनी वर्णन करता येत नाही असे म्हटले आहे.

वास्तविक प्रत्येक माणसाला प्रेमाचा अनुभव असतो. पण एखाद्याला जर तू आईवर किंवा देशावर प्रेम करतोस म्हणजे काय असे विचारले तर तो कदाचित ज्यांमधून प्रेम व्यक्त होते अशी कृती सांगेल. पण ती कृती म्हणजे काही प्रेम नव्हे; तो प्रेमाचा एक आविष्कार म्हणता येईल.

माणूस संबंध घेऊन जन्माला येतो. म्हणजे जन्मतःच तो सर्व बाजूंनी बांधलेला असतो. आई, बाप, भाऊ, बहीण इत्यादी संबंध हे रक्ताचे संबंध असतात. ते जन्मतःच ठरलेले असतात. याखेरीज अन्य सामाजिक, राजकीय, आर्थिक, आध्यात्मिक इत्यादी संबंधांचे त्याच्याभोवती जाळे विणलेले असते. परिस्थिती, माणसाची प्रवृत्ती आणि आवड निवड यांचा या संबंधांमध्ये भाग असतो. आध्यात्मिक संबंधांमध्ये भक्त आणि देव किंवा शिष्य आणि गुरु हे संबंध महत्त्वाचे असतात. ज्ञान आणि भक्ती हे भगवत्प्राप्तीचे दोन प्रमुख मार्ग आहेत. भक्ति अथवा प्रेम हे कोमल स्नेहमय, रसमय आहे. भक्ताला जेव्हा सर्व प्राणिमात्रात भगवंत दिसू लागतो तेव्हा 'जित देखौं तित तू' अशी त्याची अवस्था होते. तो ईश्वरार्पण बुद्धीने किंवा कर्म ही ईश्वराची पूजा आहे या भावाने कर्म करतो. जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन्ही अवस्थात भगवंताचे स्मरण चालू राहिले की त्याच्या नकळत तो चौथ्या म्हणजे तुरीय अवस्थेत राहू लागतो. असे हे प्रेम विलक्षण, अनिर्वचनीय आहे.

प्रेम हे दृश्य नाही. त्याचे निश्चित असे व्यक्त स्वरूप सांगता येत नाही. प्रेम हे कर्म नाही; तो अनुभव आहे. जो त्या अनुभवात बुडालेला असतो तो त्याचे वर्णन शब्दांनी करू शकत नाही कारण परमप्रेम सिद्ध झाले की ते माणसाच्या ज्ञानेंद्रियांच्या आंवाक्यापलीकडे आनंदस्वरूप असते. भगवंताशी तन्मय झालेला आणि तो आनंद भोगणारा भक्त वेगळेपणाने त्या भोगाचे वर्णन करू शकत नाही. शिवाय तो आनंद शब्दांच्या सामर्थ्यापलीकडचा असतो. प्रेमाचा भर ओसरल्यावर भक्त जेव्हा त्या आनंदाचे वर्णन करू लागतो तेव्हा ते वर्णन म्हणजे त्या आनंदाची केवळ आठवण असते. म्हणूनच तुकाराम महाराज म्हणतात, "प्रेम नये सांगतां बोलतां दावितां। अनुभव चित्ता चित्त जाणे" आजपर्यंत माझा असलेला मी भगवंताला दिल्यानंतरचे प्रेम हे खरे निरुपाधिक प्रेम असते. मग बाकीचे सर्व संबंध गळून पडतात आणि भक्त आणि भगवंत हा एकच संबंध उरतो. 'माता रामो मत्पिता रामचंद्रः' या श्लोकात म्हटल्याप्रमाणे बाकीचे सर्व संबंध भगवंतात विलीन होतात. भगवंताशी

असणाऱ्या विविध संबंधांपैकी दास्य भावाला महाराष्ट्रातील संतांनी विशेष महत्त्व दिले आहे. ज्ञानेश्वर महाराज स्वतःला निवृत्तिदास म्हणवितात तर एकनाथ महाराज एका जनार्दनी अशी नाममुद्रा धारण करतात. समर्थ स्वतःला रामाचे दास म्हणवितात तर तुकाराम महाराज "तरिच जन्मा यावें। दास विठोबाचे व्हावें॥" असे सांगतात. काकभुशुण्डीनीही "सेवक सेव्य भाव बिनु भव न तरिअ उरगारी" असे गरुडाला सांगितले आहे. प्रेमस्वरूप अनिर्वचनीय असले तरी आपल्याला जो आनंद मिळाला तो इतराना मिळावा किंवा त्याची ओढ लागावी म्हणून तसेच तो आनंद सांगितल्याशिवाय राहवत नाही म्हणून सत्पुरुष तो शब्दांनी सांगण्याचा प्रयत्न करतात. पण तो प्रयत्न कसा असतो ते पुढील सूत्रात सांगितले आहे.

## सूत्र बावन्नावे

**मूकास्वादनवत् ॥५२॥**

**मूक= मुका माणूस. आस्वादन= रसाची चव घेणे. वत्= प्रमाणे**

**प्रेमाचा अनुभव हा मुक्या माणसाने घेतलेल्या रसास्वादाप्रमाणे असतो. (त्याला तो शब्दांनी सांगता येत नाही.)**

**विवरण** : "मुक्याने गूळ खादला। गोडी न ये सांगावयाला॥" दासबोध ६.१०.२॥ असे समर्थ म्हणतात. त्याप्रमाणे ज्याला भगवंताच्या प्रेमाचा अनुभव आला त्याला तो सांगता येत नाही. मुक्या माणसाने इतरांबरोबर पक्वान्नांचे जेवण घेतले तर त्याला इतरांप्रमाणेच रसास्वाद मिळतो. इतरांप्रमाणेच त्याचीही तृप्ती होते. पण इतर लोक जसे त्या रसास्वादाचे आणि तृप्तीचे शब्दांनी वर्णन करतात तसे वर्णन तो करू शकत नाही. भगवंताच्या आनंदात बुडालेला भक्त मुका होतो. तो त्याचे शब्दांनी वर्णन करू शकत नाही. "डुबै सो बोलै नहीं, बोलै सो अनजान। गहरौ प्रेम-समुद्र कोउ डूबै चतुर सुजान॥" मौज अशी की जो जीव पूर्वी माया समुद्रात बुडत होता तो आता मायेच्या पलीकडे जाऊन प्रेम समुद्रात बुडतो! समुद्रातल्या थेंबाला म्हणजे मिठाला जशी समुद्राची ओढ असते तशी जीवाला भगवंताची ओढ असते. तो प्रेम समुद्रात शिरला की समुद्रच होऊन जातो. मिर्जा गालिब म्हणतो, "इशरते कतरा दर्यामें समा हो जाना॥" समद्रात मिसळून जाणे हे थेंबाचे ऐश्वर्य आहे. भक्त प्रेम समुद्रात मिसळून गेला की तो आनंद, ते ऐश्वर्य सांगावयाला कोणी रहातच नाही.

## सूत्र त्रेपन्नावे

**प्रकाशते क्वापि पात्रे ॥५३॥**

**प्रकाशते= प्रकाशित होते - प्रकाशात येते - पहावयास मिळते. क्वपि= क्वचित्, कोठे कोठे, कधीतरी. पात्रे= अधिकारी व्यक्तीमध्ये.**

**(त्या परमप्रेमाचा) प्रकाश क्वचित् कधीतरी एखाद्या अधिकारी व्यक्तीमध्ये पहावयास मिळतो.**

**विवरण :** भगवंताचे परमप्रेम शब्दांनी सांगता येण्याजोगे नसले तरी क्वचित एखाद्या अधिकारी व्यक्तीच्या ठिकाणी त्या प्रेमाचा प्रकाश पहावयास मिळतो. साधनारूपी सोपानाची शेवटची पायरी ओलांडल्यावर प्रेमानुभूति होते. चित्त पूर्णपणे वासनाशून्य झाल्यानंतर भक्ताच्या हृदयात भगवंताच्या प्रेमाचा दिव्य प्रकाश पडतो. हे प्रेम त्या भक्ताला शब्दांनी सांगता आले नाही तरी त्याच्या परम शांती आणि दिव्य आनंदामुळे संवेदनशील साधकांना त्याच्या सहवासात त्या शांतीचा आणि अनुभवाचा अनुभव येतो आणि त्या सत्पुरुषाचे असामान्यत्व जाणवते.

सामान्यतः अज्ञानासाठी अंधार व ज्ञानासाठी प्रकाश शब्द वापरतात. येथे तो प्रेमासाठी किंवा भक्तीसाठी वापरला आहे. अज्ञानाने झाकलेले आत्मस्वरूप अथवा परमात्मस्वरूप ज्ञानाने प्रकट होते असे म्हटले तर आत्मस्वरूपाला गौणत्व येते. वास्तविक ते स्वयंप्रकाश स्वसंवेद्य आहे. आत्मस्वरूपावर आलेला उपाधींचा पडदा नाहीसा करून ज्ञान आत्मस्वरूपाच्या प्रकाशात विलीन होते. ज्ञान पूर्ण झाले म्हणजे त्याचे प्रेमात पर्यवसान होते. भगवंत कसा आहे ते भक्त तादात्म्याने जाणतो. गीतेमध्ये भगवंत सांगतात, "भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः। ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम्॥" १८.५५॥ म्हणजे पराभक्तीच्या द्वारा तो भक्त मला तत्त्वतः उत्तम प्रकारे जाणतो आणि मी जो कोणी आणि जसा आहे त्या मला भक्तीने जाणून त्याच वेळी तो माझ्यामध्ये प्रवेश करतो. म्हणून ज्ञान आणि भक्ति असे वर्गीकरण न करता ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "ज्ञानी इयेतें स्वसंविती। शैव म्हणति शक्ति। आम्ही परमभक्ति। आपुली म्हणों॥" ज्ञानेश्वरी १८.११३३॥

ईश्वर कसा आहे? तो सन्मात्र आहे. तो आहे (Being) यापलीकडे त्याच्याबद्दल सांगता येत नाही. त्याची चिन्मय प्रेरणा किंवा स्फुरण म्हणजे ज्ञान आणि आनंदमय स्फुरण किंवा प्रेरणा म्हणजे प्रेम अथवा भक्ति. हे प्रेम

क्वचितच कोठेतरी योग्य अशा माणसाच्या ठिकाणी दिसते कारण उपाधींमुळे माणूस आपल्या मूळ परमात्मस्वरूपाला विसरतो आणि देहालाच मी म्हणू लागतो. यालाच देहबुद्धि म्हणतात. देहबुद्धीची उपाधी दूर झाली की आत्मबुद्धीचा प्रकाश दिसू लागतो. खोट्या मी व माझेची आसक्ती नष्ट होते. यासाठी साधकाला आपले अंतःकरण म्हणजे मन, बुद्धि, चित्त व अहंकार शुद्ध करावे लागतात. माणसाचे अंतःकरण त्याच्या जड देहाच्या आधाराने कार्य करते. म्हणून अंतःकरण शुद्ध करण्यासाठी देह शुद्ध करण्यापासून सुरुवात करावी लागते. कर्मेंद्रिये व ज्ञानेंद्रिये शुद्ध झाली की देह शुद्ध होतो. यासाठीच भद्रं कर्णेभिः श्रुणुयाम इत्यादि प्रार्थना आहे. ज्या वाणीने भगवंताचे नाम घ्यावयाचे त्या वाणीने वाईट शब्दांचा उच्चार करू नये असे श्रीमहाराज म्हणत. जिभेमध्ये ज्ञानेंद्रिय व कर्मेंद्रिय एकवटले आहे. जिभेने आपण रस चाखतो म्हणून ते ज्ञानेंद्रिय आहे व शब्दोच्चार करून त्या द्वारा स्थूलात कार्य घडवून आणतो म्हणून ते कर्मेंद्रियही आहे. तिच्यामध्ये पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश ही पाचही तत्त्वे आहेत. शब्द हा आकाशाचा गुण आहे. म्हणून जिभेने अखंड नामस्मरणाचा अभ्यास केला, आवश्यक ती आहार विहाराची पथ्ये पाळली आणि नीतिधर्माचे आचरण केले तर देह शुद्ध होतो.

संकल्प विकल्प हा मनाचा धर्म आहे. संकल्प विकल्प या वृत्ती असून वृत्ती शब्दमय असतात. म्हणूनच मनुष्य अगदी एकटा असतो तेव्हादेखील स्वतःशी बोलत असतो. एक वृत्ती उठते, ती विराम पावते तोपर्यंत दुसरी वृत्ती येते असा वृत्तींचा अखंड प्रवाह चालू असतो. विविध प्रकारच्या संकल्प विकल्पांच्या वृत्तींचा हा प्रवाह जर एकाच शब्दात - नामात गुंतवला तर नामस्मरणाच्या प्रवाहाने मन शुद्ध होते व मग ते भगवद्रूप होते असा संतांचा अनुभव आहे.

मनापेक्षा बुद्धी सूक्ष्म आहे. ती ज्याचे चिंतन करते त्याचा तिला आकार येतो. त्याला Thought forms म्हणजे विचार चित्रे म्हणतात. उदाहरणार्थ, साधक ज्या देवतेचे चिंतन करत असेल त्या देवतेचा आकार त्याची बुद्धी धारण करते. तो आकार सत्पुरुषांना दिसतो. एकदा एक माणूस गोंदवल्याला गेला, त्यावेळी श्रीमहाराज राम मंदिरात बसलेले होते. त्याने तेथे जाऊन श्रीमहाराजांना नमस्कार केला तेव्हा श्रीमहाराजांनी त्याला दत्त मंदिरात जावयास सांगितले. पुढे दोन दिवसांनी पुन्हा राम मंदिरात जाऊन त्याने श्रीमहाराजांना नमस्कार केला तेव्हा श्रीमहाराजांनी बाकी काही न बोलता त्याला गिरनार पर्वतावर जा म्हणून सांगितले. जवळच्या लोकांना श्रीमहाराजांच्या या

वागण्याचे आश्चर्य वाटले तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, मला तो दत्ताचा उपासक दिसत होता. ज्या नामस्मरणाने देहाची व मनाची शुद्धी होते त्याच नामस्मरणाने बुद्धी शुद्ध होऊन भगवंताच्या पादपद्मी अनन्य होते व साधक सर्व काळ नामाच्या अनुसंधानात रहातो.

शेवटी अहंकाराची शुद्धी म्हणजे लोप शरणागतीने होतो. मग अज्ञानाचा नाश होऊन भगवत् प्रेमाचा प्रवाह हृदयात स्थिर होतो. अशाप्रकारे देहाची व अंतःकरणाची शुद्धी झालेला माणूस क्वचितच आढळतो. म्हणून नारदानी 'प्रकाशते क्वापि पात्रे' म्हटले आहे. गीतेतही भगवंत सांगतात ''मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये। यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः॥''७.३॥ म्हणजे हजारो माणसांमध्ये कोणी एखादाच माझ्या प्राप्तीसाठी यत्न करतो आणि अशा यत्न करणाऱ्या योग्यांमध्ये सुद्धा एखादाच मला तत्त्वदृष्टीने जाणतो.

या सर्व विवेचनावरून साधकाने काय शिकावे? क्वचितच एखाद्या व्यक्तीच्या ठिकाणी भगवंताचे प्रेम आढळते. हे खरे असले तरी ते प्रेम आपल्याला लाभावे म्हणून साधकाने प्रयत्न केला पाहिजे. There is a distance between the ideal and the actual. हे अंतर कापण्यासाठीच साधन आहे. ध्येय निश्चित होऊन साधनात सातत्य राहिले की संत व भगवंत साधकाला मदत करतात. जोपर्यंत भगवत्प्राप्ति हे सर्वोच्च मूल्य होत नाही, आत्मदर्शनाची खरी तळमळ लागत नाही तोपर्यंत साधनात धरसोड वृत्ती राहाते. थोडी प्रगती होते न होते येवढ्यातच संसाराच्या ओढीने साधन लटके पडते आणि साधक खाली घसरतो. म्हणून आत्मदर्शन हे श्रेष्ठ मूल्य ठरले तरी त्याची आच लागावी लागते. त्यासाठी सत्संगतीचा फार उपयोग होतो. A soul afire sets other souls on fire असे विवेकानंदानी म्हटले आहे. ज्या निष्ठेने विज्ञानपंडित व कलावंत अभ्यास करतात त्या निष्ठेने आणि चिकाटीने नामस्मरण केले पाहिजे. अशा प्रकारे नामस्मरण करताना त्यापासून काही मिळवायचे आहे असा विचारही मनात नसावा. मग साधन आणि साध्य वेगळे रहात नाहीत. साधनाने साधत नाही हे समजण्यासाठी साधन करावयाचे असे श्रीमहाराज म्हणत असत. कारण यातूनच शरणागती येते. म्हणून साधकाने विशिष्ट जीवनपद्धतीचा स्वीकार करून आपले जीवन झोकून द्यावे लागते. अशी माणसे क्वचितच आढळतात. लांब पल्ल्याच्या धावण्याच्या शर्यतीत सुरुवातीला शेकडो लोक असले तरी मधे थांबणारांचे प्रमाण प्रत्येक मैलावर

वाढू लागते आणि शर्यत पूर्ण करणारे थोडेच राहातात आणि पहिला येणारा एकच असतो. परमार्थाच्या या मार्गावरही साधन चालू असताना मृत्यूमुळे चालणे मधेच थांबले तरी पुढे चालण्याची दुर्दम्य इच्छा साधकाने ठेवली तर पुढील जन्मी त्याचा त्याच मार्गावर पुढचा प्रवास चालू होतो. ''न हि कल्याणकृत् कश्चित् दुर्गतिं तात गच्छति'' म्हणजे कोणीही शुभ म्हणजे भगवत्प्राप्तीसाठी कर्म करणारा दुर्गती पावत नाही असे भगवंतानी अर्जुनाला आश्वासन दिलेले आहे.

माणसाला जीवनात समाधान नाही. भक्तीचे पर्यवसान समाधानात झाले पाहिजे. नारद सांगतात की ज्याचे भगवंतावर परमप्रेम आहे त्यालाच समाधानाचा लाभ होतो. व्यवहारात प्रेमाच्या मुळाशी स्वार्थ असतो पण भगवंतावरचे प्रेम पूर्ण निस्वार्थी असते. त्या प्रेमाचे शब्दांनी वर्णन करता येत नाही. तथापि क्वचित एखाद्या अधिकारी व्यक्तीच्या ठिकाणी ते प्रकट दिसते. हे परमप्रेम कसे असते ते शब्दांनी सांगण्याचा प्रयत्न नारदानी पुढील सूत्रात केला आहे.

## सूत्र चोपन्नावे

**गुणरहितं कामनारहितं प्रतिक्षणवर्धमानं**
**अविच्छिन्नं सूक्ष्मतरं अनुभवरूपम् ॥५४॥**

**गुणरहितं= कोणतेही गुण नसलेले. कामनारहितं= कोणतीही वासना नसलेले. प्रतिक्षणवर्धमानं= प्रत्येक क्षणाला वाढणारे. अविच्छिन्नं= ज्यामध्ये खंड नाही असे म्हणजे अखंड. सूक्ष्मतरं= अधिक सूक्ष्म. अनुभवरूपम्= केवळ अनुभवानेच जाणता येते असे.**

**भगवंतावरील या प्रेमाला कोणतेही गुण नाहीत, त्यामध्ये कोणतीही वासना नाही, ते अखंड, अधिक सूक्ष्म, प्रतिक्षणी वाढणारे आणि केवळ अनुभवरूप आहे.**

**विवरण** : आपला अनुभव सांगताना नारदानी या ठिकाणी सहा गोष्टींचा उल्लेख केला आहे. त्यांपैकी गुणरहितं, कामनारहितं आणि अविच्छिन्नं या तीन नकारात्मक आहेत तर प्रतिक्षणवर्धमानं, सूक्ष्मतरं आणि अनुभवरूपं या तीन सकारात्मक किंवा होकारात्मक आहेत. आपण प्रथम नकारात्मक गोष्टी म्हणजे भगवंतावरील प्रेमात काय नसते ते पाहू.

**गुणरहितम्** : जग त्रिगुणात्मक आहे. सत्त्व, रज व तम हे दृश्यातील गुण आहेत. प्रत्येक माणसाच्या ठिकाणी हे तीन्ही गुण असतात आणि त्यांपैकी जो

गुण प्रधान असेल त्याप्रमाणे त्याची सात्त्विक, राजस अथवा तामस वृत्ती असते. साधकांमध्येही हे तीन्ही प्रकार आढळतात. समर्थ रामदास सांगतात "सत्त्वगुणें भगवद्भक्ती। रजोगुणें पुनरावृत्ती। तमोगुणें अधोगती। पावती प्राणी॥" दासबोध २.५.२॥ तथापि "नरदेहाचे उचित। कांहीं करावें आत्महित। यथानुशक्त्या चित्तवित्त। सर्वोत्तमीं लावावें॥" दासबोध २.४.१३॥ भगवद्गीतेतही दैवी संपत्ती व आसुरी संपत्ती सांगितलेली आहे. असे असूनही नारद येथे भगवंताचे प्रेम गुणरहित आहे म्हणून सांगत आहेत. त्यांनी निर्गुण म्हटलेले नाही. भक्तीची सुरुवात सगुणातून म्हणजे व्यक्तातून होते आणि शेवट अव्यक्तामध्ये होतो. ते प्रेम गुणरहित म्हणजे ईश्वरी, दिव्य, अप्राकृत आहे. ते गुणांच्या सत्तेमध्ये येत नाही. ईश्वरी प्रेमाचा लाभ झाल्यामुळे वाल्या कोळ्याचा वाल्मिकी ऋषी झाला. प्राकृत प्रेम त्रिगुणात्मक असते. ते स्वार्थरहित नसते. पण ईश्वरी प्रेमाला कोणताही गुण चिकटत नाही. म्हणून ते गुणरहित आहे. ईश्वर रसस्वरूप आहे. रस म्हणजे आनंद; म्हणून भगवंताचे प्रेम आनंदस्वरूप आहे. गुण शब्दाने नैतिक गुणांचाही विचार होतो. त्या दृष्टीने पाहिले तरी ज्याला भगवंताच्या परम प्रेमाचा लाभ होतो त्याचे ते प्रेम नीतीला सोडून असू शकत नाही, तथापि तो त्या नैतिक गुणांच्याही पलीकडे म्हणजे अतिनैतिक - supraethical असतो. प्रत्येक वस्तु तिच्या अंगी असलेल्या गुणधर्मांच्या लक्षणांवरून ओळखली जाते. पण भगवत्प्रेमाची परमोच्च अवस्था इतकी विलक्षण असते की तिला कोणतेही गुण लावता येत नाहीत. कारण गुणांमध्ये कमीजास्तीपणा होऊ शकतो पण हे प्रेम मात्र अखंड एकरस असते. त्यात सत्त्व रज तमाचा लेशही नसतो.

**कामनारहितम्** : सर्वसामान्य माणसाचे जिवंतपण त्याच्या वासनेत असते. अमुक मिळाले किंवा तमुक टळले की मी सुखी होईन असे त्याला वाटते. वासना हे अपूर्णतेचे लक्षण आहे आणि जेथे अपूर्णता आहे तेथे खरा आनंद असू शकत नाही. दृश्यातून किंवा वस्तूंमधून सुख मिळते असे जोपर्यंत वाटते तोपर्यंत माणसाला भगवंताचे परमप्रेम लाभत नाही. आनंद मिळविण्याच्या इतर वस्तूंप्रमाणे भगवंत देखील आनंद देणारी वस्तु वाटतो. दृश्यातील प्रेम स्वार्थी आणि आकुंचित असते तर भगवंताचे प्रेम निःस्वार्थी व विशाल असते. माणसाच्या दृश्यासंबंधीच्या वासना भ्रमात्मक असतात. म्हणून वासना ठेवायचीच झाली तर ती भगवंताची प्राप्ती व्हावी अशी दिव्य वासना ठेवावी असे श्रीमहाराज सांगत असत. त्याचप्रमाणे सत्पुरुषांच्या संगतीची वासना

असावी. अशी वासना ठेवून भक्ती करणाऱ्या साधकाला घडते ते भगवंताच्या इच्छेने घडते अशी जाणीव होते. वासनांमुळे भगवंत दुरावतो हे त्याला समजते. म्हणून समर्थ रामदास सांगतात, "देवाचें जें मनोगत। तेंचि आपुलें उचित। इच्छेसाठीं भगवंत। अंतरूं नये कीं॥" दासबोध ४.८.२२॥ मग भक्त कामनारहित होतो. खऱ्या साधकाचे हे ध्येय असले पाहिजे.

इंद्रिये सुखाचे आमिष दाखवतात; म्हणून साधकाने विवेकाने इंद्रिये आवरली पाहिजेत. इंद्रियांपासून पूर्ण आणि शाश्वत सुख मिळणे कधीही शक्य नाही, कारण इंद्रियांची शक्ती मर्यादित, ज्या वस्तूंचा भोग घ्यावयाचा त्यांना मर्यादा, त्याचबरोबर स्थळाच्या व काळाच्या मर्यादा असल्यामुळे त्यांपासून पूर्ण सुख किंवा तृप्ती मिळू शकत नाही. म्हणून इंद्रियसुखाच्या मागे न लागता सर्व वासना भगवंताकडे वळवाव्या. नीतीविरुद्ध नसलेल्या लहान सहान वासना एकदा तृप्त कराव्या आणि त्यापासून सुख तरी काय मिळते याचा विचार करावा म्हणजे त्या क्षीण होऊन नंतर नाहीशा होतात. पण प्रपंचातील मोठ्या वासना विवेकानेच दूर केल्या पाहिजेत. या नकारात्मक भागाबरोबरच भगवंताचे प्रेम लाभावे म्हणून मनाच्या सर्व वृत्ती भगवंताकडे वळवाव्या. मरेपर्यंत भगवंताचे स्मरण राहू दे ही वासना ठेवावी. कामनारहित होणे ही याच्याही पुढची पायरी आहे. कारण वासना, अगदी शुभ वासना असल्या तरी त्या पूर्ण व्हाव्या म्हणून पुन्हा जन्म घ्यावा लागतो. पण भक्त कामनारहित झाला की तो जन्म मरणाचे चक्र भेदून जातो.

**अविच्छिन्नम्** : ज्याच्यामधील प्रवाह खंडित होत नाही ते अविच्छिन्न. प्रेमामध्ये कल्पना, भावना, विचार, चिंतन, स्मृती इत्यादी सर्व वृत्तींचा प्रवाह खंडित न होता प्रेमवस्तूकडे वहात असतो. थोडीशी जरी नावड असली तरी हा प्रवाह खंडित होतो. अखंड स्मरण राहाणे हे अविच्छिन्न प्रेमाचे लक्षण आहे. परमप्रेमामध्ये प्रेमवस्तूचा क्षणभरही विसर पडत नाही. देहाचे विस्मरण झाल्याखेरीज भगवंताचे अखंड स्मरण राहात नाही. म्हणून नारद अविच्छिन्नम् असे प्रेमाचे लक्षण सांगताना खरोखर भक्ताची देहबुद्धी नाहीशी झाल्याची अवस्था सांगतात. देहबुद्धी नाहीशी होऊन परमात्मा भक्ताच्या हृदयात स्थिर झाला की जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन्ही अवस्थात ते प्रेम भरते आणि मग भक्त चौथ्या म्हणजे तुरीय अवस्थेत जातो. तेथे प्रेमाला स्थल कालाच्या मर्यादा राहात नाहीत. ज्याप्रमाणे सर्व काळ, सर्व ऋतूंमध्ये गंगा सागराला भेटत राहाते तसे सर्व अवस्थांमध्ये भक्ताचे भगवंताविषयीचे प्रेम अनुस्यूत असते.

तीन नकारात्मक लक्षणांनंतर होकारात्मक लक्षणांचा विचार करताना प्रथम अनुभवरूपम् हे लक्षण पाहू.

**अनुभवरूपम्** : "प्रेम न ये सांगतां बोलतां दावितां। अनुभव चित्ता चित्त जाणे॥" असे तुकाराम महाराज भगवंताच्या प्रेमाबद्दल सांगतात. माणसाला देहाचेही सगळे अनुभव सांगता येत नाहीत तर सूक्ष्मतर प्रेमाचे अनुभव शब्दांनी सांगता येणे कसे शक्य आहे? म्हणूनच एक्कावन्नाव्या सूत्रात नारदानी प्रेमस्वरूप अनिर्वचनीय आहे असे सांगितले. बुद्धी शुद्ध होऊन परमात्म्याचा साक्षात्कार झाला की जो अनंत अपार आनंद होतो त्याचा अनुभव आणि परमप्रेमामुळे भक्ताला होणारा अपार आनंदाचा अनुभव शुद्ध बुद्धीमुळेच शक्य होतात. म्हणूनच ज्ञानेश्वर महाराजानी "जैसी दीपकळिका धाकुटी। परी बहु तेजातें प्रगटी। तैसी सद्बुद्धि हे थेकुटी। म्हणों नये॥" ज्ञानेश्वरी २.२३८॥ असे सांगितले आहे. अनुभव हीच सद्वस्तु (Reality) आहे. भव म्हणजे होणे. संसारात वस्तूंमध्ये सतत बदल होत असतो. त्या भवाच्या म्हणजे बदलाच्या अनु म्हणजे मागे जाणे म्हणजे अनुभव. सतत बदलणाऱ्या जगाच्या मागे जे शाश्वत तत्त्व (Reality) आहे ते जाणणे म्हणजे अनुभव. अनुचा दुसरा अर्थ व्यापून असणे. जो भवाला म्हणजे संसाराला व्यापून आहे तो अनुभव या अर्थानेही ईश्वरी प्रेम हे ब्रह्मस्वरूपच आहे.

इंद्रियांच्या सहाय्याने आपण जे अनुभव घेतो त्यांमध्ये अनुभव घेणारा आणि ज्या वस्तूचा अनुभव घ्यावयाचा ती वस्तू, भिन्न असतात. उदाहरणार्थ, 'मी झाड पहातो' या विधानात डोळ्यांच्या सहाय्याने पहाणारा मी झाडापासून वेगळा आहे. म्हणजेच द्रष्टा दृश्यापासून वेगळा आहे. पण अतींद्रिय अनुभवामध्ये अनुभव घेणारा आणि ज्याचा अनुभव घ्यावयाचा ते म्हणजे द्रष्टा आणि दृश्य वेगळे नसतात. उदाहरणार्थ, 'मी जिवंत आहे' या विधानात जिवंतपणाचा अनुभव आणि तो अनुभव घेणारा मी एकच आहे. भगवंताच्या प्रेमाचा अनुभव देखील तादात्म्याने येणारा अनुभव असतो. यालाच अपरोक्षानुभव असे म्हणतात. श्रीरामकृष्ण परमहंस कालीमातेची पूजा करताना काही वेळा इतके तदाकार होत असत की देवीला वाहण्यासाठी हातात घेतलेली फुले स्वतःच्याच मस्तकावर ठेवत! 'तुका झाला पांडुरंग' असा भक्त आणि भगवंताच्या ऐक्याचा तो आनंदस्वरूप प्रेमानुभव असतो असे नारद सांगतात.

**सूक्ष्मतरम्** : भगवत्प्राप्तीचे ध्येय निश्चित होऊन साधक चिकाटीने नामस्मरण करू लागला म्हणजे गाढ झोपेतही त्याचे नामस्मरण चालू राहते.

वास्तविक झोप ही अज्ञानाची अवस्था आहे. श्रीमहाराज म्हणतात की त्या अज्ञानाच्या अवस्थेत गुरुकृपेचा सुरुंग लागला की गुरुप्रेमाचा/ भगवत्प्रेमाचा झरा वर येतो. यालाच नाम आत जाणे किंवा नाम सूक्ष्मात जाणे म्हणतात. इंद्रियांचे सर्व व्यापार सद्गुरूंना अर्पण केल्याखेरीज ही अतींद्रिय अवस्था प्राप्त होत नाही. इंद्रियांचे सर्व व्यापार गुरूंना अर्पण करणे म्हणजेच देह प्रारब्धावर सोपवणे होय. हे होत नाही तोपर्यंत जप करताना देखील मनात येणारे सर्व विचार दृश्यातील असतात. देह प्रारब्धावर टाकला की नाम खोल सूक्ष्मात म्हणजे तीन्ही अवस्थात राहू लागते पण सूक्ष्मतर होण्यासाठी नाम म्हणजेच भगवंताचे प्रेम तुरीय अवस्थेत जावे लागते. गुरुकृपेने साधक त्या अवस्थेपर्यंत पोहोचला की तो सूक्ष्मतर अशा आनंदमय कोशात जातो. त्यामुळे त्याला भगवंताविषयी वाटणाऱ्या प्रेमात शांत, गंभीर आणि प्रसन्न भाव येतो. म्हणूनच सत्पुरुषांच्या संगतीत माणूस शांत होतो.

स्थूल वस्तू इंद्रियांनी जाणता येतात. उदाहरणार्थ देवाची मूर्ती डोळ्यांना दिसते; पण देव चर्मचक्षूंना दिसत नाही. त्यासाठी दृष्टी सूक्ष्मतर व्हावी लागते. विश्वरूप पहाण्यासाठी भगवंतानी अर्जुनाला दिव्य दृष्टी दिली. आत्मस्वरूपाची दृष्टी ही त्याच्याही पलीकडे म्हणजे सूक्ष्मतम असते. म्हणून येथे नारदानी सूक्ष्मतरम् म्हटले आहे. इंद्रियांचे अनुभव द्वैताचे असतात. पण भगवंताच्या प्रेमाचा अनुभव त्याच्या पलीकडे असतो. त्यात द्वैत राहात नाही म्हणून तो सूक्ष्मतरम् म्हणजे अधिक सूक्ष्म असतो.

**प्रतिक्षणवर्धमानम् :** माणसाचे ज्या व्यक्तीवर प्रेम असते तिच्यामध्ये त्याला सौंदर्य दिसते. त्यामुळे त्याचे मन प्रसन्न होते आणि त्या व्यक्तीविषयीची दोषदृष्टी नाहीशी होऊन दोषदेखील गुण दिसू लागतात. आईला तिच्या बाळाचे नाक नकटे न दिसता अपरे दिसते! तथापि लौकिक प्रेमात ज्या व्यक्तीवर प्रेम असेल ती व्यक्ती दूर गेली तर प्रेमाची तीव्रता कमी होते. पण भगवंताच्या प्रेमाला अशी अट नाही. ते प्रत्येक क्षणाला वाढत राहाते.

प्रतिक्षण या पदाने कालाची संकल्पना सूचित होते आणि वर्धमान पदाने प्रेमाचा जिवंतपणा स्पष्ट होतो. मूळ ब्रह्मस्वरूप केवळ सत् आहे. ज्ञानी माणूस सत् आणि चित् रूपात रमतो तर भक्ताला त्याच्या आनंद रूपात रमावेसे वाटते. परब्रह्माला जेव्हां मी आनंदमय आहे आणि हा आनंद भोगावा असे भान आले आणि एकोऽहं बहुस्याम असा त्याच्या ठिकाणी संकल्प झाला तेव्हा तो संकल्प प्रत्यक्षात आणताना काल सुरू झाला. काल ही ईश्वराची योजना

प्रत्यक्षात आणण्याची यंत्रणा आहे. ज्ञानाच्या अवस्थेत काल अखंड, पूर्ण व आनंदमय असतो. पण माणसाला अनंत कालाची कल्पना सहन होत नाही. त्याच्या अज्ञानामुळे तो खंडित होतो आणि त्याची क्षणमालिका बनते. माणूस या क्षणमालिकांची भूत, वर्तमान आणि भविष्य अशी विभागणी करतो.

ईश्वराच्या सृष्टीच्या निर्मितीत जिवंतपणा, नाविन्य व सृजनशीलता आहे. तिच्यामध्ये सतत वाढ आहे. त्यामुळे भगवंताच्या प्रेमामध्येही नाविन्य व सृजनशीलता आहे. दृश्यापासून होणाऱ्या आनंदाला कंटाळा असतो, विटणे असते. भगवंताच्या प्रेमाला ते लागू नाही. ते प्रेम अतींद्रिय आहे आणि त्याची गोडी सतत वाढते. साधकाला नामाची गोडी वाटू लागली की मुखातून येणारे प्रत्येक नाम नवे आणि अधिकाधिक आनंद देणारे असते. मग नाम आणखी घ्यावे, आणखी घ्यावे असे वाटू लागते. "लाभाचिया सोसे पुढे धांवे मन। धनाचा कृपण लोभी जैसा॥" असे या अवस्थेचे तुकाराम महाराजानी वर्णन केले आहे. साधक स्थूलातून सूक्ष्मात आणि सूक्ष्मातून सूक्ष्मतरात जाण्याचा अभ्यास करू लागला की नामाचे प्रेम प्रतिक्षणी वाढू लागल्याचा त्याला अनुभव येऊ लागतो. म्हणून साधकाने वैखरीतील नामापासून सुरुवात करावी. हा अभ्यास साधला की स्थूल आणि सूक्ष्म यांना जोडणाऱ्या मध्यमेमध्ये नाम चालू होते. नामाविषयी कोणताही संशय मनात न येऊ देता श्रद्धापूर्वक हा अभ्यास चालू ठेवला की नाम आणखी खोल पश्यन्तीमध्ये सुरू होते आणि साधकाला या प्रतिक्षणी वाढणाऱ्या प्रेमाचा अनुभव येतो.

अशा परमप्रेमाची प्राप्ती झाल्यावर भक्ताची अवस्था काय होते ते नारद पुढच्या सूत्रात सांगत आहेत.

## सूत्र पंचावन्नावे

**तत्प्राप्य तदेवावलोकयति तदेव श्रृणोति,**
**तदेव भाषयति, तदेव चिन्तयति ॥५५॥**

**तत्= तें (प्रेम) प्राप्य= प्राप्त झाल्यावर. तत् एव= तेंच (तें प्रेमच) अवलोकयति= पहातो. तत् एव= तेंच (तें प्रेमच) श्रृणोति= ऐकतो; तत् एव= त्या प्रेमाबद्दलच. भाषयति= बोलतो. तत् एव= त्या प्रेमाचेच. चिन्तयति= चिंतन करतो.**

**या परमप्रेमाचा लाभ झाल्यावर तो प्रेमी भक्त सर्वत्र ते प्रेमच पहातो, सर्वत्र ते प्रेमच ऐकतो, त्या प्रेमाबद्दलच बोलतो आणि (सर्व काळ) त्या प्रेमाचेच चिंतन करतो.**

**विवरण :** अनुभव घेणाऱ्या मी चा, ज्याचा अनुभव घ्यावयाचा त्याच्याशी संपर्क आला की अनुभव येतो. म्हणजे द्रष्ट्याचा दृश्याशी संबंध आला की दर्शन होते. भगवंताच्या दिव्य प्रेमाचा अनुभव आला की भक्ताची काय अवस्था होते ते या सूत्रात सांगितले आहे. हे सूत्र रचताना नारदांसमोर छान्दोग्य उपनिषदातील पुढील मंत्र असावा असे काही अभ्यासकांना वाटते. मंत्र असा :

यत्र नान्यत् पश्यति, नान्यच्छृणोति, नान्यद्विजानाति, स भूमा।
अथ यत्रान्यत्पश्यत्यच्छृणोत्यन्यद्विजानाति तदल्पम्।
यो वै भूमा तदमृतम् अथ यदल्पं तन्मर्त्यम्॥ छान्दोग्य उपनिषद् ७.२७.

(ज्या परम शुद्ध अवस्थेमध्ये आत्म्याला दुसरे काही दिसत नाही, दुसरे काही ऐकू येत नाही, दुसरे काही जाणता येत नाही तेव्हा त्याला अनंत भूमन् असे म्हणतात. जेव्हा दुसरे पहाता येते, ऐकता येते, जाणता येते तेव्हा त्याला अल्प म्हणतात. अनंत भूमन् मृत्यूच्या पलीकडे आहे तर अल्प मर्त्य आहे.)

परम प्रेमाचा लाभ म्हणजेच आत्मलाभ होय. त्या शब्दांनी न सांगता येणाऱ्या प्रेमाच्या प्राप्तीनंतर भक्त आणि भगवंत हे द्वैत मावळते. विश्वामध्ये केवळ भगवंतच भरून राहिलेला आहे, त्याच्याशिवाय दुसरे काही नाहीच अशी त्याची खात्री होते. माणसाचे मन जेथे चिकटलेले असते तेच त्याला सर्वत्र दिसते. श्रीमहाराज एक गोष्ट सांगत असत. एक व्यापारी होता. साहजिकच त्याच्या मनात नेहमी पैशाचा विचार असे. एकदा तो आजारी पडला म्हणून त्याला एका हॉस्पिटलमध्ये ठेवले. योग्य ते औषधोपचार होऊन काही दिवसात त्याला थोडे बरे वाटू लागले. एक दिवस त्याचा एक मित्र त्याला भेटावयाला गेला. आता प्रकृती कशी आहे म्हणून विचारल्यावर आजारी व्यापारी म्हणाला, 'बारा आणे सुधारणा आहे!' अशा प्रकारे प्रकृतीची सुधारणा देखील त्याने आणेवारीत म्हणजे पैशातच मोजली. भगवंताचे प्रेम अंतःकरणात भरल्यानंतर भक्त सगळीकडे भगवंताचा अनुभव घेतो. त्याचे मन भगवद्गुण श्रवण कीर्तनात रमते आणि दुसरे काही पहाण्याची, बोलण्याची, ऐकण्याची इच्छा त्याला रहात नाही. समर्थ रामदास पंढरपुरला विठ्ठल मंदिरात गेले तेव्हा तेथे विटेवर उभी असलेली पांडुरंगाची मूर्ती पहाताना त्यांना आठवण श्रीरामाची झाली. श्रीमहाराजांचे श्रेष्ठ भक्त श्री. भाऊसाहेब केतकर श्रीरामाच्या, मारुतीच्या, महादेवाच्या, श्रीदत्ताच्या अशा कोणत्याही मंदिरात गेले तरी 'महाराज' म्हणून त्या त्या देवाला नमस्कार करत असत कारण त्यांचे चित्त श्रीमहाराजांनी

पूर्णपणे व्यापलेले होते. पहाणे, बोलणे, ऐकणे इत्यादी क्रियांचा भगवंत हा एकमेव विषय झाला की भक्त अहोरात्र भगवंताच्या चिंतनात रमतो. अर्थात हे होण्यासाठी त्याच्या अंतःकरणात भगवंताचा विचार स्थिर व्हावा लागतो. एकच विचार मनात टिकविणे सोपे नाही. तथापि आपले विचार शब्दरूप असतात म्हणून भगवंताचे नाम एकसारखे घेतले तर मनात सतत भगवंताचा विचार राहू लागतो. ज्ञानेश्वर महाराज हरिपाठात सांगतात की "नामाविण तत्त्व नाहीं रे अन्यथा। वायां आणिका पंथा जासी झणी॥" अंतःकरण भगवंताने भरून गेले की भक्त जे जे कर्म करतो ते ते भगवंताची पूजाच होते. जिधर देखे उधर तूही तू अशी किंवा एकनाथ महाराजांनी म्हटल्याप्रमाणे जागत राम, सोवत राम अशी भक्ताची अवस्था होते आणि भगवंतालाही त्याच्या नित्य सहवासाची ओढ निर्माण होते. भक्तीमुळे म्हणजेच प्रेमदर्शनाने द्वैत मावळते.

## ३.२ : गौणी भक्ति

### सूत्र छप्पन्नावे

**गौणी त्रिधा गुणभेदादार्तादिभेदाद्वा ॥५६॥**

**गौणी= गौण, दुय्यम प्रतीची. त्रिधा= तीन प्रकारची. गुणभेदात्= (सत्त्व, रज आणि तम या) तीन प्रकारांच्या भेदामुळे. आर्तादिभेदात्= (आर्त, जिज्ञासू आणि अर्थार्थी या) आर्त इत्यादी तीन प्रकारांच्या भेदामुळे. वा = किंवा, अथवा.**

**सत्त्व, रज, आणि तम या तीन प्रकारांच्या भेदामुळे किंवा आर्त, जिज्ञासू आणि अर्थार्थी या तीन प्रकारांच्या भेदामुळे गौण भक्तीचे तीन प्रकार होतात - करता येतात.**

**विवरण** : मुख्य भक्तीची व्याख्या, तिचे स्वरूप, लक्षणे, साधने इत्यादींविषयी सांगितल्यानंतर आता नारद गौण भक्तीविषयी सांगत आहेत. गौण म्हणजे दुय्यम किंवा कनिष्ठ. गौण हा सापेक्ष शब्द आहे. जे प्रधान अथवा मुख्य नाही ते गौण. त्याचप्रमाणे गुणांनी, अर्थात त्रिगुणांनी युक्त आहे ते गौण कारण त्याच्यावर त्रिगुणांची बंधने येतात. साधकाने गौण भक्तीचे स्वरूप जाणून आपल्या भक्तीतील गौणता नाहीशी होऊन ती मुख्य भक्ती व्हावी म्हणून दोन्ही प्रकारच्या भक्तीतील भेद लक्षात घ्यावा आणि आपली भक्ती दोषरहित करण्याचा प्रयत्न करावा. गौणी भक्ती उपाधीरहित असूच शकत नाही कारण प्रकृतीपासून गुण निर्माण होतात आणि प्रकृतीतून निर्माण होणाऱ्या सर्व

जीवांना ते बांधतात. हे बंधन अथवा उपाधी तीन प्रकारची असते. भगवंत म्हणतात, ''सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसम्भवाः। निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम्॥'' भगवद्गीता १४.५॥ (हे महाबाहो अर्जुना, सत्त्वगुण, रजोगुण व तमोगुण असे हे प्रकृतीपासून उत्पन्न झालेले तीन गुण अविनाशी जीवात्म्याला शरीरात बांधून ठेवतात.) म्हणून ज्यांची देहबुद्धी अद्यापि दृढ आहे पण ज्यांच्या हृदयात भगवत् प्रेमाचा अंकुर उगवला आहे त्यांची भक्ती त्रिगुणांच्या प्रभावामुळे गौण ठरते. या गौण भक्तीमध्येही तमोगुणी भक्तिपेक्षा रजोगुणी भक्ती श्रेष्ठ आणि रजोगुणी भक्तीपेक्षा सत्त्वगुणी भक्ती श्रेष्ठ असते. कारण ''सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च। प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च॥'' भगवद्गीता १४.१७॥ (सत्त्वगुणापासून ज्ञान उत्पन्न होते व रजोगुणापासून निःसंशय लोभ उत्पन्न होतो. त्याचप्रमाणे तमोगुणापासून प्रमाद व मोह हे उत्पन्न होतात आणि अज्ञानही उद्‌भवते.)

समर्थ रामदास सांगतात, ''मुळीं देह त्रिगुणाचा। सत्त्वरजतमाचा। त्यामध्यें सत्त्वाचा। उत्तम गुण ॥ १ ॥ सत्त्वगुणें भगवद्भक्ती। रजोगुणें पुनरावृत्ती। तमोगुणें अधोगति। पावति प्राणी ॥ २ ॥'' दासबोध २.५॥ गौणी भक्ती गुणभेदानुसार तीन प्रकारची किंवा आर्तादि भेदानुसार तीन प्रकारची असते. भगवद्गीतेत भगवंतानी आर्तादि चार भेद सांगितले आहेत. त्यांपैकी पहिल्या तीन भेदांचा गौणी भक्तीत समावेश होतो. भगवंत सांगतात, ''चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन। आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ॥'' भगवद्गीता ७.१६ ॥ (हे भरतवंशातील श्रेष्ठ पुरुषा अर्जुना! आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी आणि ज्ञानी असे चार प्रकारचे पुण्यशील भक्तजन मला भजतात.)

आपण पाहिले की सत्त्वगुणाने सुखमयता, रजोगुणाने भोगांविषयी आणि कर्मांविषयी प्रवृत्ती व आसक्ती आणि तमोगुणामुळे ज्ञानावर झाकण येऊन प्रमाद, मोह व आळस यात माणूस गुरफटतो. प्रत्येक व्यक्तीमध्ये या तीन गुणांचे मिश्रण असते आणि या तीन्हींपैकी जो गुण व्यक्तीमध्ये अधिक प्रमाणात असेल त्यानुसार ती व्यक्ती सात्त्विक, राजसिक किंवा तामसिक वृत्तीची असते. तमोगुणी माणसाला ज्ञानमार्ग शक्य नसतो. पण पण भक्तिमार्गाचे वैशिष्टच असे की त्याचे आचरण कोणीही करू शकतो. सुरुवातीला जरी त्याची भक्ती तामसिक असली तरी तिच्यामुळेच त्याच्यामध्ये रजोगुणाची वाढ होते आणि तो राजसिक भक्ती करू लागतो. त्या जन्मात अगर पुढच्या जन्मात राजसिक भक्तीतून सात्त्विक भक्तीचा उदय होतो. सात्त्विक भक्तीमुळे तो जेव्हा शुद्धसत्त्व होतो तेव्हाच सिद्ध बनतो.

सिद्ध भक्ताची जी लक्षणे सांगितलेली आहेत ती अर्थातच गौण भक्ती करणाऱ्याच्या ठिकाणी नसतात. ज्या भक्तीमध्ये मुख्य भक्तीची लक्षणे आढळत नाहीत ती भक्ती गौण किंवा गौणी असे म्हणता येईल. या दृष्टीने मुख्य भक्तीची व गौण भक्तीची तुलना केली तर -

(१) मुख्य भक्ती परमप्रेमरूपा असते तर गौण भक्ती प्रेमरूपा असते. अद्यापि साधकाला भगवंताविषयी खरे प्रेम वाटत नसते पण साधन करू लागल्यावर ते प्रेम यावे असे त्याला वाटू लागते.

(२) मुख्य भक्ती गुणरहित म्हणजे तीन्ही गुणांच्या पलीकडची असते. त्या भक्तीमध्ये प्रेमास्पदाच्या विशिष्ट गुणांचे असे आकर्षण नसते. पण गौण भक्तीमध्ये भक्त त्रिगुणात असतो आणि प्रेमास्पदाच्या गुणांमुळेच त्याला इष्टाचे आकर्षण वाटत असते. उदाहरणार्थ, रजोगुणी भक्ताला कौरव पांडवांच्या युद्धात श्रीकृष्णाने पांडवांचे कसे रक्षण केले ते आठवून त्याच्याबद्दल प्रेम वाटू लागेल तर सात्त्विक भक्ताला त्याने गीतेत सांगितलेल्या भक्तियोगाचे आकर्षण वाटून त्याचे भगवंताविषयी प्रेम वाढेल.

(३) मुख्य भक्ती कामनारहित असते. भक्ताच्या अंतःकरणात कोणत्याही लौकिक इच्छा राहिलेल्या नसतात. देहसुखाच्या बाबतीत तो उदासीन असतो. गौण भक्ती सकाम असते. आपल्यावर आलेली संकटे दूर करून भगवंताने अपाल्याला सुख समृद्धि द्यावी असे साधकाला वाटत असते.

(४) मुख्य भक्ती अविच्छिन्न असते. त्या भक्तीमध्ये भगवत् प्रेमाचा प्रवाह कधीही खंडित होत नाही. त्यामुळे भक्ताला भगवंताचा क्षणभरही विसर पडत नाही. जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती या तीन्ही अवस्थांमध्ये भगवंत भक्ताच्या हृदयामध्ये स्थिर झालेला असतो. गौणी भक्तीमध्ये ही उत्कटता नसते. सुरुवातीला साधकाला भगवंताचा वारंवार विसर पडतो. अभ्यासाने तो विसर कमी होऊ लागतो. तथापि जागेपणीही काही काळ स्मरण आणि बराच काळ विस्मरण अशी त्याची खंडित भक्ती असते.

(५) मुख्य भक्तीमध्ये प्रतिक्षणी भक्ती वाढते आणि तिच्यामध्ये प्रतिक्षणी नवेपणा असतो. त्यामुळे भक्ताला कधीही कंटाळा येत नाही. गौण भक्तीत कधी उत्साह तर कधी निरुत्साह, काही काळ चांगले नामस्मरण तर काही काळ रटाळपणा अशी साधकाच्या भक्तीची तऱ्हा असते.

(६) मुख्य भक्तीमध्ये दृश्याचे प्रेम नाहीसे झालेले असते तर गौण भक्तीमध्ये साधक दृश्याच्या प्रेमामुळे भगवंताकडे वळतो.

(७) मुख्य भक्तीत भक्ताला भगवंताचा साक्षात्कार होतो. हा अनुभव बुद्धीच्या कक्षेच्याही पलीकडचा असतो. गौण भक्तीमध्ये साधक अजून मनाच्या आणि बुद्धीच्या प्रांतातच असतो. त्यामुळे त्याला भक्तीचा खरा अनुभव नसतो. काही वेळा तर काही वाचून, ऐकून व कल्पनेने साधकाला भ्रामक अनुभव येतात. तथापि सद्गुरूंचे मार्गदर्शन असेल तर तो भ्रामक अनुभवात गुंतून राहात नाही.

(८) मुख्य भक्तीत भक्ताचा प्रपंचातील रस नाहीसा झालेला असतो. एका भगवंताखेरीज दुसऱ्या कशातही त्याचे मन रमत नाही. गौण भक्तीत साधकाला अद्यापि प्रपंचाची गोडी असते येवढेच नव्हे तर प्रपंच चांगला व्हावा म्हणून तो भगवंताकडे वळलेला असतो.

(९) मुख्य भक्तीमध्ये शरीर, मन, वाणी इत्यादींद्वारा होणाऱ्या भक्ताच्या सर्व क्रिया भगवंतासाठी आणि भगवंताच्या चरणीं समर्पित असतात. भगवंताचे क्षणभराचे विस्मरणही तो सहन करू शकत नाही. गौण भक्तीत या गोष्टींचा अभाव असतो. या दृष्टीने पहाता मुख्य भक्ताच्या ठिकाणी असणारी भगवंताविषयीची तळमळ गौण भक्तीत नसते. ज्या प्रमाणात साधकाची तळमळ वाढू लागते त्या प्रमाणात गौण भक्ताची मुख्य भक्तीकडे प्रगती होऊ लागते.

भगवद्गीतेत सांगितलेल्या आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी आणि ज्ञानी भक्तांपैकी ज्ञानी भक्ताची भक्ती ही मुख्य भक्ती असून पहिल्या तीन गौण आहेत. आर्त म्हणजे संकटात सापडलेला. प्रपंचात अनपेक्षितपणे एखादे मोठे संकट कोसळले तर व्यवहारातील उपायांचे तोकडेपण माणसाच्या लक्षात येते. अशा वेळी एखाद्या सत्पुरुषाची भेट झाली तर माणूस भगवंताकडे वळतो. खऱ्या तळमळीने भगवंताला हाक मारली तर भगवंत द्रौपदीचे रक्षण करण्यासाठीच धावतो असे नाही तर गजेन्द्रालाही बंधनमुक्त करतो. मगरीबरोबरच्या युद्धात चार प्रहर लोटले आणि ''कान नाक डूब गयो। अब तो जीवन हारे।'' अशी स्थिती होऊन 'हे गोविंद हे गोपाल' म्हणून त्याने आकांत करताच धावून भगवंतानी त्याचे रक्षण केले. असे असले तरी जोपर्यंत भगवंताविषयीचे प्रेम भक्ताच्या हृदयात स्थिर होत नाही तोपर्यंत आर्त भक्ती दुय्यमच ठरते.

जिज्ञासू भक्त बुद्धिप्रधान असतो. त्याला भगवंताचे स्वरूप जाणून घेण्याची इच्छा असते. शास्त्र-ज्ञान झाले, अध्यात्म-तत्त्व समजले म्हणजे भगवंताचे दर्शन होईल असे जिज्ञासू भक्ताला वाटते. परमात्मा कसा आहे ते कळावे,

त्याचे प्रेम म्हणजे काय, त्याचा व माझा कोणता संबंध आहे, त्याने हे जग का आणि कसे केले यांसारख्या प्रश्नांची उत्तरे तो शोधत असतो. अभ्यासामुळे त्याला शब्दज्ञान चांगले होते. काही वेळा आपल्याला ज्ञान झाले असा त्याला भ्रम होतो आणि अहंकार वाढतो. अपरोक्षानुभूति झालेली नसल्याने त्याचे ज्ञान त्याला समाधान देऊ शकत नाही. त्यामुळे जिज्ञासेपोटी भगवंताकडे वळलेल्या साधकाची भक्ती गौण ठरते.

अर्थार्थी भक्ती हा गौण भक्तातील सर्वात कनिष्ठ प्रकार असला तरी बहुसंख्य माणसांची भक्तीची सुरुवात भगवंताकडे मागण्यापासूनच होते. अशा लोकांचा देवाशी देण्याघेण्याचा व्यवहार असतो. मुलाला परीक्षेत फर्स्टक्लास मिळाला तर सत्यनारायण करीन असे तो देवाला सांगतो. तसे झाले तर धूमधडाक्यात सत्यनारायणाची पूजा करतो. पण तसे झाले नाही तर देवात आता काही अर्थ राहिला नाही असे म्हणण्याचीही त्याची तयारी असते. पण या प्रकारातल्या भक्तांनाही ते जे जे मागतील ते ते खरोखर त्यांच्या प्रारब्धाने मिळत गेले तर भगवंताकडे किती मागायचे अशी स्वतःचीच लाज वाटू लागते तर काहींच्या बाबतीत मागायचे झाले तर भगवंताजवळच मागेन, इतर कोणापुढेही हात पसरणार नाही अशी निष्ठा निर्माण होते. त्यामुळे ते पुढे काम्य भक्तीतून निष्काम भक्तीची वाटचाल करू लागतात.

आता पुढच्या सूत्रात नारद या गौण भक्तीच्या तीन प्रकारांची क्रमवारी सांगतात.

## सूत्र सत्तावन्नावे

**उत्तरस्मादुत्तरस्मात्पूर्वपूर्वा श्रेयाय भवति ॥५७॥**

**उत्तरस्मात् उत्तरस्मात्= उत्तरोत्तर (नंतरच्या प्रकारांपेक्षा) पूर्वपूर्वा= आधी आधीच्या प्रकारांची भक्ती. श्रेयाय भवति= जास्त कल्याणकारी होते.**

**भक्तीच्या या तीन प्रकारांमध्ये आधीचे (आधी सांगितलेले) प्रकार हे नंतरच्या प्रकारांपेक्षा उत्तरोत्तर जास्त कल्याणकारी होतात.**

**विवरण** : कठोपनिषदात श्रेय व प्रेय असे दोन शब्द आलेले आहेत. सामान्य संसारी माणूस या दोहोंपैकी प्रेय म्हणजे देहसुख देणारे पसंत करतो. प्रेय हे तात्पुरते इंद्रियसुख देते तर श्रेय शाश्वत कल्याणकारी असते. श्रेय मिळविण्यासाठी प्रेयाचा त्याग करावा लागतो. नारद या सूत्रात सांगतात की

मागच्या सूत्रात गौण भक्तीचे जे सात्त्विक, राजसिक व तामसिक प्रकार सांगितले त्यांमध्ये तामसिक भक्तीपेक्षा राजसिक भक्ती आणि तिच्यापेक्षा सात्त्विक भक्ती अधिक कल्याणकारी असते. त्याचप्रमाणे अर्थार्थी भक्तीपेक्षा जिज्ञासू भक्ती आणि तिच्यापेक्षा आर्त भक्ती जास्त मंगलकारी असते.

मुख्य भक्तीला देशकालाचे बंधन नसते. गौण भक्ती मात्र देशकालानी बद्ध असते. भक्तीसोपानात तमोगुणी भक्त सर्वात खालच्या पायरीवर आणि अशुद्ध असतो. रजोगुणी भक्त शुद्ध अशुद्धाचे मिश्रण असतो तर सत्त्वगुणी भक्त शुद्ध असतो. तमोगुणी पण भक्तिमार्गाला लागलेला माणूस तमोगुणी असला तरी भक्त असतो. तो संसारासाठी भक्ती करतो. त्यातूनच तो पुढे रजोगुणी व सत्त्वगुणी होण्याची शक्यता असते. तसेच अर्थार्थी भक्त वरच्या जिज्ञासू भक्ताच्या पायरीवर आणि तेथून आर्त भक्ताच्या पायरीवर चढतो. सात्त्विक भक्त शुद्ध सात्त्विक झाला किंवा आर्त भक्त ज्ञानी भक्त झाला म्हणजे त्याची भक्ती गौण न राहता मुख्य भक्ती होते.

तमोगुणी साधकाची भक्ती सकाम असते. तो अर्थार्थी असतो. प्रपंच आणि प्रपंचातील वस्तूंच्या भोगाचे त्याला आकर्षण असते. त्यामुळे उत्तमोत्तम भोग मिळावे म्हणून तो भगवंताकडे वळतो.

रजोगुणी साधकाला प्रपंच आणि भगवंत दोन्ही पाहिजे असतात. तथापि विचाराने आणि अनुभवाने प्रपंचाच्या अपूर्णतेची त्याला जाणीव झालेली असते. त्यामुळे भगवंत मिळावा म्हणून तो मर्यादित त्याग करतो. हे करत असताना भगवंत ठेवेल तसे राहून त्यात समाधान टिकवले पाहिजे याची त्याला हळूहळू जाणीव होते.

सत्त्वगुणी साधकाची भक्ती निष्काम असते. त्याला भगवंतासाठीच भगवंत पाहिजे असतो. प्रपंचात रहात असला तरी त्याची प्रपंचाची आसक्ती सुटलेली असते. त्यामुळे त्याच्या अंगी खरा त्याग आणि खरे वैराग्य आलेले असते.

तामसी भक्तीपेक्षा रजोगुणी भक्ती आणि तिच्यापेक्षा सत्त्वगुणी भक्ती जास्त कल्याणकारक असली तरी हे तीन्ही प्रकार गौण भक्तीचे आहेत. स्थूलमानाने या पायऱ्या अशा : (१) जागे होणे, म्हणजेच जीवनाचे ध्येय निश्चित ठरणे. (**Awakening of the self**- नित्यानित्यविवेक) (२) दुसऱ्या पायरीवर ध्येय साधण्यासाठी काय केले पाहिजे आणि काय टाळले पाहिजे हे लक्षात येते आणि साधकाला त्याच्या दोषांची जाणीव होते. आणि (३) तिसऱ्या पायरीवर दोष नाहीसे करण्याचा तो प्रयत्न करू लागतो. गुरुदेव रानडे यांनी या पायरीला

सद्गुणांचा अभ्यास (The purification of the self) म्हणजेच चित्तशुद्धि म्हटले आहे. ह्या अभ्यासात काही वेळा तो यशस्वी होतो तर काही वेळा त्याच्या पदरी अपयश येते आणि त्यातून शरणागतीचा उदय होतो. "माझे मज कळों येती अवगुण। काय करूं मन अनावर ॥ १ ॥ आतां आड उभा राहे नारायणा। दयासिंधूपणा सार्थ करी ॥ २ ॥" असे तो विनवू लागतो. त्याची तळमळ आणि त्याचबरोबर भगवंताचे अनुसंधान वाढू लागते आणि चित्तशुद्धी होते.

ध्येय निश्चित ठरून चित्तशुद्धी झाली की त्यानंतर खरी अंतर्यात्रा सुरू होते. पूजा, भजन, तीर्थयात्रा, ग्रंथवाचन, प्रवचन ही सगळी भक्तीला सहाय्यभूत असली तरी ती भक्तीचे बाह्यांग आहेत. त्यामुळे त्यांच्यापैकी एक अथवा अनेक करूनही त्यामधून भगवंताविषयी प्रेम आणि भगवंताच्या प्राप्तीची तळमळ निर्माण झाली नाही तर भक्त अंतर्मुख होत नाही. पण या सहाय्यभूत गोष्टींमुळे जर त्याचे भगवत्प्रेम वाढले आणि भगवत्दर्शनाची तळमळ निर्माण झाली तर भक्त आत पाहू लागतो व त्याला अनुसंधान साधते. अनुसंधान राहू लागले की त्यातूनच धारणा आणि ध्यान या पायऱ्या येतात. ध्यानामध्ये भक्त आणि परमात्मा दोघेच राहातात. हाच खरा एकांत होय. शेवटी समाधीत भक्ताचा 'मी' नाहीसा होऊन केवळ परमात्मा राहातो. "तुका झाला पांडुरंग" अशी ती अवस्था असते. अशा प्रकारे गौण भक्तीपासून सुरुवात होऊन साधक हळूहळू गौण भक्तीच्या पायऱ्या चढत चढत मुख्य भक्तीच्या प्रांतात प्रवेश करतो. त्या मुख्य म्हणजे परमप्रेमा भक्तीची लक्षणे नारदानी पूर्वीच सांगितली आहेत.

## ३.३ : भक्तीचे वैशिष्ट्य -सोपेपणा

## सूत्र अठ्ठावन्नावे

**अन्यस्मात् सौलभ्यं भक्तौ ॥५८॥**

**अन्यस्मात्= दुसऱ्या साधनांपेक्षा-मार्गांपेक्षा. सौलभ्यं= सुलभता-सोपेपणा, भक्तौ= भक्तिमार्गात.**

**दुसऱ्या मार्गांपेक्षा भक्तिमार्गात जास्त सोपेपणा आहे. (अन्य मार्गांपेक्षा भक्तिमार्ग सोपा आहे.)**

**विवरण** : कर्मयोग, ज्ञानयोग, अष्टांगयोग यांच्यापेक्षा परमप्रेमरूपा भक्ती श्रेष्ठ आहे असे नारदानी पंचविसाव्या सूत्रात सांगितले. (सा तु कर्मज्ञानयोगेभ्योऽप्यधिकतरा॥). आता भगवत्प्राप्तीच्या अथवा आत्मदर्शनाच्या

इतर मार्गापेक्षा भक्तिमार्ग सोपा आहे असे ते सांगतात. इतर मार्गापेक्षा भक्तिमार्ग श्रेष्ठ असण्याचे त्याचा सोपेपणा हे एक महत्त्वाचे कारण आहे.

हठयोग अथवा कुंडलिनी योगामध्ये साधक प्रथम अनेक योगक्रिया, आसने इत्यादी करून शरीरावर आणि प्राणांवर ताबा मिळवितो व त्यानंतर मनावर ताबा मिळवितो. पातंजल योगामध्ये साधक मनावर ताबा मिळवून त्याद्वारे शरीरावर ताबा मिळवितो. हे दोन्ही योग सर्वसामान्य प्रापंचिक माणसाला आचरणात आणणे शक्य नसते कारण त्यासाठी विशिष्ट जीवन पद्धतीचा स्वीकार करावा लागतो. भगवद्गीतेमध्ये म्हटले आहे की ''युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु। युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा''॥६.१७॥ (दुःखाचा नाश करणारा हा योग यथायोग्य आहार व विहार करणाऱ्याला कर्मामध्ये यथायोग्य प्रयत्न करणाऱ्याला तसेच यथायोग्य झोपणाऱ्याला आणि जागे राहाणाऱ्यालाच साध्य होतो.) ज्ञानेश्वर महाराज सांगतात, ''आहार तरी सेविजे। परी युक्तीचेनि मापें मविजे। क्रियाजात आचरिजे। तयाचि स्थिती॥६.३४९॥ मपितलां बोलीं बोलिजे। मितलां पाउलीं चालिजे। निद्रेही मानु दीजे। अवसरें एकें''॥६.३५०॥ म्हणून या दोन्ही मार्गांनी जाणे अवघड आहे.

ज्ञानयोगाची सुरुवातच साधनचतुष्ट्याने होते. साधक वैराग्यशील असावा लागतो. विरक्तीवाचून कांहीं। ज्ञानासी तगणें नाहीं। ज्ञानयोगात बुद्धीला महत्त्व असून बुद्धीला जे पटेल ते साधकाने आचरणात आणावे लागते. अशी तयारी असणारे क्वचितच आढळतात. कर्मयोग ज्ञानयोगापेक्षा सोपा वाटला तरी सर्वसाधारण माणूस फळ मिळविण्याच्या हेतूनेच कर्म करण्याला प्रवृत्त होतो. अतृप्त वासना माणसाला कर्म करावयाला लावतात. म्हणून फलाशारहित कर्म करणे अतिशय अवघड आहे. गायत्री मंत्रासारख्या वेगवेगळ्या मंत्राचे लोक अनुष्ठान करतात. तथापि त्यासाठी आवश्यक असणारे बाह्य व मनाचे पावित्र्य आसपासच्या भोगमय वातावरणात ठेवणे कठीण असते. त्यामुळे मंत्र सिद्ध होणे अवघड असते. शिवाय ज्ञानमार्गात आणि मंत्रांमध्ये निपुणता येऊ लागली की साधकाचा अहंकार वाढू लागतो आणि त्यामुळे भगवत्प्राप्ती दूर राहते. श्रीमहाराज म्हणत की भगवंताला एक वेळ व्यसनी माणूस चालतो पण अहंकारी माणूस अजिबात सहन होत नाही.

भगवत्प्राप्तीच्या इतर मार्गांशी तुलना करता भक्तिमार्ग हा सहज आणि सुलभ आहे. भगवंतानी भक्तीला राजविद्या म्हटले आहे. विद्या, संपत्ती, कुल, वर्णाश्रम,

वेदाध्ययन, कठोर तपश्चर्या इत्यादींची भक्तीला अपेक्षा नाही. अर्जुनाला विश्वरूप दाखविल्यानंतर भगवंत म्हणाले की तू जसे मला पाहिलेस तशा माझ्या विश्वरूपाचे दर्शन वेदाध्ययन, तप, दान, यज्ञ इत्यादींनी मिळणे शक्य नाही. केवळ तुझ्या भक्तीमुळेच तू मला या रूपात पाहू शकलास. म्हणून भक्तीला अपेक्षा आहे भगवंताविषयी वाटणाऱ्या प्रेमाची. विद्वान-अडाणी, धनवान-भिकारी, स्त्री-पुरुष, बाल-युवा-वृद्ध इत्यादी सर्वजण वस्तूंवर आणि व्यक्तींवर प्रेम करतात. प्रेम म्हणजे काय ते शब्दांनी सांगता आले नाही तरी प्रत्येकाला प्रेमाचा अनुभव असतो, आणि अनुभव ही परमार्थाच्या मार्गातील अतिशय महत्त्वाची गोष्ट आहे. यालाच समर्थ प्रचीति म्हणतात. प्रपंचात माणसाला वाटणाऱ्या प्रेमाचा देह हा आधार असतो. पारमार्थिक प्रेम देहाची मर्यादा ओलांडते. प्रपंचामधील आसक्ति भगवंताकडे वळविली की भक्ति होते. त्यासाठी प्रपंचातील प्रत्येक गोष्टीत भगवंताला पहावयाचा अभ्यास करावा लागतो. प्रेम सहज म्हणजे जन्माबरोबरच असते. तो जीवाचा स्वभाव असतो. आई, वडील, भाऊ, बहिणी, घरातील इतर माणसे यांच्यावर प्रेम करणाऱ्या जीवाचे प्रेमाचे क्षेत्र व्यापक होऊ लागते. पण या प्रेमात स्वार्थ असल्यामुळे प्रेमातून निर्माण होणाऱ्या दुःखाचाही त्याला अनुभव येतो. मानवी संबंधातील अनिश्चितता आणि क्षणभंगुरता जाणवू लागली म्हणजे ईश्वराच्या कृपेने जीवाचा भ्रम नाहीसा होऊन त्याचा प्रेम प्रवाह भगवंताकडे वाहू लागतो. भगवंतही भक्ताच्या प्रेमाला लालचावलेला असतो. त्यामुळे तुकाराम महाराजांनी म्हटल्याप्रमाणे "प्रेमसूत्र दोरी। नेतों तिकडे जातो हरी॥" अशा प्रकारे भगवंतावर प्रेम करणाऱ्या आणि त्याला सर्वभावें शरण जाणाऱ्या कोणालाही त्याची प्राप्ती होते. म्हणून इतर मार्गापेक्षा भक्ती सोपी आहे असे नारद सांगतात. भक्तिमार्गात भगवंत आहे, तो माझा त्राता आहे, हितकर्ता आहे, सर्व काळ, सर्व ठिकाणी माझ्याबरोबर आहे अशा प्रकारचा अस्तित्वभाव जागा रहाण्यासाठी अखंड नामस्मरण हाच उपाय आहे आणि तो सर्वांना सहजसाध्य आहे असे श्रीमहाराज सांगतात. ते म्हणतात की ब्रह्माला जुळें झालें; नाम आणि प्रेम. जिथें भगवंताचें प्रेम आहे तिथें मुखीं नाम येईलच; आणि जो भगवंताचे अखंड नाम घेतो त्याच्या हृदयांत भगवंताचें प्रेम निर्माण होते यात शंका नाहीं.

भगवद्गीतेत भगवंत सांगतात की मी सर्व प्राणिमात्रांचा सुहृद म्हणजे स्नेही आहे. जेव्हा कोणीही हे जाणतो तेव्हा त्याला शांतीचा लाभ होतो. साधनामुळे

तमोगुण कमी होऊ लागला म्हणजे तामसी भक्ताची ईश्वरासंबंधीची कल्पना बदलते. त्याची भक्ती सकाम असली तरी भगवंताच्या कृपेशिवाय केवळ आपल्या कर्तेपणाने काहीही साध्य होत नाही हे त्याला समजते. हळूहळू, मिळणाऱ्या गोष्टींची अपूर्णताही मनात ठसते आणि भगवंतासाठीच भगवंत हवा असे त्याला वाटू लागते. त्यानंतर भगवंत माझा आहे असे न म्हणता मी भगवंताचा आहे असे वाटू लागून तो भक्तिमार्गावर स्थिर होतो. योग्याप्रमाणे भक्ताची देखील एक जीवन पद्धति असते. त्यासाठी घरदार सोडावे न लागता त्याच्या जीवनात हळूहळू परिवर्तन घडते. भगवंतावरील प्रेमामुळे हे परिवर्तन होताना होणारे विवेक वैराग्याचे कष्ट त्याला जाणवत नाहीत. उदाहरणार्थ, हठयोग साधणाऱ्याला तामस आहार वर्ज करावा लागतो तर भक्त अशा पदार्थांचा नैवेद्य माझ्या गुरूंना अथवा भगवंताला आवडणार नाही म्हणून त्यांचे सेवन करणे सोडून देतो.

भक्ती सोपी का आहे याचे दुसरे कारण नारद पुढील सूत्रात सांगत आहेत.

## सूत्र एकोणसाठावे

**प्रमाणान्तरस्यानपेक्षत्वात् स्वयं प्रमाणत्वात् (च) ॥५९॥**

**प्रमाण - अन्तरस्य= स्वतःशिवाय दुसऱ्या प्रमाणाचा-पुराव्याच्या अनपेक्षत्वात्= अपेक्षेच्या अभावामुळे. स्वयम्= स्वतःच. प्रमाणत्वात्= प्रमाण किंवा पुरावा असल्यामुळे. च= आणि.**

**भक्ति दुसऱ्या कोणत्याही प्रमाणावर म्हणजे पुराव्यावर अवलंबून नाही (आणि) ती स्वतःसिद्ध आहे. (भक्ति प्रेम हेच भक्तीचे प्रमाण आहे) म्हणून ती इतर मार्गांपेक्षा सोपी आहे.**

**विवरण :** कर्मयोग, ज्ञानयोग आणि अष्टांगयोग यांच्याशी तुलना करताना मागे २६व्या सूत्रात नारदानी भक्ती ही फलरूपा असल्यामुळे श्रेष्ठ आहे असे सांगितले. ३०व्या सूत्रात भक्ती स्वयंफलरूपा म्हणजे स्वतःच्या ठिकाणी फलप्रद होण्याची आंतरिक क्षमता असलेली आहे असे स्वतःचे म्हणणे सांगितले. प्रस्तुत सूत्रात भक्तीला दुसऱ्या कोणत्याही प्रमाणाची म्हणजे पुराव्याची आवश्यकता नसून ती स्वयंप्रमाण (self-evident) आहे असे ते सांगतात.

प्रमा म्हणजे ज्ञान. ज्यामुळे ज्ञान होते ते प्रमाण. प्रमाणांमध्ये ज्ञानाचा उगम होतो. भारतीय तर्कशास्त्रात तीन प्रमाणे मानलेली आहेत. (१) प्रत्यक्ष (२) अनुमान आणि (३) आप्तवाक्य. (१) इंद्रियांना अनुभवाला येणाऱ्या

ज्ञानाला प्रत्यक्ष (perception) म्हणतात. आपण जेव्हा आपल्यासमोर घडलेली घटना डोळ्यांनी पहातो तेव्हा त्या घटनेच्या सत्यतेविषयी आपल्या मनात कोणताही संशय राहात नाही. अमुक घटना खरी कशावरून असा जर कोणी प्रश्न केला तर मी स्वतः माझ्या डोळ्यांनी पाहिले ना असे आपण ठासून सांगतो. डोळ्यांप्रमाणे कान, नाक इत्यादी ज्ञानेंद्रियांच्या जे अनुभवाला येते त्याला आपण प्रत्यक्ष प्रमाण म्हणतो. (२) अनुमानामध्ये (Inference) आपण निरीक्षणावर आधारित निष्कर्ष काढतो. उदाहरणार्थ, अनेक कावळे काळे दिसल्यानंतर आणि काळ्या रंगाखेरीज दुसऱ्या रंगाचा एकही कावळा दिसला नाही म्हणून कावळा काळा असतो असे विधान आपण करतो. (३) शब्द किंवा आप्तवाक्य (Authority). ज्याच्यावर आपला विश्वास आहे, जो त्या विषयातील तज्ञ आहे, निस्वार्थी आहे आणि आपला हितचिंतक आहे अशा माणसाचे सांगणे आपण मान्य करतो. खरे मानतो. प्रमाणभूत ग्रंथांतील सांगणे आपल्याला मान्य असते. तथापि आपण ज्यांचा शब्द प्रमाण मानतो त्यांचा शब्द सर्वांना मान्य होईलच असे नाही. उदाहरणार्थ वेदांचे सांगणे खरे म्हणणारे लोक आहेत आणि वेदप्रामाण्य न मानणारे लोकही आहेत. ज्ञानमार्गात या तीन्ही प्रमाणांची आवश्यकता असते. योगमार्गात देखील यांचा आधार घ्यावा लागतो. भक्तिमार्ग हा प्रेमाचा मार्ग असल्यामुळे ह्याचे आचरण करण्यासाठी कोणत्याही प्रमाणांची आणि तर्काची अथवा विद्वत्तेची गरज नसते. रामकृष्ण परमहंसांचे किंवा श्रीमहाराजांचे प्राथमिक शिक्षणही पूर्ण झाले नव्हते पण भक्तिपंथाने जाऊन त्यांना भगवंताचे दर्शन झाले. मुलाच्या आईवरील प्रेमाला जसे काही प्रमाण लागत नाही तसेच भक्ताच्या भगवंतावरील प्रेमाला काही प्रमाण लागत नाही. म्हणून सूत्राच्या दुसऱ्या भागात भक्तीला कोणत्याही प्रमाणाची अपेक्षा नाही कारण ती स्वयंप्रमाण आणि स्वयंसिद्ध आहे असे सांगितले आहे. भक्ताला लाभणाऱ्या भक्तिसुखाच्या अनुभवासाठी कोणतेही प्रमाण लागत नाही. कोणत्याही व्यक्तीला ती जिवंत आहे याचे जसे कोणतेही प्रमाण लागत नाही, तिचे जिवंतपण स्वयंसिद्ध असते तसेच भक्तीचेही आहे. हनुमान, शबरी आणि बिभीषण ह्या रामायणातील तीन व्यक्ती ज्ञान, शक्ती, वैभव, कुल इत्यादी बाबतीत भिन्न असल्या तरी त्यांची श्रीरामाची भक्ती प्रगाढ होती. त्यामुळे त्यांना भक्तिसुखाचा लाभ झाला. अशा प्रकारे भक्तिसाधन इतर साधनांपेक्षा सुलभ आहे.

भक्तीचे आणखी एक वैशिष्ट्य नारद पुढील सूत्रात सांगत आहेत.

## सूत्र साठाव्वे

**शान्तिरूपात् परमानन्दरूपाच्च ॥६०॥**

**शान्तिरूपात्= भक्तीमध्ये स्वभावतः शांति असल्यामुळे. परमानन्दरूपात्= अपार आनंदरूप असल्यामुळे. च= आणि.**

**भक्तीमध्ये स्वभावतः शांति असल्यामुळे आणि ती अपार आनंदरूप असल्यामुळे (ती इतर साधमांपेक्षा सुलभ व श्रेष्ठ आहे.)**

**विवरण** : भक्तीला दुसऱ्या कोणत्याही प्रमाणाची आवश्यकता नाही. भक्ती भगवंतापर्यंत पोचली की नाही हे समजावयालाही वेगळे काही करावे लागत नाही. प्रापंचिक जीवनात माणसाला शांती क्वचितच लाभते. माणसाचे व्यावहारिक जीवन दुःख, भीती, काळजी यांनी व्यापलेले आहे. मी देह आहे असा निश्चय होणे हे सर्व दुःखाचे मूळ आहे. जे जे नश्वर आहे ते मी नव्हे असा निश्चय झाला की साधक देहाकडे वेगळेपणाने पाहू लागतो आणि सुखदुःखादि द्वंद्वांपलीकडे जातो. पण देहबुद्धी असेपर्यंत मात्र काळजी आणि भीती माणसाला सोडीत नाहीत. जीवनात घडून गेलेल्या वाईट गोष्टींबद्दल माणूस शोक करतो, चालू परिस्थितीत दुःख भोगत असतो आणि पुढे काय होईल याची चिंता करतो. पण मी कर्ता नाही; राम कर्ता आहे. माझ्या जीवनात जे काही चांगले, वाईट घडते ते सर्व त्याच्या इच्छेने घडते. त्याच्या इच्छेशिवाय जगात काहीच घडत नाही. तो माझा त्राता आहे, हितकर्ता आहे याची खात्री झाली की माणसाच्या शोक, चिंता, भीती इत्यादी भावना नाहीशा होतात. प्रपंचामध्ये असले तर असू दे, नसले तर नसू दे अशी एक तृप्तीची अवस्था येते. पूर्वीचे अशांत मन शांत होते. एखाद्या जलाशयातील पाण्याची खळबळ आणि लाटा नाहीशा होऊन ते शांत व्हावे, त्याप्रमाणे भक्ताच्या मनात शांती नाहीशी करणाऱ्या वृत्तींचे तरंग उठेनासे होतात. जीवनात काहीही घडले तरी त्याच्या मनाचे संतुलन बिघडत नाही. याची सुरुवात म्हणजे पैशाची काळजी कमी होते, देहाची काळजी कमी होते, मुलाबाळांची काळजी कमी होते. अशा प्रकारे एकंदरच काळजी कमी होणे ही पारमार्थिक प्रगतीची खूण आहे. याबरोबरच भक्ताचे विकार क्षीण होतात आणि त्याला अभयाचा लाभ होतो. "यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसासह। आनन्दं ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कदाचन॥" (मन आणि वाणी ज्याच्यापर्यंत न पोंचतांच परत फिरतात त्या ब्रह्माच्या आनंदाचा अनुभव घेणाऱ्या पुरुषाला कसलेही भय उरत नाही.)

ब्रह्मज्ञानी आणि सिद्ध भक्त यांची अवस्था सारखीच असते. परमप्रेमाचा लाभ झाल्यानंतर भक्ताची होणारी अवस्था नारदानी ४, ५ व ६ या सूत्रात सांगितलेली आहे. तो सिद्ध होतो, अमृत होतो, तृप्त होतो, त्याला कसलीही इच्छा राहात नाही. तो कशाचाही शोक करीत नाही, कोणाचाही द्वेष करीत नाही, इत्यादी सांगितले. पराशांती लाभल्यानंतर त्याला परमानंदाचा लाभ होतो. आनंदस्वरूप परमात्म्याशी त्याचे ऐक्य घडते. त्याची शांती कशानेही बिघडत नाही. तो सदैव आनंदात निमग्न असतो. त्याला संत पदवी प्राप्त होते. या अवस्थेतील आपल्या अनुभवाचे वर्णन तुकाराम महाराजांनी पुढील अभंगात केले आहे. "आनंदाचे डोहीं आनंदतरंग। आनंदचि अंग आनंदाचें ॥ १ ॥ काय सांगों झालें कांहींचियाबाहीं। पुढें चाली नाहीं आवडीनें ॥ २ ॥ गर्भाचे आवडी मातेचा डोहळा। तेथींचा जिव्हाळा तेथें बिंबे ॥ ३ ॥ तुका म्हणे तैसा ओतलासे ठसा। अनुभव सरिसा मुखा आला ॥ ४ ॥" (मी आनंदाचा (ब्रह्मानंदाचा) डोह झालो आहे, म्हणून त्याच्यामध्ये आनंदाच्याच लाटा येतात, कारण आनंदाचे अंग आनंदच असते. मला जे काही सुख झाले ते काहीच्या बाहीच आहे; त्याचे मी काय वर्णन करू? कारण त्याच्या प्रीतीने (प्रपंचाची) पुढील हाव संपली. पोटातील गर्भाची जशी आवड असते तेच डोहाळे आईला होतात, कारण त्या ठिकाणचा (गर्भाचा) स्वभावच (आईमध्ये) प्रगट होतो. तुकाराम महाराज म्हणतात, त्याचप्रमाणे जो अनुभवाचा ठसा माझ्या अंतःकरणात उमटला आहे, तोच माझ्या वाणीवाटें प्रगट झाला.)

प्रत्येक घटनेमध्ये भगवंताचा हात दिसत असल्यामुळे असा भक्त सर्व काही भगवंतावर सोडून देतो. त्याच्या जीवनात सहजता येते आणि त्याची परिणती शांती आणि परमानंदात होते.

## ३.४ : भक्तीमधील त्याज्य गोष्टी-अडथळे

### सूत्र एकसष्टावे

**लोकहानौ चिन्ता न कार्या निवेदितात्मलोकवेदत्वात् ॥ ६१ ॥**

**लोकहानौ= लौकिक व्यवहारातील हानीमुळे-नुकसानीमुळे. चिन्ता न कार्या= चिंता करू नये. निवेदित-आत्म-लोक-वेदत्वात्= आपला स्व, लौकिक आणि वैदिक व्यवहार (भगवंताला) अर्पण केलेले असल्यामुळे.**

**भक्ताने आपला स्व आणि लौकिक व वैदिक (पारमार्थिक) कर्मे भगवंताला अर्पण केलेली असतात. म्हणून लोकव्यवहारात हानी झाली तरी त्याने चिंता करू नये.**

**विवरण** : मागे ८ व्या सूत्रात नारदानी लौकिक म्हणजे इहलोकीची अथवा व्यावहारिक कर्मे आणि वैदिक म्हणजे श्रुतींनी सांगितलेली लौकिक व पारमार्थिक कर्मे यांचा न्यास म्हणजे त्याग किंवा समर्पण करणे म्हणजे निरोध असे सांगितले. त्यानंतर पुढच्या तीन सूत्रांत भगवत्प्राप्तीला अनुकूल व उपयुक्त अशा ऐहिक आणि वैदिक कर्मांचे आचरण करावे आणि जी ध्येय साधण्यास प्रतिकूल असतील त्या कर्मांचा त्याग करावा असे सांगितले. ज्यांची गौणी भक्तीस सुरुवात झालेली आहे व ज्यांना मुख्य भक्त व्हावयाचे आहे त्यांच्यासाठी आता ते सांगतात की अशा प्रकारे वागताना व्यवहारात काही नुकसान होईल. काही वेळा इतर लोकांकडून इतकेच नव्हे तर जवळच्या लोकांकडून टीका होईल. अपमान सोसावा लागेल. पण असे झाले तरी त्याने आपले चित्त ध्येयावर एकाग्र करावे. कोणतीही चिंता, काळजी करू नये. त्याने लक्षात ठेवावे की आपण आपली सर्व कर्मे ईश्वराला अर्पण केलेली आहेत.

जीवनामध्ये आपल्या वाट्याला आलेली कर्मे करताना लाभ किंवा हानी व्हावयाचीच. कारण साधक असो वा सिद्ध, प्रत्येकाला आपले स्वतःचे प्रारब्ध भोगावे लागते. व्यक्तीच्या स्वतःच्या कर्मामुळे होणाऱ्या परिणामाला स्वेच्छा प्रारब्ध म्हणतात. उदाहरणार्थ, आजारी माणसाने कुपथ्य केले तर त्याला त्रास सोसावा लागतो. दुसऱ्यांच्या कर्मामुळे होणाऱ्या परिणामाला परेच्छा प्रारब्ध म्हणतात. उदाहरणार्थ, रस्त्याने जाताना कोणीतरी फेकलेला दगड डोक्याला लागून खोक पडते. व्यक्तिगत कर्मातून होणाऱ्या लाभ अथवा हानीप्रमाणे सामूहिक कर्मातून निर्माण होणाऱ्या गोष्टींचे परिणाम आपल्याला भोगावे लागतात. उदाहरणार्थ, शेजारच्या देशाचे आपल्या देशाशी युद्ध सुरू झाले तर त्यामुळे त्रास सोसावा लागतो. याला नियति म्हणतात. ज्ञानमार्गी साधक विचाराने प्रारब्ध व नियति मान्य करून चिंता करणे सोडून देतो तर भक्त जे जे घडते ते ते सर्व भगवंताच्या इच्छेने घडते अशी दृढ श्रद्धा ठेवून त्याबद्दल चिंता करीत नाही.

जे खरे नाही ते माणूस खरे मानतो त्यामुळे त्याला चिंता, भीती वाटते. माणूस चिंता करतो तेव्हा एकच गोष्ट पुन्हा पुन्हा मनात घोळवत राहातो. असे करताना तेच तेच विचार एकसारखे मनात येतात त्यामुळे त्यातून सुटकेचा मार्ग तर सापडत नाहीच पण दुसरे काही सुचेनासे होते. इंग्रजीत याला brooding म्हणतात. भीतीमध्ये भावनेचा आणि कल्पनेचा भाग जास्त

असतो. जे खरे नाही ते खरे वाटते. एका जपानी माणसाला पिशाच्चबाधा झाली म्हणून एका झेन साधूकडे नेले. साधूने तू या माणसाला सोडत का नाहीस असे पिशाच्चाला विचारल्यावर ते म्हणाले, अहो, यानेच मला निर्माण केले आहे आणि रोज चिंता करून तो मला पुष्ट करतो आहे, मग मी याला कसे सोडू? तात्पर्य आपला प्रपंच, इतकेच नव्हे तर आपला देहही तात्पुरता आहे, सर्वस्वी खरा नाही असे ज्याला वाटेल त्याचीच चिंता आणि भीती नाहीशी होते. यासाठी नारदांनी सांगितल्याप्रमाणे आपली सर्व लौकिक व्यक्तिगत कर्मे आणि सामाजिक कर्मे, त्याचप्रमाणे वैदिक कर्मे भगवंताला निवेदन म्हणजे अर्पण करावी. मी 'तुझा' म्हणजे भगवंताचा अथवा सद्गुरूंचा आहे असे ज्याला खरे वाटते त्यालाच हे अर्पण करणे साधते. ते साधले की कर्तेपण भगवंताकडे अथवा सद्गुरूंकडे जाते. भक्ताचे कर्तेपण केवळ दिखावू असते. खरे म्हणजे भगवंतच सर्व काही त्याच्याकडून करवीत असतो. मी कर्ता नसून भगवंत कर्ता आहे ही जाणीव होण्यासाठी माणसाने आपल्या जीवनाकडे पहावे म्हणजे त्याच्या लक्षात येते की त्याच्या जीवनातील अनेक गोष्टी त्याच्या कल्पनेपलीकडे घडलेल्या असतात. त्यात त्याचे कर्तृत्व काहीच नसते. जीवनाकडे अशा डोळसपणे पाहू लागल्यावर भगवंताच्या अस्तित्वाची जाणीव होते आणि ती जाणीव सतत राहाण्यासाठी साधक एकसारखे नामस्मरण करू लागतो. अखंड नामस्मरण आणि 'राम कर्ता' ही दृढ श्रद्धा या दोन गोष्टी ज्याला साधतात त्याला समर्पण साधते. त्यानंतर भीती व चिंता नाहीशा होतात. भगवंत आहे, तो खरा कर्ता आहे, तो सर्वज्ञ आहे, सर्व शक्तींनी परिपूर्ण आहे. तो दयाघन आहे, तो माझ्या जीवनाचा सूत्रधार आहे अशी खात्री झाली की भीती, काळजी इत्यादींना थारा राहात नाही. मग भगवंताखेरीज इतर आधाराचा विचार देखील भक्ताच्या मनात येत नाही.

साधकाप्रमाणे सिद्धालाही लौकिक व वैदिक कर्मे करावी लागतात. लोकहितासाठी ते आवश्यक असते. संतांना जगातील दुःख पहावत नाही. त्यामुळे दयावंत होऊन ते कर्मे करतात. अशा सत्पुरुषांची 'मी करतो' ही भावना नाहीशी झालेली असल्यामुळे त्यांच्या हातून होणारे कार्य हे भगवंताचेच कार्य असते. ते सिद्धीस जाईल अथवा नाही याची त्यांना कधीच चिंता नसते. त्यांचे कर्म ही समत्वबुद्धीने केलेली सर्वेश्वराची पूजा असते. "करणें कां न करणें। हें आघवें तोचि जाणे। विश्व चळतसे जेणें। परमात्मेनि॥" ज्ञानेश्वरी १२.११८॥ यावर त्यांची नितांत श्रद्धा असते.

आता नारद सांगतात की साधकाला हे एकदम जमणार नाही पण त्याने सतत चिकाटीने प्रयत्न केला पाहिजे.

## सूत्र बासष्टावे

**न तदसिद्धौ लोकव्यवहारो हेयः किन्तु फलत्यागस्तत्साधनं च ॥६२॥**

**तत् असिद्धौ= ते (चिंता न करणे) साध्य झाले नाही. लोकव्यवहारो= लौकिक व्यवहार. न हेयः= त्याग करू नये-सोडू नये. किन्तु= पण. फलत्याग= (करत असलेल्या) कर्मांच्या फलाचा त्याग. (आणि) तत् साधनं = हेच त्यासाठी आवश्यक साधन.**

**जोपर्यंत चिंता न करणे साधले नाही तोपर्यंत साधकाने लौकिक कर्मांचा त्याग करू नये. त्याने त्या कर्मांच्या फलाचा त्याग हेच त्यासाठी आवश्यक साधन आहे (हे ओळखून) कर्मफलांचा त्याग निष्ठेने करीत राहावे.**

**विवरण** : साधक निष्ठेने व चिकाटीने अभ्यास करत असला, गुरुवचनावर त्याची पूर्ण श्रद्धा असली तरी साधनात चढउतार चालू रहातो. लौकिक व्यवहारात दुःख, चिंता भीती निर्माण करणारे प्रसंग येतात. मी कर्ता नाही, खरा कर्ता भगवंत आहे हे तत्त्वदृष्ट्या पटलेले असले तरी सर्व बाबतीत आणि सर्व काळी तसे आचरण घडत नाही. साधकाच्या न कळत त्याचा खोटा मी डोके वर काढतो आणि ते लक्षात आले की हे कर्म करणेच नको असे वाटण्याची शक्यता असते. म्हणून या सूत्रात नारद सांगत आहेत की परमेश्वराच्या परमप्रेमाचा अद्यापि लाभ झालेला नसला, चिंतामुक्त होता आलेले नसले आणि साधन करताना अडथळे येत असले तरी साधकाने त्याच्या वाट्याला आलेली व्यक्तिगत आणि सामाजिक, सर्व प्रकारची कर्मे केलीच पाहिजेत. ती तुच्छ मानता कामा नये. कर्मत्याग न करता त्याने कर्मफल त्यागाचा अभ्यास केला पाहिजे. त्याचबरोबर भक्ती सिद्ध होण्यासाठी आवश्यक ते साधन निष्ठेने व चिकाटीने चालू ठेवले पाहिजे. भक्तीची पूर्णावस्था प्राप्त झाली नाही तोपर्यंत कर्मत्यागाचा प्रयत्न करणे केवळ अनुचित नसून आत्मघात करणारे आहे. श्रीरामकृष्ण परमहंस सांगत की प्रयोजन संपले की ताडामाडाच्या झावळ्यासुद्धा गळून पडतात; तसे सिद्ध दशा प्राप्त झाली की सर्व कर्मे आपोआपच गळून पडतात. कर्म तर करावयाचे, त्याचा हेतु मनात स्पष्ट ठेवावयाचा, त्यासाठी

लागणाऱ्या साधनांची जुळवाजुळव करावयाची, कर्म यशस्वी होण्यासाठी आवश्यक ते प्रयत्न योग्य दिशेने करावयाचे आणि कर्म फलदायी झाले तरी त्याच्या आनंदात न बुडता त्या कर्मफलाचा इदं न मम म्हणून त्याग करावयाचा किंवा ते भगवंताच्या चरणीं अर्पण करावयाचे; याउलट सर्व प्रयत्न करून कर्मफल मिळाले नाही तरी त्याचा शोक न करता, नाउमेद न होता, वाट्याला आलेली कर्मे उत्कटतेने करीत रहावयाचे हाच कर्मयोग होय. अशा प्रकारे कुशलतेने कर्म करणारा साधक कर्मयोगी भक्त म्हटले पाहिजे. व्यावहारिक कर्माप्रमाणे पारमार्थिक कर्मे करतानाही हे मी भगवंतासाठी -भगवंताला आवडते म्हणून करतो आहे अशा निरासक्त भावनेने कर्म केले पाहिजे.

फलत्याग करून निरासक्त मनाने कर्मे करत राहून आपले साधन जपणे एकदम साधणार नाही. त्यासाठी भावना शुद्ध व्हावी लागते. भावना हे मनाचे एक अंग आहे; म्हणून मला भगवंत ह्वा असे मनाला वळण दिले की हळूहळू भगवंताशिवाय इतर गोष्टींची किंमत कमी होऊन ध्येय साधण्याची तळमळ निर्माण होते. यासाठी सत्पुरुषांची संगत फार उपयोगी पडते. त्यांच्या सहवासात निरासक्तपणे कर्म करण्याचा आदर्श समोर असतो, कारण सर्व व्यवहार करूनही सत्पुरुष त्यात नसतो. त्यामुळे अशी संगत मिळाली तर प्रपंचाची आसक्ती कमी होत होत शेवटी सुटते. याचे आणखी एक कारण म्हणजे सत्पुरुषांच्या सहवासात भगवंताचे अखंड स्मरण ठेवणे सोपे जाते. म्हणून ज्याच्या सान्निध्यात प्रपंचाचे विचार मावळून एकसारखे नामस्मरण करण्याची इच्छा होईल तो सत्पुरुष समजावा. ज्यांना सत्पुरुषांचा सहवास मिळत नाही त्यांनी सत्पुरुषांना जे आवडते ते करावे व ते ज्या मार्गाने गेले त्या मार्गाने जाण्याचा प्रयत्न करावा. संत त्यांच्या जीवनातील सगळे कर्तेपण रामाला देतात आणि त्याचे स्मरण राहावे म्हणून अखंड नामस्मरणात, भगवंताच्या अनुसंधानात असतात. साधकांनीही हाच अभ्यास केला पाहिजे. प्रापंचिक जसे सतत पैशाचे चिंतन करतो तसे भक्ताने सतत भगवंताचे चिंतन करावे असे श्रीमहाराज सांगत. भगवंताच्या आणि सद्गुरूंच्या अस्तित्वाची सतत जाणीव रहाण्यासाठी जीवनात काहीही बरेवाईट घडले तरी 'तुझी इच्छा' हा मंत्र साधकाच्या मुखात असावा. हे साधण्यासाठी साधकाने माझ्या जीवनात जे जे घडते ते ते सर्व भगवंताच्या नजरेखाली घडते, माझे हित त्यालाच माहीत आहे असे मनाला वळण द्यावे. साधकानें हा अभ्यास कसा करावा ते तुकाराम महाराजांच्या पुढील अभंगात फार चांगले सांगितले आहे. ते म्हणतात :

"नको सांडू अन्न नको सेवूं वन। चिंतीं नारायण सर्व भोगीं ॥ १ ॥
मातेचिया खांदी बाळ नेणे सीण। भावना त्या भिन्न मुंडाविया ॥ २ ॥
नको गुंफों भोगीं नको पडो त्यागीं। लावुनि सरे अंगीं देवाचिया ॥ ३ ॥
तुका म्हणे नको पुसो वेळोवेळां। उपदेश वेगळा उरला नाहीं ॥ ४ ॥"

## सूत्र त्रेसष्टावे

**स्त्रीधननास्तिकवैरिचरित्रं न श्रवणीयम्॥ ६३ ॥**

**स्त्रीधननास्तिकवैरिचरित्रं= स्त्रिया, धन संपत्ती, नास्तिक माणसे आणि वैर करणारे शत्रू यांचे वर्णन. न श्रवणीयम्= ऐकू नये.**

**(साधकांनी) स्त्रिया, धन, संपत्ती, ऐश्वर्य, नास्तिक लोक आणि शत्रू यांचे वर्णन ऐकू नये.**

**विवरण :** श्रद्धा बळकट होऊन साधनात वाढ होण्यासाठी साधकाला काही गोष्टी टाळाव्या लागतात आणि दुसऱ्या काही गोष्टी कराव्या लागतात. चिंता करू नये, पण लौकिक व्यवहारापासून पळूनही जाऊ नये आणि फलाशेत न गुंतता कर्म करावे असे मागच्या दोन सूत्रांत सांगितले. आता ह्या सूत्रात नारद सांगतात की स्त्रियांचे चरित्र ऐकू नये. ऐकू नये असे म्हटले असले तरी त्यात पाहू नये, वाचू नये, बोलू नये, चर्चा करू नये इत्यादींचा समावेश होतो हे लक्षात ठेवले पाहिजे. स्त्रियांप्रमाणेच पैशाचे आणि धनवान लोकांचे वर्णन करू नये. नास्तिक लोक आणि ज्यांच्याशी भांडण झाले आहे अशा लोकांसंबधी चिंतन करू नये असे नारद सांगतात. सर्वसामान्य प्रापंचिक साधकाला या गोष्टींमध्ये रस असतो. त्यामुळे त्याची तिकडे साहजिकच ओढ असते; तिला लगाम लावून मन ईशचिंतनाकडे वळवावयाचे असते. त्यासाठी या सूत्रात सांगितलेली खबरदारी घेणे अवश्य आहे.

स्त्रियांचे चरित्र वर्णन ऐकू नये असे येथे म्हटले आहे म्हणून येथे स्त्री शब्दाचा अर्थ लक्षात घेतला पाहिजे. प्रत्येक संस्कृतीत काही शब्दांना एक विशिष्ट अर्थसंग्रह (Connotation) असतो. येथे स्त्री शब्दाचा अर्थ कामवासना असा घेतला पाहिजे. जी खबरदारी पुरुष साधकांनी स्त्रियांच्या बाबतीत घ्यावयाची तीच खबरदारी स्त्री साधकांनी पुरुषांच्या बाबतीत घेतली पाहिजे. पूर्वीच्या लयाला गेलेल्या संस्कृतींचा व साम्राज्यांचा इतिहास पाहिला तर त्यात असे आढळते की ज्या अनेक कारणांनी त्यांचा नाश झाला त्यांमध्ये समाजातील अनिर्बंध भोगलालसा व स्त्रियांचे उच्छृंखल वर्तन हे एक महत्त्वाचे

कारण होते. भगवद्गीतेच्या सुरुवातीस अर्जुनाच्या मनातली युद्धाच्या दुष्परिणामासंबंधीची ही भीती "अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः। स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः"॥१.४१॥ या श्लोकात व्यक्त झाली आहे. समाजाच्या निरोगी वाढीसाठी स्त्रियांचे शुद्ध चारित्र्य आपल्या संस्कृतीने जास्त महत्त्वाचे मानले आहे. याचा अर्थ पुरुषांनी कसेही वागले तरी चालेल असा होत नाही. उलट स्त्रीने पतिव्रता धर्माचे आचरण करताना सीतेचा आदर्श समोर ठेवावा असे जेव्हा म्हटले जाते तेव्हा त्याचबरोबर तिच्या नवऱ्यानेही रामाचा आदर्श समोर ठेवून जगात वागावे हे अभिप्रेत असते. म्हणून प्राचीन धार्मिक वाङ्मयात जेथे स्त्रिया साधकाच्या पतनाला कारण होतात असे म्हटलेले आढळते तेथे तेथे पुरुष साधकांनी कामवासनेला ते बळी पडल्याचे अप्रत्यक्षपणे मान्य केले आहे. विश्वामित्राला मेनकेने भुलविले या घटनेत तिच्या भुलविण्याला बळी पडणारा विश्वामित्रही दोषी ठरतो. कामवासना ही जीवाची एक नैसर्गिक प्रवृत्ती आहे आणि तिला जीवनात योग्य ते स्थान दिले पाहिजे. म्हणूनच भगवंतानी "धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ॥" ७.११॥ (आणि अर्जुना, सर्व भूतांमध्ये धर्माला म्हणजे शास्त्राला अनुकूल असा काम मी आहे) असे भगवद्गीतेत सांगितले आहे.

स्त्री म्हणजे कामवासना हा अर्थ लक्षात ठेवून आता या सूत्राचा विचार करू. कामवासना ही शक्ती आहे. ती जागी झाली की साधकाचे चित्त स्थिर राहात नाही. म्हणून ती जागी होईल अशी कोणतीही गोष्ट साधकाने करू नये. भोग भोगण्यासाठी स्वतःचे तारुण्य कमी वाटले म्हणून आपल्या पुत्राचे, पुरूरव्याचे तारुण्य भोगून झाल्यानंतर ययातीने त्याचा अनुभव सांगितला आहे की उपभोगाने कामवासना शांत होत नाही. उलट अग्नीत तूप टाकल्याप्रमाणे ती जास्तच वाढते. (न जातु कामः कामानां उपभोगेन शाम्यति। हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते॥) भगवद्गीतेतही काम आणि क्रोध या विकारांना ते अति खादाड आणि महापापी असल्यामुळे ते आपले वैरी आहेत हे ओळख असे सांगितले आहे. (महाशनो महापाप्मा विध्येनमिह वैरिणम्।) श्रीमहाराज म्हणतात, "विकारदेखील भगवंतानेच निर्माण केले आहेत म्हणून त्यांना जीवनात स्थान असलेच पाहिजे. मात्र आपला त्यांच्यावर ताबा असला पाहिजे; त्यांचा आपल्यावर ताबा असता कामा नये. साधकाने हे लक्षात ठेवले पाहिजे." तथापि आपण विकारांवर किती ताबा मिळवला आहे याची साधकाने कधीही मुद्दाम परीक्षा घेऊ नये कारण तेच त्याच्या अधःपाताचे कारण होऊ

शकते. तुकाराम महाराजांना सिद्धावस्था प्राप्त झाल्यानंतर एका अभंगात त्यांनी म्हटले आहे "भूतीं देव म्हणोनि भेटतो या जना। नाहीं हे भावना नरनारी॥" सर्वाभूतीं भगवद्भाव झालेल्या अवस्थेतले हे वर्णन आहे. पण हेच तुकाराम महाराज साधकावस्थेत असताना म्हणतात, "स्त्रियांचा तो संग नको नारायणा। काष्ठा या पाषाणा मृत्तिकेच्या ॥ १ ॥ नाठवे हा देव न घडे भजन। लांचावलें मन आवरेना ॥ २ ॥ दृष्टिमुखें मरण इंद्रियांच्या द्वारें। लावण्य तें खरें दुःखमूळ ॥ ३ ॥ तुका म्हणे जरी अग्नि झाला साधु। तरी पडे बाधूं संघटणें ॥ ४ ॥" प्रत्यक्ष स्त्री दूरच राहिली लाकूड, पाषाण किंवा मातीच्या स्त्रियांच्या मूर्तीची देखील जवळिक नको. कारण अग्नि जरी साधु असला तरी त्याला आलिंगन दिले तर तो जाळणारच असे ते सांगतात. साधकाच्या दृष्टीने तुकारामांच्या काळापेक्षाही सध्याचा काळ जास्त परीक्षेचा आहे. कारण भडक अश्लिल मासिके, चित्रपट, दूरदर्शनवरील कार्यक्रम, सार्वजनिक उत्सवात ध्वनिवर्धकांवरून वाजवली जाणारी शृंगारिक गाणी व बीभत्स दृष्ये यांमुळे साधकाला चित्त भगवंताकडे वळवून एकाग्र करणे अवघड जाते. स्वभावतःच बहिर्मुख असणारी इंद्रिये आवरून अंतर्मुख करणे जास्त अवघड होते.

श्रीएकनाथ महाराज 'चिरंजीवपदात' सांगतात की भगवंताच्या कृपेने साधकाच्या चित्तात खऱ्या वैराग्याचा उदय झाला की त्याचे वागणे पुढे वर्णन केल्याप्रमाणे होते. "तो विरक्त कैसा म्हणाल। जो मानलें सांडी स्थळ। सत्संगीं राहे निश्चळ। न करी तळमळ मानाची ॥ २६ ॥.... नावडे प्रपंचीं बैसणें। नावडे कोणांशी बोलणें। नावडे योग्यता मिरवणें। बरवें खाणें नावडे ॥ २८ ॥ नावडे लौकिक परवडी। नावडती लेणी लुगडी। नावडे परान्नगोडी। द्रव्यजोडी नावडे ॥ २९ ॥ नावडे स्त्रियांत बैसणें। नावडे स्त्रियांचें रगडणें। नावडे स्त्रियांतें पाहणें। त्यांचे बोलणें नावडे ॥ ३० ॥ नको नको स्त्रियांचा सांगात। नको नको स्त्रियांचा एकांत। नको नको स्त्रियांचा परमार्थ। करिती आघात पुरुषासी ॥ ३१ ॥ म्हणाल गृहस्थ साधकें। स्त्रिया सोडून जावें कें। येच अर्थी उत्तर निकें। ऐक आतां सांगेन ॥ ३२ ॥ तरी स्वस्त्रीवांचोनि। नातळावी अन्य कामिनी। कोणे स्त्रियासंन्निध वाणी। आश्रयो झणीं न द्यावा ॥ ३३ ॥ स्वस्त्रीसही कार्यापुरतें। पाचारावें स्पर्शावें निरुतें। परि आसक्त होऊनिया तेथें। सर्वथा चित्तें नसावें ॥ ३४ ॥" नाथांच्यासारख्या प्रापंचिक संताने साधकाने कसे रहावे याचा गृहपाठच वरील ओव्यात दिला आहे. स्त्री व पुरुष साधकांना कामवासनेपासून स्वतःला अतिशय सांभाळावे लागते. सेंट टेरेसा सांगते की शक्यतो स्त्री व पुरुष

साधकांनी परस्पर सहवास टाळावा आणि स्त्रीने पुरुषाचे व पुरुषाने स्त्रीचे शरीर घाणीने भरलेले आहे हे सदा मनात घोळवावे. श्रीमद्भागवतात म्हटले आहे, "न तथास्य भवेन्मोहो बन्धश्चान्यप्रसंगतः। योषित्संगात् यथा पुंसो यथा तत्सङ्गिगतः॥" (स्त्रियांच्या संगतीने आणि स्त्रियांची संगत करणाऱ्या आसक्त पुरुषांमुळे माणसाला जसा मोह आणि बंधन प्राप्त होते तसे दुसऱ्या कोणाच्याही संगतीने होत नाही.) कामापेक्षाही कामी माणसाची संगत जास्त घातक असते कारण त्याच्या संगतीत सतत कामविषयाचेच चिंतन होते. भगवद्गीतेत 'ध्यायतो विषयान्पुंसः' इत्यादि दोन श्लोकात विषयांच्या चिंतनाने घडणाऱ्या अनर्थाची परंपरा सांगितली आहे.

मंदिरे, आश्रम, मठ यांसारख्या धार्मिक व आध्यात्मिक केन्द्रांमध्ये राहणाऱ्या साधक व साधिकांनी ह्या सूत्रामध्ये उल्लेख केलेल्या गोष्टींबाबत जास्त सावध राहिले पाहिजे. अध्यात्मविषयांची चर्चा, संवाद, शंकासमाधान इत्यादी कारणांनी जेव्हा स्त्री-पुरुष साधक एकत्र येतात तेव्हा त्यांच्यामध्ये परस्परांविषयी शारीरिक आकर्षण निर्माण होऊन ते पथभ्रष्ट होण्याची फार भीती असते. या सूत्रावरील विवरणात श्रीरामकृष्ण मठाचे स्वामी त्यागीशानंद लिहितात : "Even though a spiritual aspirant may perform acts of social service without attachment to the fruits thereof , it is not safe for him to engage himself in those activities which would compel him to mix with the opposite sex freely or consort him with atheists or entangle him in the meshes of worldly riches. Contact with these is so dangerous that a strict warning is ministered in this aphorism not even to hear or read about them .... Even if a Bhakta is above all temptations, it is better on his part to submit himself to these wholesome restrictions in order that he may set by his own life an example to the world which he wants to serve and direct in the path of devotion. ....Surrounded by the worldly temptations amidst which he has to live, the emotion of love roused to its highest pitch is likely to be diverted into lower channels, if he still continues in the company of the other sex. This is the rationale of Manu's dictum that in solitude one should not

occupy the same seat with the opposite sex, even if they are ones relatives. The senses are powerful enough to drag away even a wise man... बलवानिन्द्रियग्रामो विद्वांसमपि कर्षति॥'' - Aphorisms on The Gospel of Divine Love or Narada Bhakti Sutras by Swami Tyagishananda - Shri Ramkrishna Math, Madras. pp 211-212

कामिनी आणि कांचन यांपासून साधकाने दूर राहिले पाहिजे असे श्रीरामकृष्ण परमहंस म्हणत. श्रीमहाराजांनी म्हटले आहे की स्त्रीपेक्षाही पैका साधकाचा जास्त घात करतो. स्त्रीमुळे साधनभ्रष्ट होण्यासाठी स्त्रीचे सहकार्य लागते, पण पैशाच्या बाबतीत तो प्रश्नच उद्‌भवत नाही. एरवी चांगली असणारी माणसेदेखील पैशाच्या लोभामुळे नीतिभ्रष्ट होतात. पैसा हाच त्यांचा देव होतो. ज्या समाजातील बहुसंख्य माणसे धनलोभी होतात त्या समाजाचे आरोग्य नष्ट होऊन अधःपतन होते. जीवनातील सुखे मिळविण्यासाठी पैसा हे साधन आहे. पैशामुळे माणसाला सुरक्षितता वाटते. पण किती पैसा मिळाला की पुरे झाले ते माणसांना समजत नाही. सुरक्षिततेप्रमाणेच पैशामुळे सत्ता मिळविता येते. 'सर्वे गुणाः कांचनमाश्रयन्ते अशी समाजाची धारणा झाली की पैसा हे साधन न रहाता साध्य होते. त्यामुळे समाजाचा समतोल ढासळतो. पैशाच्या अनिर्बंध संचारात ज्याला परमार्थ साधावयाचा आहे त्याने फार सावध राहिले पाहिजे. द्रव्याचे चिंतन साधकाला भगवंतापासून दूर नेते. म्हणून तुकाराम महाराजांनी मला धन गोमांसासारखे त्याज्य आहे असे सांगितले आहे. एका सत्पुरुषांची एका उद्योगपतींशी भेट झाली असता सत्पुरुषांनी त्यांना विचारले की तुम्हाला इतका पैसा कसा मिळतो? तेव्हा ते उद्योगपती म्हणाले की आम्ही रात्रंदिवस पैशाचे चिंतन करतो, त्यामुळे आम्हाला पैसे मिळविण्याचे नवनवे मार्ग सुचतात! त्या सत्पुरुषांना त्यांचे हे उत्तर फार आवडले. ते आपल्या साधक शिष्यांना म्हणाले की रात्रंदिवस चिंतन केल्यामुळे जर जड पैसा मिळविण्याचे नवनवे मार्ग माणसाला सुचतात तर ज्याला परमार्थ साधावयाचा आहे त्याने जर रात्रंदिवस भगवंताचे चिंतन केले तर त्या प्रेममय परमेश्वराची भेट व्हावयाचे नवनवे मार्ग साधकाला सुचणार नाहीत का? पैसा साधकाला भगवंतापासून दूर नेतो. पैशाच्या लोभाला अंत नसतो. म्हणून साधकाने आपल्या गरजा कमी करून पैशाचा लोभ टाळलाच पाहिजे. प्रपंचासाठी पैसा मिळवावा लागेलच, पण तो अनीतीच्या मार्गांनी मिळवू नये.

कारण कोणत्याही कारणाने चित्ताची स्थिरता नाहीशी झाली की साधनात ढिलेपणा येतो. तुकाराम महाराज सांगतात, "जोडोनिया धन उत्तम वेव्हारें। उदास विचारें वेंच करी ॥ १ ॥ उत्तमचि गति तो एक पावेल। उत्तम भोगील जीवखाणी ॥ २ ॥ परउपकारी नेणें परनिंदा। परस्त्रिया सदा बहिणी माया ॥ ३ ॥" अशा प्रकारे साधकाने जीवनात वैराग्य आणले पाहिजे.

कामवासना आणि पैसा यांप्रमाणे नास्तिकांपासून साधकाने सावध राहिले पाहिजे. सर्व काळात, सर्व समाजात नास्तिक असणारच. अगदी वेदकाळापासून ईश्वराचे अस्तित्व न मानणारे लोक आहेत. चार्वाकाने केवळ पुनर्जन्मच नाकारला नाही तर पुनर्जन्म नसल्यामुळे ह्या एका जन्मात कोणत्याही मार्गाने अनिर्बंध सुख भोगा असे सांगून नीतीच्या मुळावर घाव घातला. साधकाने नास्तिकांचे लिखाण वाचू नये. त्यांच्याशी संभाषण अथवा वादविवाद करू नये कारण जोपर्यंत साधकाची श्रद्धा दृढ झालेली नसते तोपर्यंत अशा लोकांचे एखादे विधान देखील साधकाला पथभ्रष्ट करावयाला पुरेसे होते. नास्तिकांप्रमाणे वैऱ्यांच्या बाबतीतही सावध रहावे. वैराच्या चिंतनाने मनाचा क्षोभ होऊन माणसाच्या मनाचा समतोल नाहीसा होतो. समतोल हरवलेला साधक मग बोलू नये ते बोलतो, वागू नये तसे वागतो आणि याचा पश्चात्ताप झाल्यावर पुन्हा चित्त संतुलित ठेवून साधन करणे कठीण जाते. कारण या सर्व खटाटोपात त्याच्या मनाची शक्ती कमी होते.

ज्याला कोणीही वैरी नाही असा माणूस जगात आढळणे अवघड आहे. मत्सर आणि द्वेष हे विकार लागूनच असतात. दुष्ट शक्तींनी सामान्य माणसांना जीवन असह्य केले म्हणजे भगवंताला अवतार घेऊन सुष्टांचे संरक्षण आणि दुष्टांचा नाश करावा लागतो. तुम्ही कोणाशी वैर करत नसलात तरी जगात अकारण वैर करणारे असतात. क्रोधाचे आणि वैराचे मूळ स्वार्थात आहे. उदाहरणार्थ, कृष्णाला सर्वत्र मान मिळत होता त्यामुळे शिशुपालाचा मत्सर जागा होऊन तो कृष्णाचे वैर करू लागला. भगवद्गीतेत भगवंत सांगतात की जो प्राणिमात्रांविषयी निर्वैर होतो तो माझ्यामध्ये येतो. (निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव) तुकाराम महाराजही "निर्वैर व्हावें सर्व भूतांसवें। साधन बरवें हेंचि एक॥" असे सांगतात. म्हणून साधकाने कोणाशीही वैर करू नये आणि त्याच्याशी कोणी अकारण वैर करू लागले तर त्यावर चिंतन न करता उपेक्षा करावी. जीवनात काही वेळा पलायनवाद स्वीकारावा लागतो. वर सांगितलेल्या गोष्टींच्या बाबतीत साधकाने त्याचा तारतम्याने अंगीकार करावा. साधकाने

लक्षात ठेवावे की भागवतात सांगितल्याप्रमाणे विषयांचे चिंतन केले तर मन विषयासक्त होते आणि जर माझे (भगवंताचे) सदैव चिंतन केले तर चित्त माझ्यामध्ये लय पावते. "विषयान् ध्यायतश्चित्तं विषयेषु विषज्जते। मामनुस्मरतश्चित्तं मय्येव प्रविलीयते॥"

श्रीमद्‌भगवद्गीतेच्या सोळाव्या अध्यायात आसुरी संपत्तीचे स्वरूप सांगून झाल्यावर भगवंत सांगतात, "त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः। कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत्॥" १६.२१॥ (काम, क्रोध त्याचप्रमाणे लोभ असे तीन प्रकारचे हे नरकाचे दार आहे. हे तीनही आत्म्याचा नाश करणारे आहेत म्हणून या तिहींचा त्याग करावा.) या सूत्रातही स्त्री, धन, नास्तिक व वैरी यांचे चरित्रही ऐकू नये असे सांगितले आहे; मग संबंध ठेवणे दूरच. कारण स्त्रियांसंबंधींचे चिंतन कामविकार चाळविते, धनाच्या चिंतनाने लोभ वाढतो आणि नास्तिक व वैरी यांच्यासंबंधी विचार केला तर द्वेष, मत्सर, क्रोध इत्यादी विकार मन क्षुब्ध करतात आणि साधक पथभ्रष्ट होतो.

यापुढील सूत्रात नारद अभिमान, दम्भ इत्यादींचा त्याग करावा असे सांगतात.

## सूत्र चौसष्टावे

**अभिमानदम्भादिकं त्याज्यम् ॥६४॥**

**अभिमान - दम्भ - आदिकम्= अभिमान, ढोंग, कपट इत्यादी. त्याज्यम्= त्याग करण्यास योग्य.**

**अभिमान म्हणजे गर्व, ढोंग, कपट यांसारख्या दुर्गुणांचा त्याग करावा.**

**विवरण** : स्त्रिया, नास्तिक लोक, वैर करणारे आणि श्रीमंत लोक यांच्यासंबंधी चर्चा करू नये, कारण ती साधकाच्या मनावर आघात करून साधनापासून विचलित करते. चित्त अस्वस्थ करणाऱ्या या बाह्य विषयांसंबंधी सांगून झाल्यावर आता साधनात अडथळे निर्माण करणाऱ्या साधकाच्या अंतःकरणातील काही दोषांकडे निर्देश करून नारद त्या दुर्गुणांचा त्याग करावयास सांगत आहेत.

अभिमान म्हणजे आपण आहोत त्यापेक्षा स्वतःला जास्त मोजणे म्हणजेच श्रेष्ठ समजणे. माणसाला आपल्या शक्तीचा, संपत्तीचा, रूपाचा, विद्वत्तेचा अभिमान वाटतो. दैनंदिन जीवनात अभिमान दाखवणे काही प्रमाणात

आवश्यक असते. उदाहरणार्थ, नोकरीसाठी मुलाखतीला गेलेल्या माणसाला आपल्या अंगचे गुण थोडे वाढवून सांगावे लागतात. अर्थात त्यातही त्याला तारतम्य ठेवावे लागते. पण परमार्थात अभिमान साधकाच्या आड येतो. अभिमान असेल तेथे शरणागति अशक्य असते. अभिमान व अहंकार यांच्यामधील सीमारेषा फार अस्पष्ट असते. अभिमान साधनात बाधा निर्माण करतो कारण तो जीवाला आकुंचित करतो. जे अनंत आहे त्याला सांत करू पहातो. म्हणून भगवद्गीतेत ज्ञानाची लक्षणे सांगताना तेराव्या अध्यायात अमानित्व आणि अदंभित्व ही पहिली दोन लक्षणे सांगितली आहेत. त्याचप्रमाणे काम, क्रोध, लोभ इत्यादी आसुरी भावांचाही साधकाने आपले अंतरंग शोधून त्याग केला पाहिजे. श्रीसमर्थांनी केवळ सत्याचा अभिमान हाच निरभिमान म्हणून मान्य केला आहे. "सत्याचा जो साभिमान। तो जाणावा निरभिमान॥" दासबोध १५.१.२१॥ सत्याच्या अभिमानाप्रमाणे साधकाला आपल्या सद्गुरूंचाही अभिमान असावा; मात्र इतर साधू सत्पुरुषांना त्या अभिमानापोटी हीन लेखू नये. आपल्या गुरूंची कोणी निंदा करू लागले तर विकारवश होऊन वाद घालत न बसता त्याने तेथून उठून जावे. कारण संतांची निंदा करणाऱ्याला पाप लागतेच पण ती ऐकणाराही त्या पापात वाटेकरी होतो.

अभिमान सोडण्याचा अभ्यास करताना तो का सोडावयाचा हे साधकाने प्रथम समजून घेतले पाहिजे. मागे २७ व्या सूत्रात आपण पाहिले की भगवंताला अभिमान आवडत नाही, लीनता आवडते. म्हणून अभिमान हा भगवंताच्या दर्शनात अडथळा आणतो हे लक्षात घेऊन साधकाने तो विचाराने व विवेकपूर्वक घालविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्यासाठी मृत्यूनंतर आपल्याला या जगात जे जे सोडून जावयाचे आहे ते ते मनाने बाजूला करण्याचा अभ्यास करावा. हे करता आले, आपली विद्वत्ता, पैसा, कुल, नातेवाईक, शरीर इत्यादी सर्व मनाने बाजूला करता आले तर साधकाचा अभिमान क्षीण होईल. ज्या ज्या गोष्टींचा आपल्याला अभिमान वाटतो त्या तात्पुरत्या आणि नाहीशा होणाऱ्या आहेत हे त्याच्या लक्षात येईल. कालाच्या ओघात मोठमोठी माणसे विस्मृतीत जातात. शरीर, बुद्धी, विद्या, पैसा, अधिकार, कुळ इत्यादींचा माणसाला जेव्हा अभिमान वाटतो तेव्हा तो परमात्मस्वरूपापासून दूर जातो; अनंत आहे तो मर्यादित होतो. अभिमानाच्या उपाधीप्रमाणे मी कुरूप आहे, दरिद्री आहे, अडाणी आहे इत्यादी उपाधीदेखील रहाता कामा नये. कारण भगवंताच्या प्रेमाला कोणतीही

उपाधी सहन होत नाही. "चाखा चाहै प्रेमरस, राखा चाहै मान। एक म्यानमें दो खडग, देखे सुने न कान॥"

साधकाला देखील व्यवहारापुरता दिखाऊ अभिमान ठेवावा लागेल पण मनातून तो लीन राहील. "नम्र जाला भूतां। तेणें कोंडिलें अनंता॥" असे तुकाराम महाराज सांगतात. अभिमानाच्या मुळाशी खोटा मी आणि त्या खोट्या मी चा मी कर्ता हा भाव असतो. भगवद्गीतेच्या सोळाव्या अध्यायात अभिमानी माणसांचे उत्कृष्ट वर्णन केले आहे. तो म्हणतो, "आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योस्ति सदृशो मया। यक्षे दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः॥" १६.१५॥ (मी मोठा धनिक, थोर कुळात जन्म पावलेला आहे; माझ्यासारखा दुसरा कोण आहे? मी यज्ञ करीन, दान देईन, आनंद करीन अशा प्रकारे अज्ञानाने मोहित झालेले असतात.) सर्वसामान्य कर्माचा अभिमान जाईल पण सत्कर्माचा अभिमान जाणे फार कठीण असते. श्रीमहाराज एका प्रवचनात (९ डिसेंबर) सांगतात, "ज्ञानी आणि अज्ञानी यांच्यात मुख्य फरक म्हणजे, ज्ञानी अभिमान टाकतात तर अज्ञानी लोक तो वाढवतात. अभिमानासारखा मोठा शत्रू नाही. अंतरंगातल्या या शत्रूचा आपण शोध घ्यावा आणि त्याचा योग्य बंदोबस्त करावा. नुसत्या सत्कर्मांनी अभिमान जात नसतो. सापाला दूध घातले तरी त्याचें विषच होते. अभिमानाला कोणतेंही कृत्य घाला, तो वाढतच जातो. आतां याकरितां सत्कर्मे करण्याचे सोडावें असें नाहीं, परंतु अभिमान न बाळगतां तीं करावींत. 'मी कर्ता' ही भावना सोडावी." ही भावना सुटली म्हणजे साधकाच्या अंगी सहजपणे लीनता येते. सत्पुरुष अती लीन असतात. त्यामुळे त्यांचा सहवास हवा हवासा वाटतो. समर्थ म्हणतात, "अती लीनता सर्वभावें स्वभावें। जना सज्जनालागिं संतोषवावें॥" मनाचे श्लोक १०२॥ जुन्या दासबोधात ते सांगतात, "लीनतेसारिखें रत्न। उदंड केला जरी यत्न। तरी न जोडे परि प्रयत्न। केला पाहिजे॥" नम्रता अंगी बाणलेला भक्त कसा वागतो? ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "कां फळलिया तरूची शाखा। सहजें भूमीसी उतरे देखा। तैसें जीवमात्रां अशेखां। खालावती ते॥ अखंड अगर्वता होऊनि असती। तयांतें विनयो हेचि संपत्ती॥" ज्ञानेश्वरी अ. ९.२२५,२२६॥

अभिमानाप्रमाणे दंभाचा आणि एकूण आसुरी संपत्तीचा त्याग करावा हे सांगण्यासाठी नारदानी 'आदिकं' या पदाची योजना केली आहे. दंभाबद्दल श्रीमहाराज म्हणत, "परमार्थ करू नका, पण ढोंगाने काही करू नका." जे मी नाही ते आहे असे दाखवणे म्हणजे ढोंग. व्यवहारात काही प्रमाणात ढोंग करावे

लागते. उदाहरणार्थ, नको असलेला पाहुणा आला तर त्याचे हसून स्वागत करावे लागते. पण परमार्थात ढोंग उपयोगाचे नाही. ढोंगी साधूला त्याचे ढोंग न समजल्यामुळे खरा साधू मानणाऱ्या साधकांचे नुकसान होतेच पण साधूचे ढोंग करणाऱ्याचेही पारमार्थिक नुकसान होते. म्हणून श्रीमहाराज म्हणाले की काही केले नाहीत तरी चालेल पण 'बुवा' होण्याच्या फंदात पडू नका. दंभाप्रमाणे कपटामुळेही साधकाचे फार नुकसान होते. भगवद्गीतेत आसुरी संपत्ती सांगताना सुरुवातच दंभ, दर्प आणि अभिमान या दुर्गुणांनी केली आहे. दंभरहित पुरुष कसा असतो ते ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायात सांगितले आहे. "आढ्यु आतुडे आडवीं। मग आढ्यता हारवी। नातरी कुळवधू लपवी। अवेवांतें ॥२०५॥ ना ना कृषिवळु आपुलें। पांघुरवी पेरिलें। तैसें झांकी निपजले। दानपुण्य॥" २०६॥ दांभिक माणूस थोड्याशाही दानाची जाहिरात करतो तर दंभरहित साधक केलेल्या दानाचा कधीही उच्चार करीत नाही. इतकेच नव्हे तर ते दान देताना किंवा सेवा करताना आपण ही भगवंताचीच सेवा करतो आहोत असा भाव ठेवून ज्याला दान देतो अथवा अन्य सेवा करतो त्याने ईशसेवा करण्याची संधी दिली म्हणून कृतज्ञता व्यक्त करतो. दंभामुळे अहंकार वाढून साधकाचा नाश होतो.

आपण पाहिले की 'आदिकं' म्हणताना नारदांनी दर्प म्हणजे मस्ती, क्रोध, निष्ठुरता, अज्ञान या अन्य आसुरी गुणांचाही त्याग करावा असा निर्देश केला आहे. आसुरी संपदेचा सूक्ष्म लेश देखील परमार्थाला हानिकारक असतो. म्हणून हे दुर्गुण कसे टाकावे ते नारद पुढील सूत्रात सांगत आहेत.

## ३.५ : भक्तीमधील ग्राह्य गोष्टी

### सूत्र पासष्टावे

**तदर्पिताखिलाचारः सन् कामक्रोधाभिमानादिकं तस्मिन्नेव करणीयम् ॥६५॥**

**तद् - अर्पित - अखिल - आचारः सन्= सर्व आचार व्यवहार त्याला (भगवंताला) अर्पण करूनही. काम-क्रोध-अभिमान-आदिकम्= काम, क्रोध, अभिमान इत्यादी विकार (उद्भवले तर) तस्मिन्- एव - करणीयम्= त्याच्यासाठीच, त्याच्या ठिकाणीच समर्पण करावे - त्यालाच त्या विकारांचा विषय बनवावे.**

**आपले सर्व आचार, व्यवहार भगवंताला अर्पण करूनही काम, क्रोध, अभिमान इत्यादी विकार उद्‌भवले तर तेही भगवंताच्या ठिकाणी समर्पित करावे.**

**विवरण :** मागे भक्तिलक्षणे सांगताना व्यास, गर्ग व शांडिल्य यांची त्यासंबंधीची मते सांगून नंतर नारदांनी तदर्पिताखिलाचारिता आणि तद्विस्मरणे परमाव्याकुलता असे १९ व्या सूत्रात सांगितले. मुख्य भक्त आपली सर्व कर्मे समर्पण भावाने करतात. त्याचप्रमाणे गौण भक्ती असलेले साधकही आपली कर्मे समर्पण भावाने करण्याचा प्रयत्न करतात. तथापि हा प्रयत्न चालू असताना त्यांचे विकार त्यांना त्रास देतात म्हणून नारद सांगतात की ते विकारही भगवंताच्या चरणांवर वाहावेत किंवा त्या विकारांचाही भगवंत हाच विषय करावा.

कर्मे केल्याशिवाय माणूस जगू शकत नाही. कर्मातून निर्माण होणाऱ्या बंधनातून मोकळे होण्यासाठी सर्व कर्मे भगवंताला अर्पण केली म्हणजे त्याची शुभाशुभ फले कर्त्याला बंधनकारक होत नाहीत. केवळ स्थूल देहाने होणारे आचार, येवढेच नव्हे तर सूक्ष्म देह, मन, बुद्धि व प्राणादिकांकडून होणारे व्यवहारही भगवंताला समर्पण करणे म्हणजे भक्ती होय. दान, दक्षिणा, देणगी इत्यादींमध्ये फलासक्ती असते तर समर्पणात केवळ निरपेक्ष प्रेम असते. प्रेमात स्वार्थ नसतो आणि कष्ट नसतात. प्रत्येक कर्म करताना भगवंताची आठवण रहाण्यासाठी, कर्म करताना भगवंताला अथवा सद्‌गुरूंना सांगून करावयाची सवय लावून घेतली तर सर्व काळ त्याचे स्मरण राहाते व मी कर्ता हा भाव क्षीण होत होत शेवटी नाहीसा होतो.

आता ह्या सूत्रात नारद सांगतात की सर्व आचार भगवंताला अर्पण केल्यानंतरही जर काम, क्रोध, अभिमानादि विकार राहिले तर तेही भगवंताच्या चरणीं अर्पण करावे. हे कसे करावयाचे? तुकाराम महाराज एका अभंगात सांगतात, "काम क्रोध आम्हीं वाहिले विठ्ठलीं। आवडी धरिली पायांसवे ॥ १ ॥ आतां कोण पाहे मागें परतोनी। गेलें हारपोनी देहभाव ॥ २ ॥ रिद्धिसिद्धि सुखें हाणितल्या लाता। तेथें या प्राकृता कोण मानी ॥ ३ ॥ तुका म्हणेज आम्ही विठोबाचे दास। करूनि ठेलों ग्रास ब्रह्मांडाचा" ॥ ४ ॥ काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मात्सर्य हे सहा विकार साधकाला त्रास देतात. बिळात धूर गेला तर बिळातला साप जसा खवळून बाहेर येतो तसे नामस्मरण सुरू करून भगवदर्पण बुद्धीने कर्मे करू पाहाणाऱ्या साधक भक्तास तर ते जास्तच त्रास देतात. पण

अशा वेळी साधकाने धैर्याने व उत्साहाने आपला विवेक जागा ठेवून हे विकार भगवंताच्या पायी वाहावे. श्रीमहाराजांनी म्हटले आहे की गुळाला चिकटलेल्या डोंगळ्याला काढायचा प्रयत्न केला तर तो तुटतो पण गुळातून निघत नाही; मात्र त्याच्या नाकावर तेलाचा थेंब सोडला की तो आपोआप बाहेर निघतो. त्याप्रमाणे षड्विकारांच्या अंमलाखाली प्रपंचाला चिकटलेल्या माणसाने जर मुखाने भगवंताचे नाम सतत घेतले तर तो विनाकष्ट प्रपंचातून मोकळा होतो. म्हणून साधकाने सर्व कर्मे करताना ती भगवंताला अथवा सद्गुरूंना सांगून करण्याचा अभ्यास करावा आणि त्यांच्या पायांवर डोके ठेवून "जैसा तैसा तुझा दास। न करी उदास मायबापा॥" अशी विनवणी करावी. मी कसाही असेन पण तुझा आहे असे त्याला कळवळून सांगावे. गोकुळातून परतणाऱ्या उद्धवाला श्रीकृष्णासाठी निरोप देणाऱ्या गोपी म्हणतात, त्या मनमोहनाला सांगा की आम्ही "भली हैं बुरी हैं औ सलज्ज निर्लज्ज हूँ हैं। जो कहे सो हैं पै परिचारिका तिहारी हैं॥"

काम क्रोधादि विकार अतिशय खादाड आणि पापी आहेत असे भगवद्गीतेत म्हटले आहे. त्यांच्या या दुर्गुणांबद्दल ज्ञानेश्वर महाराज सांगतात, "जयांसि भुकेलियां आमिषा। हें विश्व न पुरेचि घांसा। कुळवाडी यांची आशा। चाळीत असें॥" ३.२४६॥ ...यांनी "साध्वी शांति नागविली। मग माया मांगी शृंगारिली। तियेकरवीं विटाळविलीं। साधुवृंदें॥" ३.२५१॥ ह्या विकारांचे दमन करणे मोठ्या शक्तीचे आणि सावधानतेचे काम आहे. हे विकार एखाद्या बेसावध क्षणीं उफाळून आल्यामुळे ऋषींची कित्येक वर्षांची तपश्चर्या धुळीस मिळाल्याची उदाहरणे पुराणात आढळतात. म्हणून सामान्य साधकाने त्यांच्या दमनाचा प्रयत्न न करता ते भगवंताकडे वळविण्याचा, त्यांचे उन्नयन (sublimation) करण्याचा प्रयत्न करावा. कर्तृत्वाचा अहंकार भगवंताकडे वळवला तर भगवंत तो नाहीसा करतो. म्हणूनच त्याला दर्पहा म्हणतात. भांडण करण्याची ऊर्मी आली तर भगवंताशीच भांडावे. त्याने दिलेले विकार आवरायला त्यालाच सांगावे. तुकाराम महाराज, जनाबाई यांनी वेळोवेळी भगवंताला जाब विचारला आहे, येवढेच नाही तर प्रसंगानुसार शिव्याही दिल्या आहेत! एका अभंगात तुकाराम महाराज म्हणतात, "कामक्रोध माझे लावियेले पाठीं। बहुत हिंपुटी झालों देवा ॥१॥ आवरितां तुझे तुज नावरती। थोर वाटे चित्तीं आश्चर्य हें॥" विठ्ठलाला बजावतात की "आमुचिया भावें तुज देवपण। तें कां विसरोन राहिलासी ॥१॥"... "तुका म्हणे तुम्हां लाज येत नाहीं।

आम्हां चिंताडोहीं बुडवितां॥" तसेच "काशासाठीं आम्हीं जाळला संसार। न करा विचार ऐसा देवा॥" असे त्याला विचारतात. धुणे, पाणी, दळण, कांडण करतांना अनंताला आळविणारी जनाबाई चिडून एका अभंगात विठ्ठलाला "अरे विठ्या अरे विठ्या। मूळ मायेच्या कारट्या" अशी साद घालून भांडण सुरू करते. अशा प्रकारे प्रपंचात गुंतविणाऱ्या विकारांचा विषयही भगवंत करून ते विकार त्याच्याकडे वळवावेत म्हणजे भगवंत हे त्या विकारांचे एकमेव केन्द्र झाल्यामुळे त्यांचे उन्नयन होते. "तात्पर्य कामक्रोधअभिमानादि विकार मनात न येतील तर उत्तमच, आल्यानंतर त्यांचा त्याग करता आला तर फारच उत्तम, पण तोही न होऊ शकला तर तिसरा महत्त्वाचा उपाय या सूत्रात सांगितला आहे की विकारांचा विषय केवल श्रीहरीच व्हावा, म्हणजे ते नष्ट होतात, किंवा राहिले तर बाधक न होता साधकच होतात." (नारद भक्तिसूत्र विवरण - धुंडामहाराज देगलूरकर पृष्ठ ३७९)

## सूत्र सहासष्टावे

**त्रिरूपभङ्गपूर्वकं नित्यदासनित्यकान्ताभजनात्मकं वा**
**प्रेमैव कार्यम्, प्रेमैव कार्यम् ॥६६॥**

**त्रिरूपभङ्गपूर्वकम्= त्रिपुटीचा भेद (नाश) करून. नित्य-दास नित्य-कान्ता भजन-आत्मकम् वा= सर्वकाळ दासभाव किंवा कांताभाव मनामध्ये (हृदयामध्ये) धारण करून. प्रेम एव कार्यम्= प्रेमच करावे. प्रेम एव कार्यम्= प्रेमच करावे.**

**त्रिपुटीचा (त्रिविधा गौणी भक्तीचा) भंग म्हणजे नाश अथवा लय करून सर्वकाळ भगवंताचा दास आहे अथवा त्याची कांता आहे असा भाव धारण करून त्याच्यावर प्रेमच करावे, प्रेमच करावे.**

**विवरण :** मानवी व्यवहाराला नेहमी तीन अंगे असतात. उदाहरणार्थ, एखाद्या माणसाचे लग्न झाले तर (१) ज्याचे लग्न झाले तो नवरा, (२) ज्या स्त्रीशी लग्न झाले ती बायको, आणि (३) त्या दोघांमधील दृष्टीला न दिसणारा नवरा-बायकोपणाचा संबंध. ह्या तीन अंगांप्रमाणेच (१) जो जाणून घेणार असतो तो ज्ञाता, (२) जे जाणून घ्यावयाचे असते ते ज्ञेय, आणि (३) जे जाणले जाते ते दृष्टीला न दिसणारे ज्ञान ही त्रिपुटी सांगता येईल. किंवा सेवा करताना (१) ज्याची सेवा करावयाची तो भगवंत किंवा स्वामी, (२) जो सेवा करतो तो भक्त किंवा दास, आणि (३) त्या दोहोंमध्ये असणारा सेवेचा संबंध

ही त्रिपुटी आहे. सांख्यांच्या तत्त्वज्ञानामध्ये सत्त्व, रज, तम ही त्रिपुटी आहे. (१) वस्तूची उत्तम अवस्था (२) वस्तूची अशुद्ध अवस्था, व (३) वस्तूला अशुद्धाकडून शुद्धाकडे नेणारा प्रकृतीचा स्वभाव -रजोगुण ही देखील त्रिपुटी आहे. अशुद्धातून शुद्धाकडे जाण्यासाठी कर्म करावे लागते. रजोगुण कर्माला प्रवृत्त करतो. त्रिपुटी किंवा हे त्रिरूप लक्षात घेऊन आता ह्या सूत्रात त्रिपुटीचा भंग म्हणजे नाश करून भगवंताशी (अथवा सद्‌गुरुंशी) नित्य सेवेचा अथवा नित्य कांताभावाचा संबंध जोडावयाचा म्हणजे काय ते पाहू.

सेवा करताना मी सर्वस्वी भगवंताचा दास आहे. ह्या दास्यत्वाखेरीज वेगळे असे माझे अस्तित्व नाहीच असा भाव आला की सेवक, सेव्य व सेवा या त्रिपुटीचा भंग होतो. भक्ताच्या सेवेला मर्यादा राहिली नाही म्हणजे सेवा त्याचे संपूर्ण जीवन व्यापते. एका गुरूंचे दोन शिष्य होते. गुरूंची सेवा करताना कोणी काय करावयाचे ते त्यांनी ठरविले होते. एकजण गुरूंना आंघोळीसाठी पाणी काढून देत असे तर दुसरा त्यांचे कपडे सांभाळीत असे. एक दिवस आंघोळीसाठी पाणी देणारा शिष्य बाहेर गेला होता म्हणून गुरूंनी दुसऱ्या शिष्याला पाणी काढावयाला सांगितले; तेव्हां तो म्हणाला, 'ते माझे काम नाही'! याला सेवा म्हणता येणार नाही. सेवा करताना त्या सेवेमुळे काही मिळावे अशी खऱ्या सेवकाची अपेक्षा नसते. सेवा केल्याशिवाय त्याला राहावत नाही, इतकेच नव्हे तर माझ्या गुरूंची सर्व सेवा माझ्याकडून घडावी असे त्याला वाटत असते. अशा सत्शिष्याचे एकनाथ महाराजांनी भागवताच्या बाराव्या अध्यायात वर्णन केले आहे. "गुरु भगवंत दोन्ही एक। येणें भावें निज निष्टंक। भजे तोचि गुरुसेवक। येरू तो देख अनुमानी ॥५०१॥ करावया गुरुसेवे। मनापुढें देह धांवे। एकला करीन सर्व सेवे। येवढे हांवे उद्यतू ॥५०२॥ ...नित्य करिता गुरुसेवा। प्रेम पडिभरू नीच नवा। सद्भावाचिया हांवा। गुरुचरणीं जीवा विकिलें ॥५०६॥ ...तहान विसरली जीवन। क्षुधा विसरली मिष्टान्न। करितां गुरुचरण संवाहन। निद्रा जाण विसरला ॥५०८॥ जांभयी यावयापुरती। सवडी उरेना रिती। तेथें निद्रेलागीं केउती। राहावया वस्ती मिळेल ॥५०९॥ मुखीं सद्गुरूचें नाम। हृदयीं सद्गुरूचें प्रेम। देहीं सद्गुरूचें कर्म। अविश्रम अहर्निशीं ॥५१०॥ गुरुसेवेसी गुंतलें मन। विसरला स्त्री पुत्र धन। विसरला मनाची आठवण। मी कोण हें स्फुरेना॥" १२.५११॥ अमुकच सेवा करावयाची असे सेवेचे रूप राहिले नाही म्हणजे पडेल ती सेवा करताना सेवक स्वतःला विसरतो. इराणचा एक बादशाहा सूफी पंथाचा अनुयायी होता. त्याने

एक गुलाम विकत घेतला. त्याने गुलामाला विचारले, 'तुझे नांव काय?' गुलाम म्हणाला, 'तुम्ही ठेवाल ते.' बादशहाने विचारले, 'तू काय काम करतोस?' गुलाम म्हणाला, 'आपण सांगाल ते.' 'तू कपडे कोणते वापरणार?' गुलाम म्हणाला, 'तुम्ही द्याल ते.' गुलामाची ही उत्तरे ऐकून बादशहाने सिंहासनावरून खाली उतरून गुलामाला आलिंगन दिले आणि म्हणाला, 'तू माझा गुरु आहेस. अल्लाची सेवा कशी करायची ते तू मला शिकविलेस.' स्वामीमध्ये दासाचे स्वत्व विलीन होणे हे भक्तीचे मर्म आहे. तू ठेवशील तसा राहीन म्हटल्यावर तक्रारीला जागाच राहात नाही. श्री निळोबा एका अभंगात म्हणतात, "जेववाल तेंचि जेवीन मुखें। पांघरवाल सुखें पांघरेन ॥ १॥ बैसवाल तेथें बैसेन उगा। निजवाल जागा न सोडीं तो ॥ २॥ जैसे कराल मी होईन तैसा। न करूनियां आशा आणिकांची ॥ ३॥ निळा म्हणे जे कराल तें तें। होईल आज्ञेतें नुलंघीं ॥ ४॥" मी नाहीसा झाल्यानंतर दासाची अशी अवस्था होते. अशा प्रकारे दासाचे स्वत्व स्वामीत विलीन होणे म्हणजे त्रिपुटीचा नाश होय. सद्गुरूंवर अथवा भगवंतावर खरे प्रेम केल्याखेरीज दास्यभाव येत नाही आणि दास्याशिवाय प्रेम येत नाही. प्रेम आणि दास्य हे भाव परस्परावलंबी आहेत. इंग्रजीत याला Reciprocal or mutual causation म्हणतात.

प्रपंचातील प्रेम व दास्य आणि परमार्थातील प्रेम व दास्य यांमध्ये एक महत्त्वाचा फरक आहे. प्रपंचात देणे आणि घेणे दोन्ही असते तर परमार्थात फक्त देणे असते. आपले सर्व भगवंताला निरपेक्ष होऊन अर्पण करता आले पाहिजे. श्री कृष्णप्रेम यांनी म्हटले आहे "the greatest mantra I have learnt from my Guru - GIVE EVERYTHING, ASK NOTHING the supreme key to His Heart's treasury." (Yogi Sri Krishnaprem page 129) आपल्या देण्याची भगवंताला जाणीव आहे अथवा नाही याचा विचारही खरा भक्त करीत नाही. प्रपंचातील दास्याचे स्वरूप नोकरीचे अथवा गुलामगिरीचे असते. परमार्थातील दास्यही गुलामगिरीच असते पण ती दिव्य गुलामगिरी (sublime slavery) असते. "मैं गुलाम, मैं गुलाम, मैं गुलाम तेरो। तू साहब मेरो॥" असे भक्त अभिमानाने म्हणतो. समर्थ रामदास म्हणतात "सेवकू मानवीयांचे कष्टती बहुतांपरी। सेविला देव देवांचा तेणें मी धन्य जाहलों॥ दास्य भक्तीचा चमत्कार असा की ती सिद्ध झाली की देवच भक्ताचा दास होतो. नाथांच्या घरी पाणी भरतो, चंदन उगाळतो, जनाबाईबरोबर कामे करू लागतो. एका

अभंगात ती सांगते, "झाडलोट करी जनी। केर भरी चक्रपाणि ॥१॥ पाटी घेऊनि डोईवरी। नेऊनिया टाकी दुरी ॥२॥ ऐसा भक्तीसी भुलला। नीच कामें करूं लागला ॥३॥ जनी म्हणे बा विठ्ठला। काय उतराई होऊ तुला ॥४॥" हनूमान हा दास्य भक्तीचा आदर्श मानला जातो. म्हणून तुकाराम महाराज त्याला विनवितात की "शरण शरण जी हनुमंता। तुज आलों रामदूता ॥१॥ काय भक्तीच्या त्या वाटा। मज दावाव्या सुभटा ॥२॥" मारुतीरायानी श्रीरामांजवळ अखंड दास्याचीच याचना केली. त्याच्या या दास्य सेवेसंबंधी श्रीराम त्याला म्हणाले, "एकैकस्योपकाराय प्राणान्दास्यामि ते कपे। शेषस्येहोपकाराय भवामि ऋणिनो वयम्॥" (हे मारुते, तू केलेल्या एक एका उपकाराबद्दल मी माझे प्राण अर्पण करीन. पण ते पांचच आहेत. म्हणून राहिलेल्या उपकारांकरिता मी तुझा कायम ऋणी राहीन.) भरतालाही ते सांगतात की "भरतभाई कपिसे उऋण हम नाहीं॥" काही वेळा दास्य भावातून सख्य भाव निर्माण होतो. दासाच्या निष्ठेमुळे प्रसन्न झालेला स्वामी त्याला आपला दास न मानता मित्र मानू लागतो. त्याला आज्ञा न करता त्याचा सल्ला घेऊ लागतो.

भगवंताला स्वामी मानून त्याची सेवा करण्यापेक्षा त्याला पति मानून त्याच्या सेवेत राहणे जास्त अवघड आहे. आणि त्याहीपेक्षा नवऱ्याला देव मानून त्याची सेवा करणे जास्त अवघड आहे. भगवंताचे मोठेपण भक्ताला मान्य असते. त्याबद्दल त्याच्या मनात संशय नसतो. पण पती हा चारचौघांसारखा सामान्य माणूस असताना त्याला देव मानणे किती कठीण असेल याची कल्पनाच केलेली बरी! म्हणूनच केवळ पतिव्रता पहाण्याच्या उद्देशाने श्रीमहाराज एकदा भारतभर हिंडले! व्रजातील गोपींनी श्रीकृष्णावर कांता भावाने प्रेम केले. मीराबाई श्रीकृष्णाला आपला पति मानत होती. "मेरे तो गिरिधर गोपाल दूसरो न कोई। जाके सिर मोर मुगट मेरो पति सोई॥" असे एका पदात ती सांगते. दुसऱ्या एका पदात ती म्हणते, "पिय बिन सून छै जी म्हारो देस॥" कबीराच्या बाबतीत वियोगाला जागाच नाही. तो म्हणतो, "न पल बिछुडें पिया हमसे, न हम बिछुडे पियारेसे। उन्हींसे नेह लागा है, हमनको बेकरारी क्या॥" एखाद्या श्रीमंत अधिकारी सद्गुणी माणसाने गरीबाच्या सामान्य मुलीशी लग्न केले तर तिच्या ठिकाणी जो कृतज्ञता भाव असतो तोच कांताभावात भक्ताचा भगवंतासंबंधी असतो. आणि त्यामुळे तो भगवंताला प्रिय होतो. ज्ञानेश्वरीत भगवंत सांगतात, "जीवु परमात्मा दोन्ही। बैसोनि

ऐक्यासनीं। जयाचा हृदयभुवनीं। विराजती॥ १२.१५३॥ अर्जुना गा तो भक्तु। तोचि योगी तोचि मुक्तु। तो वल्लभा मी कांतु। ऐसा पढिये ॥१२.१५६॥" तुकाराम महाराजही म्हणतात, "हाचि नेम आतां न फिरे माघारीं। बैसले शेजारीं गोविंदाचे ॥१॥ घररिघी झाले पट्टराणी बळें। वरिलें सावळे परब्रह्म ॥२॥ बळियाचा अंगसंग झाला आतां। नाहीं भय चिंता तुका म्हणे ॥४॥"

सेवा दास्यभावाने असो अथवा कांताभावाने असो ती कायावाचामनाने अखंड चालली पाहिजे. त्याखेरीज दुसरा कोणताही भाव असता कामा नये. म्हणून नारद प्रेमच करावे, प्रेमच करावे असे दोनदा सांगत आहेत. अनेक ठिकाणी वस्तू व व्यक्ती यांमध्ये वाटले गेलेले प्रेम एकत्र गोळा करून भगवंताकडे वळवावे. त्यासाठी आपल्या जीवनातील सर्व वस्तू आणि व्यक्ती भगवंतामुळे आहेत याचे निरंतर स्मरण असावे. प्रेमात आपलेपणा असतो. आपलेपणा का वाटतो ते सांगता येत नाही. म्हणजेच प्रेम अकारण असते. आपण सुखाचे भोग भोगत असताना तो जवळ असावा. त्याने त्या सुखात वाटेकरी होऊन सुख द्विगुणित करावे असे भक्ताला वाटते. त्याच्याही पुढची पायरी म्हणजे माझे काहीही होवो पण तू सुखात असावेस असे भक्ताला वाटते. मग प्रपंचामध्ये जे जे काही चांगले, वाईट, भाग्याचे, दुःखाचे घडते त्यात मी नाही; हे सारे तुझे आहे, तुझ्यामुळे आहे अशी भक्ताची खात्री होते. मग 'जहाँ देखे वहाँ तूं ही तूं है' अशी त्याची अवस्था होते. हे कसे करावयाचे ते श्रीमहाराजांनी सांगितले आहे. ज्याप्रमाणे गढूळ पाण्यात निवळी घातली की गाळ खाली बसून स्वच्छ पाणी मिळते त्याप्रमाणे प्रपंचाच्या प्रेमामध्ये भगवंताचे स्मरण घातले तर अशुद्ध प्रेमाचा गाळ खाली बसून भगवंताचे शुद्ध प्रेम वर राहते.

त्रिरूपभंग याचा काहींनी गौणी भक्तीचा त्याग करून मुख्य भक्तीत प्रवेश असा अर्थ केला आहे. ५६व्या सूत्रात नारदानी गौण भक्ती गुण भेदाने म्हणजे सत्त्व, रज व तम या गुणांवर आधारित किंवा आर्त, जिज्ञासू व अर्थार्थी या तीन प्रकारची असते असे सांगितले व त्यानंतर अशा भक्तांनी काय करावे काय टाळावे हे सांगितले आहे. म्हणून ह्या त्रिरूपाचा भंग म्हणजे नाश अथवा लय करून नित्य दासभाव अथवा कांताभाव ठेवून गौण भक्तीतून श्रेष्ठ भक्तीकडे जावे. यासाठी भगवंतावर प्रेम करणे, केवळ प्रेमच करणे हा मार्ग आहे. मायेच्या पाशातून सुटल्याखेरीज त्रिपुटीचा भेद होत नाही आणि भगवंताला शरण गेल्याखेरीज माया पाश सुटत नाही. म्हणून भगवंतावर प्रेम करावे, त्याला

शरण जावे आणि दास्यभाव अथवा कान्ताभाव धारण करून भक्ती करावी. येथे नारदानी गौण भक्तीचा विषय संपविला आहे.

यानंतर पुढील सात सूत्रांत नारदांनी मुख्य भक्तांचे लक्षण व त्यांचा महिमा सांगितला आहे.



## अध्याय चौथा

# मुख्य भक्त लक्षण

### ४.१ : मुख्य लक्षण

### सूत्र सदुसष्टावे

**भक्ता एकान्तिनो मुख्याः ॥६७॥**

**भक्ताः= भक्त. एकान्तिनाः= एकनिष्ठ. मुख्याः= मुख्य.**

**भगवंताची एकनिष्ठपणाने भक्ती करणारे भक्त हे मुख्य भक्त होत.**

विवरण : भक्तिसूत्रांच्या सुरुवातीला नारदांनी भक्तीसंबंधी आणि सिद्ध भक्तांसंबंधी सांगितले. पुढे छप्पन्नाव्या सूत्रात गौण भक्तीसंबंधी सांगितले. बरेच साधक गौण भक्तीने सुरुवात करून हळूहळू प्रगती करत भगवत्कृपेने श्रेष्ठ भक्त होतात. हे श्रेष्ठ अथवा मुख्य भक्त कसे असतात; कसे वागतात ते नारद आता सांगत आहेत. एकान्त भक्ती ही भक्तीची चरम सीमा असून अशी भक्ती करणारे भक्त सर्व भक्तांमध्ये मुख्य होत असे त्यांनी या सूत्रात सांगितले आहे. अशा सर्वश्रेष्ठ भक्तांना संत अथवा भागवत म्हणतात. "यदैकान्त्यं गता विष्णौ भगवत्यात्मभावने। तद्वैष्णवा भागवताः सन्त इत्यभिधीयते॥" संतपदी पोचलेले भक्त थोडेच असले तरी अगदी एखादाच नसतो म्हणून नारदांनी या सूत्रात बहुवचनी पदांची योजना केली आहे.

एकान्तिन् म्हणजे (१) एकांताची आवड असलेला आणि (२) एकनिष्ठ. साधनकालात पहिला अर्थ जास्त योग्य ठरतो, तर दुसरा अर्थ सिद्ध भक्तांसाठी योग्य आहे. ज्याला भगवंताची आवड वाटू लागते, त्याच्याबद्दल प्रेम वाटू लागते त्याची प्रपंचाची व लौकिक व्यवहाराची आवड कमी होऊ लागते. भगवंताखेरीज दुसऱ्या वस्तू व व्यक्तींविषयीचे त्याचे प्रेम ओसरू लागल्यामुळे त्याला लोकांपासून दूर एकांतात जावे असे वाटू लागते. एकांतात त्याच्या साधनेत झपाट्याने वाढ होऊ लागते. एकांत मानला ज्याला। अवघ्यांआधी कळे त्याला॥ असे समर्थ सांगतात तर ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "बहु एकांतावरी प्रीति। जया जनपदाची खंती। जाण मनुष्याकारें मूर्ती। ज्ञानाची तो॥" ज्ञानेश्वरी १३.६१३॥ येथे ज्ञान म्हणजे आत्मज्ञान अभिप्रेत आहे. एकांतात मनाची एकाग्रता लवकर साधते. म्हणून प्रापंचिक साधकाने आपल्या दिनक्रमात थोडा वेळ तरी अगदी एकटे, आपण आपल्याशी रहाण्याचा अभ्यास

केला पाहिजे. यावेळी फक्त मी आणि माझा देव येवढाच विचार मनात असावा. या अभ्यासामुळे धारणाशक्ती वाढते आणि नाम घेता घेता ज्याचे नाम घेतो त्याच्याशी साधकाची वृत्ती तदाकार होते. एकांतामुळे आणि मौनामुळे मनाची शक्ती वाढते आणि साधनात प्रगती होते.

एकान्तिन् म्हणजे एकनिष्ठ भक्ताच्या जगात त्याच्या आराध्याखेरीज दुसरे काही राहातच नाही. जागृती स्वप्नीं पांडुरंग अशी सुरुवात झालेला एकनिष्ठ भक्त मग चौथ्या म्हणजे तुरीय अवस्थेत जातो आणि त्यानंतर भगवंताशी तादात्म्य पावतो. ह्या शब्दातीत अवस्थेचे वर्णन करताना तुकाराम महाराज म्हणतात, "लवण मेळवितां जळें। काय उरलें निराळें ॥ १ ॥ समरस झालों। तुजमाजी हरपलो ॥ २ ॥ अग्निकर्पूराच्या मेळीं। काय उरली काजळी ॥ ३ ॥ तुका म्हणे होती। तुझी माझी एक ज्योती ॥ ४ ॥" अशी एक ज्योत झाली मी तूंपण नाहीसे झाले की आनंदाचे डोहीं आनंदतरंग उठतात. एकनिष्ठ भक्ताची अवस्था कशी असते ते ज्ञानराज सांगतात, "जीवु परमात्मा दोन्ही। बैसोनि ऐक्यासनीं। जयाचा हृदयभुवनीं। विराजती॥" ज्ञानेश्वरी १२.१५३॥ हृदयस्थ परमात्म्याची ओळख पटल्यानंतर भक्ताला तो प्राणिमात्रात दिसू लागतो. त्याच्या भक्तीची ही परिणती "जें जें भेटे भूत। तें तें मानिजे भगवंत। हा भक्तियोगु निश्चित। जाण माझा॥" १०.११८॥ या ज्ञानेश्वरीतील ओवीत सांगितली आहे. अशा प्रकारे भक्ताला एकांतभक्तीच्या महाभावाचा अनुभव येऊन त्यात तो स्थिर झाला म्हणजे तो मुख्य भक्त किंवा एकांतभक्त म्हणून ओळखला जातो. या एकान्तभक्तीचे स्वरूप उद्धवास सांगताना भगवान श्रीकृष्ण म्हणतात, "ऐक एकान्तभक्तीची मातु। देव भक्तासी होय एकान्तु। भक्त रिघे देवाआंतु। देवभक्तांतु सबाह्य॥ २०.४०६ ॥ ऐसें अभेद माझें भजन। या नांव एकान्तभक्ति जाण। मजवेगळें कांहीं भिन्न। न देखें आन जगामाजीं॥ ४०७॥ ज्यासी चहू पुरुषार्थेसी मुक्ती। मी स्वयें देताहे श्रीपती। ते दुरोनि दृष्टी न पाहती। मा धरिती हातीं हें कदा न घडे ॥ ४०८॥ ते स्वमुखें कांहीं मागती। हें न घडे कदा कल्पांती। सांडूनि माझी एकान्तभक्ती। कैवल्य न घेती ते निजभक्त ॥ ४०९ ॥" एकनाथी भागवत अध्याय २०

ह्या गुणातीत भक्तीमध्ये लौकिक व्यवहाराचा किंवा स्वार्थाचा लवलेशाही नसतो. संतांना मुक्तीचीही अभिलाषा नसते. त्यांना भगवंतासाठीच भगवंत पाहिजे असतो. असा भक्त पहावयाला मिळाला तरी साधकांना त्याची मदत होते, त्यांच्या साधनात वाढ होते. हे मुख्य भक्त कसे असतात, त्यांचे वागणे कसे असते ते नारद आता पुढील दोन सूत्रांत सांगत आहेत.

## ४.२ : मुख्य भक्त गौरव

### सूत्र अडुसष्टावे

**कण्ठावरोधरोमाश्राश्रुभिः परस्परं लपमानाः**
**पावयन्ति कुलानि पृथिवीं च ॥६८॥**

**कंठावरोध= कंठ दाटून येणे. रोमाश्र= शरीरावर रोमांच उभे राहून. अश्रुभिः= डोळ्यांतून अश्रुपात होत असताना. परस्परं= एकमेकांशी. लपमानाः= बोलत असणारे (ते सिद्ध भक्त) पावयन्ति= पावन करतात. कुलानि= उभय कुळे. पृथिवीं= पृथ्वी. च= आणि.**

**प्रेमातिरेकामुळे कंठ दाटून येऊन शरीरावर रोमांच उभे राहिलेले असतांना आणि डोळ्यांतून अश्रू वहात असतांना सिद्ध भक्त बाष्पगद्गद स्वरांनी एकमेकांशी संभाषण करतांना उभय कुळे आणि पृथ्वी पावन करतात.**

**विवरण :** व्यवहारामध्ये माणूस प्रत्येक व्यक्तीकडे साधन म्हणून म्हणजे स्वार्थ दृष्टीने पहात असतो. एखाद्या माणसाची ओळख झाली तर त्याच्या मनात विचार येतो की असू दे, कोठे तरी केव्हा तरी उपयोग होईल. म्हणजे कोणत्याही व्यक्तीकडे व्यक्ती म्हणून निरपेक्षपणे तो पहात नाही; मग परमात्मस्वरूप म्हणून कोणाही व्यक्तीकडे पहाता येणे दूरच. हे साधण्यासाठी पहिली गोष्ट म्हणजे माणसाचा स्वार्थ कमी झाला पाहिजे. स्वार्थ कमी होण्यासाठी सत्संगतीचा खूप चांगला परिणाम होतो. संत म्हणजेच एकनिष्ठ भक्त अतीशय नीतिमान असतात. निस्वार्थी असल्यामुळे त्यांची जगाकडे पहाण्याची दृष्टी उदार असते. त्यांच्या सहवासात साधकाचा स्वार्थ विरघळू लागतो. म्हणूनच सत्संगती हे सर्वात श्रेष्ठ साधन आहे असे एकनाथ महाराजांनी भागवतात सांगितले आहे. तुलसी रामायणातही सत्संगती मोठ्या भाग्याने लाभते व विनाकष्ट संसाराचे बंधन तुटते असे म्हटले आहे. "बडे भाग पाइब सतसंगा। बिनहिं प्रयास होहिं भव भंगा॥" ७.३२.४॥ साधकाला संतांची भेट झाली तर इतका मोठा लाभ होतो. असे हे संत एकमेकांना जेव्हां भेटतात तेव्हा त्याचा काय परिणाम होतो ते या सूत्रात सांगितले आहे.

एकान्तभक्त म्हणजे मुख्य भक्त काही कारणाने एकत्र आले, एकमेकांना भेटले तर त्यांचे अष्टसात्त्विकभाव जागे होतात, भक्तिरसाचा महापूर वाहू लागतो आणि भगवद्गुण गायनात ते रंगून जातात. साहित्यशास्त्रात अष्ट

सात्त्विक भाव दिलेले आहेत ते असे : "स्तम्भः स्वेदोऽथ रोमाञ्चः स्वरभंगोऽथ वेपथुः। वैवर्ण्यमश्रुप्रलय इत्यष्टौ सात्त्विका मताः॥" (शरीर स्तब्ध होणे, घाम येणे, शरीरावरील रोम उभे राहाणे, वाणी गद्गद् होणे, कंप सुटणे, शरीराचा, विशेषतः चेहेऱ्याचा वर्ण बदलणे, डोळ्यांतून अश्रू वहाणे व शरीर व मन अविचल होणे हे आठ सात्त्विक भाव सांगितलेले आहेत.) ह्या सूत्रात फक्त तीन भावांचा उल्लेख केलेला असला तरी बाकीचे भावही या सूत्रात अभिप्रेत आहेत. अष्ट सात्त्विकभाव उत्पन्न होणे ही भक्तिप्रेमाच्या पूर्णतेजवळ गेल्याची खूण आहे. म्हणून नामदेव महाराज म्हणतात की "पुलक घर्म रोमांच नाहीं जंव उठिले। सजळ नाहीं झाले नयन जंव ॥ १ ॥ हरिभक्तिचें सुख कळलें जे म्हणतीं। लटिकें बोलिजेती उभयलोकीं॥" अष्ट सात्त्विकभाव उत्पन्न झालेले भागवत परस्परांशी बोलू लागले तर भगवंताच्या लीलांशिवाय, त्याच्या गुणवर्णनाशिवाय त्यांना दुसरा विषयच नसतो. श्रीएकनाथ महाराज सांगतात, "तेथ करितां कथानुवादु। परस्परें निजात्मबोधु। करितां गुह्यज्ञान संवादु। परमानंदु वोसंडे ॥५८३॥ तंव हरिकथेच्या आवडी। परस्परें श्रद्धा गाढी। सुखसंवाद परवडी। निजसुख गोडी चाखिती ॥५८४॥ ...सद्भावें निजभजन करी। हृदयीं प्रगटतां श्रीहरी। तंव देहीची चिन्हें बाहेरी। क्षणामाझारीं पालटती ॥५९०॥ ...चित्त चैतन्या होता भेटी। हर्षे बाष्प दाटे कंठीं। पुलकांकित रोमाञ्च उठी। उन्मीलत दृष्टी पुंजाळे॥५९२॥" नाथभागवत अ.३॥ ज्याच्या हृदयात भगवंताचे निःसीम प्रेम असते त्याच्याच ठिकाणी हे सात्त्विक भाव दिसू लागतात. त्यांच्यामुळे त्याची उभयकुळे तर पुनीत होतातच पण पृथ्वीही पवित्र होते असे नारद सांगतात. भागवतात श्रीकृष्ण उद्धवाला सांगतात की "वाग्गद्गदा द्रवते यस्य चित्तं रुदत्यभीक्ष्णं हसति क्वचिच्च। विलज्ज उद्गायति नृत्यते च मद्भक्तियुक्तो भुवनं पुनाति॥" भागवत ११.१४.२४॥ (ज्याची वाणी प्रेमातिशयाने सद्गदित होते, चित्त द्रवते, प्रेमाने जो रुदन करतो, क्वचित् हसतो, प्रेमभराने गातो, नाचतो, याप्रमाणे ज्याची माझ्या ठायी अष्ट सात्त्विकभावाने युक्त भक्ती असते तो त्रिभुवनाला पावन करतो.) संत, सत्पुरुष केवळ दृष्टीने, स्पर्शाने, प्रसाद देऊन अशा अनेक प्रकारांनी लोकांना भक्तिमार्गाला लावतात आणि जीवांचा उद्धार करतात.

भगवद्गीतेच्या दहाव्या अध्यायात आपल्या भक्तांविषयी भगवंत सांगतात की "मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम्। कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च" ॥१०.९॥ या श्लोकावरील टीकेत ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "चित्तें

मीचि जाहाले। मियांचि प्राणें धाले। जीवो मरों विसरले। बोधाचिया भुली ॥ ११९॥ मग तया बोधाचेनि माजें। नाचती संवादसुखाचीं भोजें। आतां एकमेकां घेपे दीजे। बोधचि वरी ॥ १२०॥ जैशीं जवळिकेंचीं सरोवरें। उचंबळलिया कालवती परस्परें। मग तरंगासि धवळारें। तरंगचि होती ॥ १२१॥ तैसी येरयेरांचिये मिळणी। पडत आनंद कल्लोळांची वेणी। तेथ बोध बोधाची लेणीं। बोधेंची मिरवी ॥ १२२॥ जैसें सूर्यें सूर्यातें वोवाळिले। की चंद्रें चंद्रम्या क्षेम दिधलें। नातरी सरिसेनि पाडें मीनले। दोनी वोघ ॥ १२३॥ तैसें प्रयाग होत सामरस्याचें। वरी वोसाण तरत सात्त्विकाचें। ते संवाद चतुष्पथींचे। गणेश जाहले ॥ १२४॥ तेव्हां तया महासुखाचेनि भरें। धांवोनि देहाचिया गांवाबाहेरें। मिया धाले तेणें उद्‌गारें। लागती गाजो ॥ १२५॥ ...जैसी कमळकळिका जालेपणें। हृदयींचिया मकरंदातें राखों नेणें। दे राया रंका पारणें। आमोदाचें ॥ १२७॥ तैसेनि मातें विधीं कथित। कथितेनि तोषें कथूं विसरत। मग तया विसरामाजीं विरत। आंगें जीवें ॥ १२८॥ ऐसें प्रेमाचेनि बहुवसपणें। नाहीं राती दिवो जाणणें। केलें माझें सुख अव्यंगवाणें। आपणपेया जिहीं ॥'' १२९॥ ज्ञानेश्वरी अध्याय १०

अशा एकनिष्ठ भक्तांमुळे जगाचा उद्धार कशा प्रकारे होतो ते नारद पुढील सूत्रात सांगत आहेत.

## सूत्र एकोणसत्तरावे

**तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि, सुकर्मीकुर्वन्ति कर्माणि,**
**सच्छास्त्रीकुर्वन्ति शास्त्राणि ॥ ६९॥**

**(ते परमभक्त) तीर्थानि= तीर्थांना, पवित्र स्थानांना. तीर्थीकुर्वन्ति= पवित्र करतात, तीर्थपणा देतात. कर्माणि= कर्मे. सुकर्मीकुर्वन्ति= सत्कर्मे करतात. शास्त्राणि= शास्त्रे. सच्छास्त्रीकुर्वन्ति= सत्‌शास्त्रे करतात.**

**ते परमभक्त इतके पवित्र असतात आणि त्यांची तारक शक्ती इतकी मोठी असते की ते तीर्थांना पावन करतात. (त्यांच्यामुळे तीर्थांना तीर्थपणा प्राप्त होतो.) ते कर्मांना सत्कर्मत्व देतात. (त्यांच्या हातून होणारी कर्मे ही सत्कर्मेच असतात) आणि शास्त्रांना सत्‌शास्त्रांचे स्वरूप प्राप्त होते.**

**विवरण : तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि**

सामान्यतः नद्यांचे संगम, सरोवरे, विशिष्ट सागरतीर, मंदिरे, पर्वत, गुहा इत्यादींना तीर्थ स्थाने आणि धर्मक्षेत्रे म्हणून ओळखले जाते. या पवित्र

स्थानांची यात्रा केल्यामुळे पाप नाहीसे होते व पुण्यलाभ होतो अशी भाविकांची श्रद्धा असते. अशी श्रद्धा नसणाऱ्या लोकांच्या दृष्टीने देवता मूर्ती म्हणजे विशिष्ट आकार दिलेला दगड आणि गंगेचे पवित्र जल म्हणजे केवळ पाणी असते. दैवी संपत्तीने श्रीमंत असलेल्या ब्रह्मनिष्ठांच्या, साधूसंतांच्या वास्तव्याने पवित्र झालेली स्थाने तीर्थक्षेत्रे होतात. ज्यांची संतांच्या ठिकाणी आणि ते जेथे राहिले त्या स्थानांसंबंधी पावित्र्याची भावना असते अशा साधकांना तीर्थयात्रा केल्यावर मानसिक समाधान लाभते. "तीर्थानामपि तत्तीर्थं संशुद्धिर्मनसः परा। न जलाप्लुतदेहस्तु स्नात इत्यभिधीयते॥ ...सर्वतीर्थेष्वपि स्नातः पापो मलिन एव च। न शरीरमलत्यागान्नरो भवति निर्मलः॥ मानसैस्तु मलैस्त्यक्तो भवत्यत्यन्त निर्मलः। विषयेष्वनिशं रागो मनसो मलउच्यते॥" (भावार्थ : मन अत्यंत शुद्ध होणे हे तीर्थांमध्ये श्रेष्ठ तीर्थ होय. केवळ पाण्यात देह बुडविण्याला कोणी स्नान म्हणत नाहीत. सर्व तीर्थांमध्ये स्नान करूनही मन पापी आणि मलीन राहिले तर अशा माणसाला केवळ शरीराचा मळ गेला आहे म्हणून निर्मळ म्हणता येत नाही. विषयांविषयी अत्यंत आवड हाच मनाचा मळ होय. ज्याने त्याचा त्याग केला आहे तोच खरा निर्मळ होय.) म्हणूनच केवळ रूढी म्हणून तीर्थयात्रा केलेल्या लोकांचे लोभ, द्वेष मत्सर इत्यादी विकार कमी होत नाहीत आणि तीर्थयात्रा केल्यामुळे आपण इतरांहून श्रेष्ठ आहोत असा अहंकार मात्र निर्माण होतो.

तीर्थयात्रा करताना महर्षि मैत्रेयांकडून आत्मज्ञान प्राप्त झाल्यानंतर विदुर हस्तिनापूरला परत आले. त्यानंतर त्यांना तीर्थयात्रेचा वृत्तान्त विचारताना युधिष्ठिराने म्हटले आहे : "भवद्विधा भागवतास्तीर्थभूताः स्वयं विभो। तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि स्वान्तस्थेन गदाभृता॥" भागवत १.१३.१०॥ (हे प्रभो! तुमच्यासारखे भक्तभागवत स्वतःच तीर्थस्वरूप आहेत. पापी पुरुषांच्या द्वारा कलुषित झालेल्या तीर्थांना आपल्यासारखे महात्मे आपल्या हृदयामध्ये विराजित श्रीगदाधर भगवंताच्या प्रभावाने तीर्थत्व प्राप्त करून देतात.) त्याचप्रमाणे असे भक्त कोणत्याही जलाशयात स्नान करोत, त्यांच्या प्रभावाने त्या जलाशयाला तीर्थत्व प्राप्त होते.

भगीरथाने तपश्चर्या करून गंगा नदीला प्रसन्न केले व आपल्या पूर्वजांचा उद्धार करण्यासाठी पृथ्वीवर येण्याची तिला विनंती केली; तेव्हा गंगा त्याला म्हणाली की मी स्वर्गातून पृथ्वीवर येताना माझा वेग पृथ्वीला सहन होणार नाही आणि त्यामुळे तिला भेदून मी पाताळात जाईन. शिवाय मी पृथ्वीवर आले तर

पृथ्वीवरील सर्व पापी लोक आपली पापे माझ्या पाण्याने धुतील व त्यामुळे मी अपवित्र होईन. मग ते पाप धुण्यास मला स्थान कोणते? तेव्हा भगीरथाने गंगेचा ओघ आपल्या मस्तकावर घेण्याची श्रीशंकरांना प्रार्थना केली. त्यांनी ते मान्य केल्यानंतर भगीरथ गंगेला म्हणाला : "साधवो न्यासिन : शान्ता ब्रह्मिष्ठा लोकपावनाः। हरन्त्यघं ते ऽङ्गसङ्गात् तेष्वास्ते ह्यघभिद्धरिः॥" भागवत ९.९.६॥ (हे माते! सर्व लोकांना पावन करणारे, विषयत्यागी, शांतस्वरूप ब्रह्मनिष्ठ साधुसंत तुझ्या प्रवाहात स्नान करतील आणि त्यांच्या अंगसंगाने तुला घ्यावी लागलेली पापे धुतली जातील. कारण सर्व पातकांचा नाश करणाऱ्या श्रीहरीचे वास्तव्य त्यांच्या हृदयामध्ये असते.) भगवान श्रीकृष्णही सांगतात, "संतांचेनि अंगलगें। पापातें जिणणें गंगें। तेणें संतसंगें। शुचित्व कैसें॥" ज्ञानेश्वरी १२.१७७॥ नाथभागवतात स्वतः गंगा म्हणते, "स्वयें आपण भागीरथी। सर्वदा ऐसें जीवीं चिंती। कोणी साधु ये जैं मजप्रती। तैं माझीं पापें जाती निःशेष ॥३५८॥ पार्वतीचा द्वेष मनीं। तें बद्धपाप मजलागुनी। तेंही झडे संतचरणीं। सकळ पापा धुणी सत्संगें॥३५९॥ कां ज्याचे मुखीं हरिनामकीर्ती। त्याचे पाय जैं मजमाजीं येती। तैं सकळ पापें माझी जाती। ऐसें भागीरथी स्वयें बोले॥" ३६०॥ ए. भागवत अ. २६

जे तारून नेते ते तीर्थ. तीर्थ शब्दात तृ हा मूळ धातु असून त्याचा अर्थ ओलांडून पलीकडे जाणे, पोहोणे असा आहे. संसाराला सागराची उपमा देतात. हा सागर तरून जाण्यासाठी नामाच्या नावेमध्ये बसावे असे संतांनी आणि भगवंतानी म्हटले आहे. "नामाचिया सहस्रवरी। नावा इया अवधारीं। सजूनिया संसारीं। तारू जाहलों॥" ज्ञानेश्वरी १२.९०॥ चित्तशुद्धी होण्यासाठी नामस्मरणाबरोबरच तीर्थयात्रा करावयास सांगितले आहे. काशी, प्रयाग, मथुरा-वृंदावन, अयोध्या तसेच महाराष्ट्रातील पंढरपूर, देहू, आळंदी, कोल्हापूर, नाशिक, तुळजापूर, गोंदवले, पावस, निंबाळ इत्यादी क्षेत्रात जाण्याचा मुख्य उद्देश तेथे जाऊन स्नान, देवदर्शन व तीर्थप्रसाद घेऊन परत येणे हा नसून अशा ठिकाणी येणाऱ्या संत सत्पुरुषांचा सहवास घडून चित्तशुद्धी व्हावी व साधनास बळकटी यावी हा असतो. म्हणून नारदांनी तीर्थांना तीर्थपणा श्रेष्ठ भक्तांमुळे येतो असे या सूत्रात म्हटले आहे. संतांच्या केवळ दर्शनाने माणूस पावन होतो म्हणून भक्तांनी सत्संगतीला अतिशय महत्त्व दिलेले आहे. तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी आलेल्या संतांच्या सहवासाचा साधकांवर अनायास परिणाम होतो. त्यांचे उदाहरण डोळ्यापुढे ठेवून साधन करण्याचा उत्साह वाढतो. त्या पवित्र

वातावरणात भगवद्भक्तीचेच विचार मनात येऊन संसाराची ओढ कमी होते. अशा प्रकारे चित्तशुद्धी होऊन नामात गोडी वाटू लागली की विनाकष्ट साधनात वाढ होते. सारांश संतांमुळे तीर्थांना पापी जनांना पवित्र करण्याची शक्ती प्राप्त होते.

**सुकर्मीकुर्वन्ति कर्माणि**

कोणताही माणूस कर्म न करता राहू शकत नाही. कर्म करताना कर्माचा हेतु, कर्म करणारा म्हणजे कर्ता, कर्म करण्यासाठी लागणारी साधने, कर्म करण्याची हातोटी आणि कर्माचे फल यांचा विचार करावा लागतो. सामान्य माणूस कोणतेही कर्म फळाच्या लाभाच्या आशेने करतो, पण खरा भक्त मात्र जी कर्मे करतो ती त्याच्या देवतेला अथवा सद्गुरूला आवडतात म्हणून करतो. त्यामुळे फलाशेने केलेले कर्म आणि भगवंताला आवडते म्हणून भक्ताने केलेले कर्म ही वर वर पहाताना एकसारखी दिसली तरी सामान्य माणसाचे कर्म बंधनाला कारण होते तर भक्ताने केलेले कर्म बंधनातून मुक्त करणारे आणि म्हणून सत्कर्म होते. म्हणून नारद या सूत्रात सांगतात की संत कर्माला सत्कर्मपण देतात. "भगवंताच्या स्मरणांत केलेले कोणतेहि कर्म सत्कर्म या सदरांत पडतें" असे श्रीमहाराजांनी एका प्रवचनात (१३ जानेवारी) सांगितले आहे. म्हणून "नाम हा सत्कर्माचा पाया आहे तसा कळसही आहे." एकनिष्ठ भक्त अतिशय नीतिमान असतो. नीतीने केलेले कर्म चांगले असले तरी अध्यात्मदृष्ट्या ते सत्कर्म तेव्हाच होते की जेव्हा ते धर्माशी सुसंगत म्हणजे भगवंताच्या स्मरणात होते. असे कर्म संत सत्पुरुष करतात. जगाकडे पहाण्याची त्यांची दृष्टी विशाल असते. त्यामुळे त्यांचे व्यवहारातील संबंध देखील संकुचित आणि स्वार्थी न रहाता उदार, पवित्र आणि निस्वार्थी असतात. त्यांच्या संगतीत साधकांचा स्वार्थ गळून पडतो आणि कर्मबंधन नाहीसे होते. म्हणूनच सज्जनांची संगत हे सर्वात श्रेष्ठ साधन होय असे नाथांनी भागवतात म्हटले आहे. सर्व साधनाचे पर्यवसान सत्संगतीत झाले पाहिजे. तुलसीरामायणात शंकर पार्वतीला सांगतात, "गिरिजा संत समागम सम न लाभ कछु आन। बिनु हरिकृपा न होइ सो गावहिं बेद पुरान॥" ७.१२५(ख)॥ भक्तिपूर्वक जे कर्म होते - मग व्यवहारदृष्ट्या ते कितीही क्षुल्लक असो - तेच सत्कर्म ठरते. "भक्तिहीनेन यत् किञ्चित् कृतं सर्वमसत्समम्॥" अध्यात्मरामायण ७.७.६७॥ संत अखंड भगवत् चिंतनात असतात. त्यामुळे त्यांनी केलेली सर्व कर्मे जगाच्या हितासाठी केलेली सत्कर्मेच असतात.

**सच्छास्त्रीकुर्वन्ति शास्त्राणि**

मानवास हिताचे ज्ञान करून देणाऱ्या नियमांना व ग्रंथांना शास्त्र म्हणतात. आत्मज्ञान हे मानवाचे अंतिम हित होय. ज्या शास्त्राच्या अभ्यासाने ईश्वराच्या अस्तित्वाविषयी संशय निर्माण होतो त्याला सत्शास्त्र म्हणता येणार नाही. ज्या शास्त्राचा संत महात्मे आदर करतात, ज्याच्या अभ्यासाने आणि त्यात सांगितल्याप्रमाणे आचरण केल्याने भगवंताविषयी आस्तिक्यबुद्धी वाढते तेच सत्शास्त्र होय. ज्या शास्त्रात भगवत्स्वरूपाचा विचार नाही, भगवंताचे गुणवर्णन नाही आणि नाममाहात्म्य नाही त्याला अध्यात्मामध्ये सत्शास्त्र म्हणता येणार नाही. म्हणून शास्त्रग्रंथापेक्षाही सत्पुरुषांचे सांगणे आणि आचरण जास्त मोलाचे ठरते. त्यांचे सहज बोलणे हित उपदेश असतो आणि त्यांचे आचरण हेच सदाचरण असते. त्यांच्या आचरणामुळे शास्त्रांना सत्शास्त्राचा दर्जा प्राप्त होतो.

ह्या सूत्राचे विवरण करताना श्रद्धेय हनुमानप्रसाद पोद्दार यांनी म्हटले आहे, "जिन शास्त्रोक्त कर्मोंको भक्तगण करने लगते हैं, वे ही सत्कर्म हो जाते हैं और वे जिस शास्त्रको आदर देते हैं, वही सत्शास्त्र माना जाता है। वरं यह कहना भी अत्युक्ति नहीं कि भक्त जिस जगह रहते हैं, जिस सरोवर या नदीमें स्नान करते हैं, वही तीर्थ बन जाता हैं; भक्त जो कुछ कर्म करते हैं, वही आदर्श सत्कर्म कहलाता है और भक्त जो कुछ उपदेश करते हैं, वही सत्शास्त्र माना जाता है। उनका निवासस्थान ही तीर्थ, उनके कर्म ही सत्कर्म और उनकी वाणी ही सत्शास्त्र है। - प्रेमदर्शन १७ वा संस्करण पृष्ठ १३०.

भक्तांना हे सामर्थ्य कशामुळे प्राप्त होते ते नारदांनी पुढील सूत्रात सांगितले आहे.

## सूत्र सत्तरावे

**तन्मयाः ॥७०॥**

**(यतः= कारण तेः= ते भक्त) तत् मयाः= त्याने भरलेले (असतात.) कारण ते भक्त भगवंतमय झालेले असतात.**

**विवरण** : या सूत्रात भक्त तन्मय म्हणजे भगवन्मय झालेले असतात असे नारद सांगतात. आपल्या ज्ञानप्रक्रियेमध्ये ज्ञाता म्हणजे जाणणारा, ज्ञेय म्हणजे जे जाणावयाचे ते आणि या दोहोंमधील संबंध म्हणजे ज्ञान या तीन गोष्टींचा म्हणजे त्रिपुटीचा समावेश होतो. अध्यात्माखेरीज अन्य सर्व

शास्त्रांमध्ये ज्ञान झाल्यानंतरही ज्ञाता व ज्ञेय हे एकमेकांपासून वेगळेच रहातात. उदाहरणार्थ, एखादे घड्याळ कसे चालते, त्याची रचना कशी असते इत्यादी ज्ञान झाले तरी ज्याने ते ज्ञान करून घेतले तो व ज्याचे ज्ञान झाले ते घड्याळ एक होत नाहीत. पण अध्यात्मात मात्र अंतर्मुख होऊन भक्त भगवंताचा (किंवा खऱ्या मी चा) शोध घेऊ लागला की देहाने वेगळा दिसला तरी तो भगवंतमय होतो (किंवा खरा मी होतो.) "देव पहायासी गेलो देव होऊनिया ठेलो" अशी ती अवस्था असते. "देव ते संत देव ते संत। निमित्य त्या प्रतिमा॥" म्हणजे देव हाच संत व संत हेच देव आहेत आणि त्यांच्या दोघांच्या मूर्ती ह्या उपाधीच्या निमित्ताला आहेत असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे. दुसऱ्या एका अभंगात ते सांगतात की "विठ्ठलें हें अंग व्यापिली हे काया। विठ्ठल हे छाया माझी मज॥" अशा प्रकारे भक्त भगवंताने भरून गेल्यानंतर त्याच्या सर्व क्रिया भगवंताने भारलेल्या असतात. ह्या त्याच्या अवस्थेमुळे त्याचे वागणे हेच शास्त्र बनते. तन्मय झालेल्या भक्ताचे मन भगवंताचे मन होते. याच्या पुढच्या अवस्थेमधे त्याच्या देहातही बदल होतो. गुरुशी ऐक्य झालेल्या शिष्याची अंगलट गुरुसारखी होऊ लागते असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे. जेव्हा भक्त आपले शरीर, मन, बुद्धी, अहंकार इत्यादी सर्व भगवंताला अर्पण करतो तेव्हा भगवत्कृपेमुळे तो भगवन्मय होतो. असा तन्मय झालेला भक्त जेथे असेल तेथील सूक्ष्म व स्थूल वातावरण शुद्ध, पवित्र होते. त्याच्या समागमाने तीर्थे, कर्मे व शास्त्रे पवित्र होतात. भगवद्गीतेत भगवंत सांगतात, "वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः। बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः॥" ४.१०॥ आसक्ति, भय, क्रोध ही ज्यांच्यापासून निघून गेली आहेत, जे मत्परायण झाले आहेत, जे माझा आश्रय करून राहिले आहेत असे तप व ज्ञान यांनी शुद्ध झालेले अनेक लोक मत्स्वरूपाला प्राप्त झाले आहेत. या श्लोकावरील व्याख्यानात ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "जे सदा मियांचि आथिले। माझिया सेवा जियाले। कां आत्मबोधें तोषले। वीतराग जे ॥६१॥ जे तपोतेजाचिया राशी। कां एकायतन ज्ञानासी। जे पवित्रता तीर्थांसी। तीर्थरूप ॥६२॥ ते मद्भावा सहजें आले। मी तेचि ते होऊनि ठेले। जे मज तयां उरले। पदर नाहीं॥" ज्ञानेश्वरी ४.६३॥

अशा भक्तांमुळे विश्वामध्ये निर्माण होणाऱ्या प्रसन्नतेचे वर्णन नारदांनी पुढील सूत्रात केले आहे.

## सूत्र एक्काहत्तरावे

**मोदन्ते पितरो, नृत्यन्ति देवताः, सनाथाचेयं भूर्भवति ॥७१॥**

**पितराः= आईवडील व उभय कुलांतील पूर्वज. मोदन्ते= आनंदित होतात. देवताः= देवता. नृत्यन्ति= (आनंदाने) नाचतात. च= आणि. इयं= ही. भूः= पृथ्वी. सनाथा= आधार किंवा रक्षणकर्ता असलेली. भवति= होते.**

**सिद्ध भक्ताच्या माता पित्यांना व पूर्वजांना आनंद होतो, देव देवता आनंदाने नृत्य करतात आणि पृथ्वीला रक्षणकर्ता मिळून ती सनाथ होते.**

**विवरण :** भक्त सिद्ध झाला म्हणजेच संत सत्पुरुष झाला, तो भगवन्मय झाला की त्याच्यामध्ये होणारा बदल व त्याच्या असण्यामुळे आणि वागण्यामुळे स्थूलात म्हणजे दृश्य जगात होणारे बदल पूर्वीच्या तीन सूत्रांत सांगितले. अशा भक्तांमुळे तीर्थांना पावन करण्याची शक्ती मिळते, कर्मांना सत्कर्मता येते, शास्त्रांना सत्शास्त्रांचा दर्जा प्राप्त होतो असे सांगितले. त्याचप्रमाणे त्यांची कुळे आणि पृथ्वी ते पावन करतात असेही सांगितले. आता या सूत्रात नारद सांगत आहेत की भक्त तयार झाला म्हणजे त्याचे आई वडील व पितर यांना मोद होतो, देवता आनंदाने नृत्य करू लागतात आणि पृथ्वीला आधार मिळून ती सनाथ होते. पूर्वीच्या सूत्रांमधील परिणाम स्थूलातील असतात तर ह्या सूत्रात सांगितलेले परिणाम हे सूक्ष्मामध्ये होणारे परिणाम असतात.

व्यवहारात देखील आपण पहातो की मुले जर कर्तबगार निपजली तर त्यांच्या आई वडिलांना आनंद होतो. त्यांच्या वागण्यातून व बोलण्यातून तो व्यक्तही होतो. अध्यात्माच्या क्षेत्रात मात्र रामदास, विवेकानन्द, ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज यांच्यासारख्या लहान वयात परमार्थाकडे वळलेल्या व्यक्तींच्या बाबतीत, ते जेव्हा परमार्थाकडे वळतात तेव्हा त्यांच्या आई वडिलांना चिंताच वाटत असते. मात्र ते सिद्ध झाल्यावर चिंता नाहीशी होऊन त्यांच्याविषयी अभिमान वाटू लागतो व मन आनंदाने भरून जाते. तथापि ह्या स्थूल परिणामापेक्षा सूक्ष्म जगतातील परिणाम जास्त खोल असतो.

हिंदू धर्मकल्पनेमध्ये भूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः आणि सत्य किंवा ब्रह्म असे सात लोक सांगितलेले आहेत. मृत्यूनंतर माणसाचा सूक्ष्म देह स्थूल देहाच्या बाहेर जातो. बाहेर पडलेल्या सूक्ष्म देहाला त्याने केलेल्या कर्मानुसार चांगली अथवा

वाईट अवस्था प्राप्त होते. ह्या अवस्थेतील भोग स्थूल देहाविना घडत असतात. आणि त्यासाठी तो भुवर्लोकात अथवा स्वर्गलोकात रहात असतो. स्वर्गात रहाणाऱ्या जीवालाही पुण्यकर्मांच्या फलाचा भोग भोगून झाला की पुन्हा या मृत्युभूमीवर जन्म घ्यावा लागतो. "क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति" असे भगवद्गीता सांगते. जास्त पुण्यवान पण आत्मज्ञान न झालेले जीव त्यांच्या अधिकारानुसार स्वर्गापलीकडे असलेल्या ब्रह्मलोकापर्यंत जातात पण आत्मज्ञान होण्यासाठी त्यांना पुन्हा खाली यावे लागते. आत्मज्ञान झाल्यानंतर मात्र त्यांना पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही. भगवंत सांगतात, "आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन। मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते॥" भ. गीता ८.१६॥ (अर्जुना, ब्रह्मलोकासकट सर्व लोकांचे प्राणी पुनर्जन्म पावणारे आहेत. हे कुन्तिपुत्रा, परंतु मजप्रत आल्यानंतर पुनर्जन्म रहात नाही.) ही पुण्यात्म्यांची स्थिति झाली. ज्यांच्या हातून पापाचरण होते त्यांना मृत्यूनंतर नरकात जावे लागते आणि तेथील दुःखे सोसावी लागतात. पण पुण्यात्मे असोत किंवा पापात्मे असोत, त्यांच्या कुळात कोणी आत्मज्ञानी झाला तर पुण्यात्म्यांना त्यांच्या प्रगतीसाठी आणि पाप केलेल्या पितरांना त्यांचा दुःखभार हलका होऊन सुधारणेची संधी मिळण्यास त्या आत्मज्ञानी माणसाची मदत होते. म्हणून साहजिकच ज्या कुळात भक्त भगवद्रूप म्हणजेच आत्मज्ञानी होतो त्या कुळातील सर्व पितरांना आनंद होतो. भुवर्लोकात रहाणाऱ्या पितरांचे dimension म्हणचे आयाम वेगळे असले तरी त्यांना त्यांचा कुळातील माणसांबद्दल आसक्ती असते. भूलोकात रहाणाऱ्या त्यांच्या नातेवाईकांकडे त्यांचे लक्ष असते. त्यामुळे आपल्या कुळाची कीर्ती वाढवणारा भगवद्भक्त पाहून ते आनंदित होतात.

माणसाला झालेला आनंद जसा तो नृत्यातून व्यक्त करतो तसा देवतांना होणारा आनंदही त्या नृत्याद्वारे व्यक्त करतात. ज्या घरात, मंदिरात, मठात व तीर्थक्षेत्रामध्ये निःस्वार्थीपणे भगवंताची उपासना चालते त्या ठिकाणी विशिष्ट प्रकारच्या शक्ति प्रकट होतात व त्या उपासकांना साहाय्य करतात. भक्तांना त्यांच्या उपासनेमध्ये काही वेळा जे चमत्कार अनुभवाला येतात ते त्यांच्याभोवती शक्तिरूपाने वावरणाऱ्या देवतांमुळे होतात. काही वेळा या देवता मदत करण्याच्या हेतूने स्वप्नात किंवा बेशुद्धीतही सूचना देतात व मार्गदर्शन करतात. साधक ज्या देवतेची उपासना करतो ती देवता त्याचे रक्षण करण्यासाठी त्याच्या भोवती रहाते असे ॲनी बेझंटनी म्हटले आहे. कित्ये साधकांना अष्टसिद्धी प्राप्त होतात. या सिद्धी म्हणजे विशिष्ट शक्ती धारण

करणाऱ्या देवताच होत. शक्ती कधी स्वस्थ रहात नाही. त्यामुळे सिद्धी प्राप्त झाल्यानंतर त्यांचा उपयोग करून साधक मार्गभ्रष्ट होण्याची भीती असते म्हणून त्याला अतिशय सावध रहावे लागते. जे साधक सद्गुरूंना शरण गेलेले असतात त्यांना त्यांचे गुरु सिद्धींच्या दुरुपयोगापासून वाचवितात. कुळामध्ये आत्मज्ञानी माणूस झाला की जसा पितरांना आनंद होतो तसा आनंद त्या साधकाला साहाय्य करणाऱ्या देवतांनाही होतो कारण त्यांना त्यांच्या मुक्तीचा मार्ग समजतो. स्वर्गलोकाच्याही वर असलेल्या महालोक, तपोलोक आणि सत्यलोकात या देवतांचा वास असतो आणि पुण्यभोग संपल्यावर त्यांना पृथ्वीवर परत यावे लागते. पण जन्ममरणाच्या फेऱ्यातून सुटण्याचे त्यांचे ध्येय निश्चित असल्यामुळे सिद्ध भक्तांचे उदाहरण त्यांचा मुक्तीचा मार्ग स्पष्ट करते.

प्राण्यांच्या समूहांप्रमाणे माणसांच्या समूहातही मारामाऱ्या, संघर्ष अटळ असतो. स्वार्थ हे संघर्षाचे मूळ आहे. ज्याला समाज सेवा म्हणतात त्या सेवेलाही स्वार्थाची पार्श्वभूमी असते. तथापि अशा स्वार्थी जगात केवळ संतच जगावर निःस्वार्थी प्रेम करतात. "तुका म्हणे आतां। उरलों उपकारापुरता॥" अशी त्यांची अवस्था असते. म्हणून पृथ्वीलाही अशा निःस्वार्थी संतांचाच आधार वाटतो. श्रीमहाराज म्हणाले, "मी काय केलें ? माझ्याजवळ काय पैसा होता, का विद्वत्ता होती ? पण मी येणाऱ्या प्रत्येकाला धीर दिला." सत्पुरुषाने दिलेला धीर हा खरोखर परमात्म्याचाच आधार असतो. "मी सांगितलं आणि रामानं तें ऐकलं नाहीं असं आजपर्यंत कधी झालं नाही." असे श्रीमहाराज म्हणाले. संतांचे परमात्म्याशी तादात्म्य असते. संत म्हणजे मानवता आणि दिव्यता यांचे मनोहर मिश्रण असते. त्यांच्यामुळे लोकांना आपले दुःख, अडचणी सांगायला जागा मिळते. निराधारांना आधार मिळतो. येणाऱ्या दीन दुःखितांसाठी त्यांच्या घराचे दरवाजे सदैव उघडे असतात. जगामध्ये दिसणारा संघर्ष हा खरा आतला संघर्ष आहे. राजे आणि राजकारणी लोक तो नाहीसा करू शकत नाहीत कारण तेही स्वार्थी असतात. केवळ संतच आतला संघर्ष नाहीसा करतात. म्हणून The real revolution is inner revolution असे कृष्णमूर्ती म्हणतात.

स्वतःवर स्वामित्व गाजविणाऱ्या माणसाला उपनिषदांनी स्वराट् म्हटले आहे. श्रेष्ठ भक्ताचे अंतःकरण सर्व प्रकारच्या संघर्षांपासून मुक्त असते. द्वेष, मत्सर, क्षुद्रपणा, कामवासना, लोभ इत्यादी विकारांवर विजय मिळवून तो पूर्णपणे निर्वैर होतो. "निर्वैर होणें सर्व साधनांचे मूळ। येर ते वेल्हाळ सांडी मांडी॥" असे तुकाराम महाराज म्हणतात. अशा भक्ताच्या सभोवतालचे वातावरण

पूर्णपणे अविरोधाचे असते. आत्मज्ञानी सत्पुरुषांच्या आश्रमातील पशुदेखील परस्परातले उपजत वैर विसरल्याची उदाहरणे पुराणात आढळतात. अशा अविरोधाच्या वातावरणात येताच संसारतप्त जीव शांत होतात. जेथे असे भक्त असतात तेथेच भगवंत प्रकट होतो आणि पृथ्वी खऱ्या अर्थाने सनाथ होते. पृथ्वीवरील जीवमात्रांना संतांजवळ आधार मिळतो. स्वतः भगवंतांनीच सांगितले आहे की जेथे माझे भक्त माझी उपासना करतात तेथेच मी रहातो. ज्ञानेश्वर महाराजांनी याचा अनुवाद करताना म्हटले आहे, "जयांचे वाचेपुढां भोजें। नाम नाचत असे माझें। जे जन्मसहस्रीं वोळगिजे। एक वेळ मुखासि यावया ॥२०६॥ तो मी वैकुंठीं नसें। एक वेळ भानुबिंबींही न दिसें। वरी योगियांचींही मानसें उमरडोनी जाय ॥२०७॥ परी तयांपाशीं पांडवा। मी हारपला गिंवसावा। जेथ नामघोषु बरवा करिती ते माझे॥"२०८॥ ज्ञानेश्वरी अ.९. ज्यांच्या हृदयात परमात्मा प्रकट होतो असे संत जेव्हा पृथ्वीवर असतात तेव्हा त्यांचा पृथ्वीला खरा आधार मिळतो व ती सनाथ होते.

सारांश भक्ती सिद्ध झाली व भक्ताच्या हृदयात परमात्मा प्रकट झाला की पितरांना आनंद होतो, जगात मांगल्य यावे अशी इच्छा असणाऱ्या देवता आनंदाने नाचू लागतात आणि दुष्ट माणसांनी आणि शक्तींनी दुःखी झालेल्या पृथ्वीला रक्षणकर्ता आधार लाभतो.

परमेश्वराशी एकरूप झाल्यामुळे हे श्रेष्ठ भक्त कसे भेदरहित असतात ते नारदांनी पुढील सूत्रात सांगितले आहे.

## सूत्र बाहत्तरावे

**नास्ति तेषु जाति विद्यारूपकुलधनक्रियादि भेदः ॥७२॥**

**तेषु= त्यांच्या मध्ये (श्रेष्ठ भक्तांमध्ये) जाति= जातपात. विद्या= विद्या. रूप= रूप (सौंदर्य) कुल=कुळ. धन= संपत्ती, पैसा. क्रिया= काम. आदि= वगैरेवर आधारलेला. भेद= भेद. न अस्ति= नसतो.**

**श्रेष्ठ भक्तांमध्ये जातपात, विद्या (शिक्षण) रूप, कुळ, पैसा, करत असलेले काम इत्यादींवर आधारलेले भेदभाव नसतात.**

**विवरण :** मागच्या ६७ व्या सूत्रापासून ज्या एकनिष्ठ श्रेष्ठ भक्तांविषयी नारद सांगत आहेत त्यांच्या ठिकाणी भेदभाव राहिलेला नसतो असे नारदांनी या सूत्रात सांगितले आहे. व्यवहारामध्ये उच्च-नीच, श्रेष्ठ-कनिष्ठ, विद्वान-अडाणी, सुंदर-कुरूप, श्रीमंत-गरीब पांढरपेशे-कष्टकरी, कुशल-अकुशल इत्यादी अनेक

भेद आढळतात आणि कित्येकदा या भेदांवरच आपला व्यवहार आधारलेला असतो. पण भक्तीमध्ये मात्र यांपैकी कोणत्याही भेदाला वाव नसतो. मी आणि माझ्याखेरीज इतर हा मूलभूत भेद असून अहंकार हा त्याचा आधार असतो. पण अहंकार नाहीसा झाल्याशिवाय भक्ती सिद्ध होत नाही. भक्त सिद्ध होतो तेव्हां देहाने तो माणूस असला तरी तो भगवंतच असतो; इतकेच नाही तर त्याला प्राणिमात्रांच्या ठिकाणी वास करणाऱ्या भगवंताचे दर्शन घडल्यामुळे शरीरे वेगवेगळी असली तरी त्या सर्वांकडे तो भगवंत म्हणूनच पहातो. "जें जें भेटे भूत। तें तें मानिजे भगवंत। हा भक्तियोगु निश्चित। जाण माझा॥" ज्ञानेश्वरी १०.११८॥ असे भगवंतानीच अर्जुनाला सांगितले आहे. व्यवहारात वागताना स्त्री-पुरुष, माणूस व पशू, नातेवाईक, अमुक धर्माचा इत्यादी भेद लक्षात घेऊन तो वागत असला तरी त्या भेदांतून निर्माण होणारा अहंकार, द्वेष इत्यादींना त्याच्या ठिकाणी थारा नसतो, कारण अंतर्यामी तो सर्वांकडे भगवंताची रूपे म्हणूनच पहात असतो. भगवान रमण महर्षींना एकदा एक भक्त म्हणाला की आपण आपल्या शक्तीचा दुसऱ्यांच्या कल्याणासाठी उपयोग का करत नाही? तेव्हा त्यांनी विचारले, **Where is the other ?** (दुसरा आहे कोठे?) "आपणचि विश्व जाहला। तरी भेदभावो सहजचि गेला॥" ज्ञानेश्वरी १२.१९१॥ अशी त्याची स्थिती असते.

श्रेष्ठ भक्तांच्या अंतःकरणात ज्याप्रमाणे जात, कुल, धर्म, विद्या इत्यादींवर आधारित भेद भावना नसते त्याप्रमाणे श्रेष्ठ भक्त होण्यासाठी वरीलपैकी कोणतीही अट नसते. माणूस म्हणून जो जन्माला आला त्याला भक्तीचा अधिकार आहे असे श्रीमहाराज म्हणत. संसारातले प्रेम आणि आसक्ती भगवंताकडे वळविली की ती भक्ती होते. संसाराविषयीच्या प्रेमाला जात, विद्या, पैसा यांसारखी कोणतीही अट असत नाही म्हणून ते प्रेम भगवंताकडे वळविण्यासाठी म्हणजे भक्तीसाठी कोणतीही अट नसते, भेद नसतात. भागवतात उद्धवाला भक्तीचे माहात्म्य सांगताना श्रीकृष्ण म्हणतात, "भक्त्याहमेकया ग्राह्यः श्रद्धयाऽऽत्मा प्रियः सताम्। भक्तिः पुनाति मन्निष्ठा श्वपाकानपि सम्भवात्॥" भागवत ११.१४.२१॥ (संतांना अत्यंत प्रिय असा त्यांचा आत्माच मी आहे. मी केवळ श्रद्धेने आणि भक्तीनेच वश होतो. एखाद्या चांडाळाने केलेल्या एकनिष्ठ भक्तीने तो पवित्र होतो.) "जो जातीने नीचत्वा गेला। परि भक्तिभावे उंचावला। तो मद्रूपता पावला। पूज्य झाला तिहीं लोकीं॥" ए. भागवत १४.२९१॥ "पवित्र तें कुळ पावन तो देश" या

आपल्या दीर्घ अभंगात अनेक संतांची उदाहरणे देऊन तुकाराम महाराज सांगतात की "यातायातीधर्म नाहीं विष्णुदासा। निर्णय तो ऐसा वेदशास्त्रीं॥" स्वामी त्यागीशानंद म्हणतात की या बाबतीत वैष्णव धर्मावर बौद्ध धर्मातील महायान पंथाचा प्रभाव पडलेलो आहे. भारद्वाज परीशिष्टात सांगितले आहे की "न जातिभेदं न कुलं न लिङ्गं न गुणक्रियाः। न देशकालौ नावस्थां योगोह्ययमपेक्षते॥ ब्राह्मणैः क्षत्रियैर्वैश्यै शूद्रैः स्त्रीभिस्तथापरैः। यथार्हमर्च्यः सेव्यश्च नित्यं सर्वेश्वरो हरिः॥ न परीक्ष्य वयो वन्द्याः नारायणपरायणाः। अपिस्युर्हीनजन्मानो मान्या निघ्नेन चेतसा॥" गरुड पुराण सांगते की "भक्तिरष्टविधा ह्येषा यस्मिन् म्लेच्छोऽपि वर्तते। स विप्रेन्द्रो मुनिः श्रीमान् स यतिः स च पण्डितः॥"Narada Bhakti Sutras by swami Tyagishanand. page 226

महाराष्ट्रात तर ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदास यांच्यासारख्या उच्च वर्णीयांपासून चोखा महारापर्यंत सर्व जातींमध्ये श्रेष्ठ भक्त होऊन गेले व त्यानीही आपआपसात किंवा समाजातील इतर लोकांमध्ये भेदभाव केला नाही. भक्तांमध्ये विद्वान व अडाणी असाही भेद रहात नाही. उलट विद्येमुळे अहंकार निर्माण झाला तर ती भगवत्प्राप्त्या आड येते. केवळ विद्वत्तेने भगवंत भेटत नाही ही खात्री झाल्यामुळे अनंतशास्त्री गाडगुळी (ब्रह्मानंद महाराज) यांनी श्रीमहाराजांच्या पायांवर डोके ठेवून माझी विद्या घ्या तर मी उठतो असा हट्ट धरला! भगवंत सांगतात, "म्हणोनि थोरपण पऱ्हांचि सांडिजे। व्युत्पत्ति आघवी विसरिजे। जैं जगा धाकुटे होइजे। तैं जवळीक माझी॥" ज्ञानेश्वरी ९.३७८॥ याचा अर्थ भक्ताने मुद्दाम अडाणी रहावे असा नाही. भगवंताच्या प्राप्तीसाठी शुद्ध अंतःकरणाने, डोळसपणे विद्या संपादन केली आणि विद्येचा अहंकार झाला नाही तर ती विद्या भक्तीच्या वाटचालीत साहाय्यभूत होते. रूपाच्या बाबतीतही भगवंत बाह्य सौंदर्याला भुलत नाही हे उघड आहे. साक्षात लक्ष्मीही ज्याच्या पायी लीन होते तो भगवंत कुब्जेकडून चंदनादि उपचार घेतो आणि जनाबाईच्या कण्या खाऊन तिच्याबरोबर धुणे पाणी करू लागतो. व्यवहारात आणि धार्मिक कृत्यात कुळाचा विचार करत असले तरी भक्तीमध्ये मात्र भक्ताची भगवंत हीच कुळदेवता असल्यामुळे त्याला तो शरण जातो. माणसाला जर संपत्तीचा आधार वाटू लागला तर त्यामुळे भगवंताच्या आधाराला उणेपणा येतो. समाज व्यवस्थेतील आपआपल्या स्थानानुसार माणसांना कर्मे करावी लागतात. म्हणून कोणतेही कर्म असो, खरा भक्त ते

भगवंताचे आहे म्हणून भगवदर्पण बुद्धीने करतो. थोडक्यात, ज्याच्या हृदयात भक्तीखेरीज अन्य गोष्टींना स्थान नाही आणि भगवंताखेरीज दुसरा नातेसंबंध नाही त्याच्या भक्तीच्या आड व्यवहारातील कोणताही भेदभाव येत नाही. गोस्वामी तुलसीदासांच्या रामचरित मानस मध्ये स्वतः श्रीराम शबरीला म्हणतात ''कह रघुपति सुनु भामिनि बाता। मानऊँ एक भगति कर नात॥ जाति पाँति कुल धरम बडाई। धन बल परिजन गुन चतुराई। भगतिहीन नर सोहइ कैसा। बिनु जल बारिद देखिअ जैसा॥'' अरण्यकाण्ड ३४.२,३॥

खऱ्या भक्तीला जात, धर्म, कुल, संपत्ती इत्यादींचा अडथळा येत नाही. मात्र याचा अर्थ भक्ताने मुद्दाम समाजव्यवस्थेविरुद्ध वर्तन करावे असा नाही. उलट सामान्य भक्त श्रेष्ठ भक्तांचे अनुकरण करतात हे लक्षात घेऊन त्याने शक्यतो शास्त्रशुद्ध वर्तन करावे. स्वतः भगवान श्रीकृष्णांनी देखील लोकांपुढे आपल्या वर्तनाचा आदर्श ठेवला होता. ज्ञानेश्वर महाराजांच्या पुढील ओव्यांत ते सांगतात, ''म्हणोनि समर्थु जो एथें। आथिला सर्वज्ञते। तेणें सविशेषें कर्मातें। त्यजावे ना ॥ १६८॥ देखें फळाचिया आशा। आचरे कामुकु जैसा। कर्मी भरु होआवा तैसा। निराशाही॥ १६९॥ जे पुढतपुढती पार्था। हे सकळ लोकसंस्था। रक्षणीय सर्वथा। म्हणऊनियां ॥ १७०॥ मार्गाधारें वर्तावें। विश्व हें मोहरें लावावें। अलौकिक नोहावें। लोकांप्रति ॥ १७०॥ ज्ञानेश्वरी अध्याय ३.

एकनिष्ठ भक्तांच्या ठिकाणी कोणताही भेदभाव का रहात नाही याचे कारण नारद पुढील सूत्रात सांगत आहेत.

## सूत्र त्र्याहत्तरावे

**यतस्तदीयः ॥ ७३ ॥**

**यतः= कारण. तदीयः= त्याचे.**

**कारण ते (एकनिष्ठ भक्त) त्याचे (भगवंताचे) असतात.**

**विवरण** : मागे सत्तराव्या सूत्रात नारदांनी भक्त भगवन्मय झालेले असतात असे सांगितले. आता ते भगवंताचे असतात असे सांगत आहेत. भक्तांमध्ये कितीही बाह्य भेद दिसत असले तरी अंतःकरणातून ते सर्व भगवंताचे असतात. त्यांच्या बाबतीत भगवंत भेद भाव ठेवत नाही आणि त्या भक्तांचीही भेद दृष्टी नाहीशी झालेली असते. मनुष्य देहात आलेला जीव अज्ञानामुळे स्वतःला देहाचा व देहसंबंधी मानत असतो. पण त्याची देहबुद्धि नाहीशी झाली म्हणजे तो 'त्याचा' म्हणजे भगवंताचा होतो. त्याचा होण्यासाठी काय करावे हे

सांगताना ब्रदर लॉरेन्स म्हणतो, "देवापुढे पूर्ण शरणागति पत्करणें हा सर्वात खात्रीचा मार्ग आहे. पूर्ण निष्ठा आणि आपल्या स्वतःच्या इच्छांचा त्याग ही पारमार्थिक जीवनाची प्राथमिक गरज आहे. ईश्वरप्राप्तीसाठी याहून आणखी कशाचीही गरज नाही. आपण फक्त येवढी जाणीव बाळगावी की देव सदोदित आपल्याजवळ आहे. ...देवाच्या सान्निध्याची निरंतर जाणीव राखणें हाच माझ्या मतें प्रार्थनेचा सोपा उपाय आहे. ...ज्याला निरंतर देवाचा सहवास लाभला आहे अशा माणसाइतकें सुखी व आनंदी जीवन या जगांत इतर कोणाचेंही असू शकत नाही. ...तो दयेची साक्षात मूर्ति व करुणेचा सागर आहे. मला शासन करण्याऐवजी तो प्रेमभराने एखाद्या बालकाप्रमाणे मला गोंजारतो, आपल्या टेबलावर मला जेवूं घालतो, स्वतःच्या मुलाप्रमाणें माझें लालन-पालन करतो. तो माझ्याशी बोलतो आणि हजार प्रकारांनीं आपल्या सोबतीचा लाभ तो मोठ्या आनंदानें देतो." (संतांचें आत्मचरित्र -ब्रदर लॉरेन्स पृ.१६१-१६४ लेखक के.वि.बेलसरे. त्रिदल प्रकाशन १९८८)

भक्त त्याचा (भगवंताचा) झाला की त्याच्या गुणदोषांसकट भगवंत त्याचा स्वीकार करतो. श्रीमहाराज म्हणत की एखादा मुलगा कोणाला दत्तक गेला तर त्याच्या वाट्याला आलेले औरस बापाने केलेले कर्ज दत्तक बापाला फेडावे लागते! भगवंताला दत्तक जाणे म्हणजे तदीय होणे होय. तदीय होण्याच्या तीन पायऱ्या सांगता येतील (१) पहिली पायरी मी त्याचा आहे 'तस्य एव अहम्।' त्याचे रूप, गुण वर्णन ऐकलेले आहे पण प्रत्यक्षात तो कसा आहे, किती दूर आहे ते मला माहीत नाही. पण त्याचे केवळ रूप, गुण वर्णन ऐकून मी त्याचा आहे असा भाव निर्माण झाला म्हणजे भक्त त्याला शोभेल, त्याला आवडेल असेच वागू लागतो. श्रीमहाराज रुक्मिणीचे उदाहरण देत असत. तिने कृष्णाला पाहिलेले नव्हते. पण द्वारकेहून आलेल्या ब्राह्मणाकडून त्याचे रूप गुण वर्णन ऐकल्याबरोबर मी त्याची आहे असा भाव तिच्या मनात निर्माण झाला आणि तिने मनोमन कृष्णाला वरले. (२) मी त्याचा किंवा त्याची म्हणत असताना तो माझ्यापासून दूर आहे. साक्षात समोर नाही. पण अनन्यतेमुळे भक्ताला त्याचे सान्निध्य जाणवू लागले की तो त्याला मी तुझा आहे 'तव एव अहम्।' म्हणतो. या पायरीवर भक्त भगवंताच्या समोर त्याच्या सान्निध्यात असतो. त्यामुळे तेथें जातो तेथें तूं माझा सांगाती असे तो म्हणू लागतो. (३) शेवटी तिसऱ्या पायरीवर भक्त आणि देव एक होतात. मी आणि तूं पण नाहीसे होते. मी तूंच आहे 'त्वम्

एव अहम्।' असे भक्त म्हणतो. ही तदीयतेच्याही पलीकडची अवस्था प्राप्त झाल्यानंतर भक्तिसुख भोगण्यासाठी भक्त व भगवंत असे बाह्यात्कारी द्वैत रहाते. मग "नको ब्रह्मज्ञान आत्मस्थिति भाव। मी भक्त तूं देव ऐसें करी॥" अशी तुकाराम महाराज गोपिकारमणाजवळ प्रार्थना करतात.

भक्त देवाची किंवा सद्गुरूंची पूजा करतो तेव्हा ते तेथेच असतात. पण सामान्य भक्ताला त्यांच्या अस्तित्वाची जाणीव नसते. 'महाराज, आपण कोठें असता?' असे कासेगांवकर वैद्यांनी जेव्हा श्रीमहाराजांना विचारले तेव्हा ते म्हणाले, 'मी नाही अशी जागाच नाही तर कोठें असतो ते कसें सांगू?' म्हणजे ते सर्वव्यापी आहेत. आणखी एकदा श्रीमहाराज म्हणाले की 'तुम्ही तुमच्याजवळ नाही इतका मी तुमच्याजवळ आहे.' कारण भगवंत किंवा सद्गुरु आपल्या हृदयातच असतात. ब्रदर लॉरेन्सने म्हटल्याप्रमाणे त्यांचे अस्तित्व, सान्निध्य सर्वकाळ जाणवू लागले की सामान्य भक्त हा एकनिष्ठ म्हणजे मुख्य भक्त होतो; तो तदीय होतो. तो माझा आहे तसाच सर्वांचा आहे. म्हणून तो माझा आहे असे न म्हणता मी त्याचा -तदीय आहे असे म्हणणेच बरोबर आहे. शंकराचार्य म्हणतात, "सत्यपिभेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम्। सामुद्रो हि तरंगः क्वचन समुद्रो न तारंगः॥' म्हणजे हे भगवंता, जरी तुझ्या माझ्यामध्ये भेद नाही तरी मी तुझा आहे, तूं माझा नाहीस. तरंग समुद्राचा आहे, पण समुद्र तरंगांचा नाही. तरंगाच्या अस्तित्वास समुद्राची आवश्यकता असते पण समुद्राच्या अस्तित्वासाठी तरंगांची आवश्यकता नसते.

सदुसष्टाव्या सूत्रापासून त्र्याहत्तराव्या सूत्रापर्यंत एकनिष्ठ भक्तांसंबधी सांगून झाले. आता भक्ताचा आचारधर्म सांगताना नारद प्रथम भक्ताने काय टाळावे ते दोन सूत्रांत सांगत आहेत.

## ४.३ : भक्ताने काय टाळावे

### सूत्र चौऱ्याहत्तरावे

**वादो नावलम्ब्यः ॥७४॥**

**वादः = वाद. न अवलम्ब्यः= आश्रय घेऊ नये.**

**भक्ताने वादाचा आश्रय घेऊ नये. - वाद करणे टाळावे.**

### सूत्र पंचाहत्तरावे

**बाहुल्यावकाशादनियतत्त्वाच्च ॥७५॥**

**बाहुल्यावकाशात्= भिन्न मतांना जागा असल्यामुळे. च= आणि अनियतत्त्वात्= केवळ तर्कावर आधारलेले कोणतेही मत अथवा विधान अंतिम सत्य नसल्यामुळे.**

**(कारण) वादामध्ये मतभिन्नतेला भरपूर वाव असतो आणि केवळ तर्कावर आधारलेले कोणतेही मत अथवा विधान अंतिम सत्य नसते. (म्हणून भक्ताने वादापासून दूर रहावे.)**

**विवरण** : साधक आणि सिद्ध भक्तांच्या आचरणातील एक अतिशय महत्त्वाची गोष्ट या दोन सूत्रांत सांगितली आहे. साधक भक्ताने वादविवाद करण्यामध्ये आपला वेळ फुकट घालवू नये. अखंड नामस्मरण साधावयाचे असेल तर त्यासाठी त्याने साधनाला प्रतिकूल असलेल्या गोष्टींचा निश्चयपूर्वक त्याग केला पाहिजे. साधकाने दुसऱ्यांशी वाद करू नये पण इतर साधकांशी संवाद साधावा. मतभेद असेल तेथे वाद होतो. पण खऱ्या संवादामुळे वाद नाहीसा होतो. ''तुटे वाद संवाद तो हीतकारी'' असे समर्थ रामदास सांगतात. गुरु आणि शिष्य किंवा एकाच मार्गावर असणाऱ्या साधकांची साधनात प्रगती व्हावी या सद्हेतूने परस्परांमध्ये होणारी अध्यात्म चर्चा संवादात्मक असते. बरेच वेळा तत्त्वज्ञान संवाद पद्धतीने शिकविले जाते. भगवद्गीता हा कृष्ण व अर्जुन यांच्यामधील संवादच आहे. एखाद्या बुद्धिप्रधान विषयाचे अनेक अंगांचे केलेले विवेचन असा वाद शब्दाचा मूळ अर्थ आहे. विशिष्ट तत्त्वप्रणाली उदाहरणार्थ, समाजवाद असाही वाद शब्दाचा अर्थ आहे पण तो येथे अप्रस्तुत आहे. दोन व्यक्तींची भिन्न मते असताना आपले मत दुसऱ्याला पटवून देण्याची बुद्धीची जी प्रक्रिया असते तिलाही वाद म्हणतात. येथे वादाचा आश्रय करू नये असे सांगताना नारदांना हा अर्थ अभिप्रेत आहे. शुद्ध बुद्धीने केलेल्या वादामुळे ज्ञानात भर पडते. जेव्हा सत्याचा शोध चालू असतो तेव्हा काही प्रमाणात वाद आवश्यक असतो. पण बरेच वेळा वादाचा मूळ सत्यशोधनाचा हेतू बाजूला राहून वाद करणाऱ्यांमध्ये ईर्षा निर्माण होते, अहंकार वाढतो आणि आपलेच मत खरे असे वाटू लागले की सत्यशोधनाचे दरवाजे बंद होतात. अशा वादातून शेवटी कटुता निर्माण होते. मग एकदा वाद सुरू झाला की त्याला काही नियम, ताळतंत्र रहात नाही. माणूस दुराग्रही होतो आणि वादविषयाची कक्षा सोडून भरकटतो. म्हणून साधक भक्ताने वाद करू नये. त्याला वादाची आवड असता कामा नये. दुसरा कोणी वाद करू लागला तरी त्याने कटाक्षाने वाद टाळला पाहिजे कारण वादाने शक्तिपात होतो आणि साधन मंद होते. तसेच दुसरा माणूस वादामध्ये तरबेज असला आणि त्याने

आपल्याला वादामध्ये निरुत्तर केले तर आपली श्रद्धा डळमळीत होण्याची भीती असते म्हणूनही साधकाने वादापासून दूर राहिले पाहिजे. याच्या उलट साधक वादात विजयी झाला तरी त्यामुळे अहंकार वाढून घात होण्याची शक्यता असते. म्हणून ज्यात दोन्ही बाजूंनी नुकसानच पदरात पडते तो वाद टाळावा.

पूर्वपक्षाचे म्हणणे सविस्तर मांडून उत्तरपक्षात त्यांचे सर्व मुद्दे अत्यंत तर्कशुद्ध पद्धतीने खोडून काढण्यात शंकराचार्य अजोड होते. पण त्यांनी देखील विवेकचूडामणीत वादाची मर्यादा सांगितली आहे. ते म्हणतात, ''वाग्वैखरी शब्दझरी शास्त्रव्याख्यानकौशलम्। वैदुष्यं विदुषां तद्वद्भुक्तये न तु मुक्तये॥'' (त्याप्रमाणेच शब्दांचा अखंड ओघ असणारी पंडितांची वाणी, शास्त्रांचे विवेचन करण्यातील त्यांचे कौशल्य आणि विद्वत्ता देखील भोगांना - केवळ पोट भरण्यास आणि बुद्धीचा आनंद भोगण्यास - उपयोगी पडते. मोक्ष मिळविण्यासाठी त्याचा काहीही उपयोग होत नाही.)

वादामध्ये तर्काला प्राधान्य असते. तेथे श्रद्धेला स्थान नसते. त्यामुळे जो अधिक तर्क कुशल असतो तो दुसऱ्याला पराजित करतो. पण याचा अर्थ त्याला सत्याचे ज्ञान झालेले असते, असा नव्हे. म्हणून तुकाराम महाराज म्हणतात. ''कोणाचिया न पडों छंदा। गोविंदासी आळवूं॥१॥ बहुतांची बहुत मतें। अवघें रितें पोकळ॥२॥ घटापटा ढवळी (डहुळे) मन। होय सीण न करूं ते॥३॥ तुका म्हणे पांडुरंग। भरू भाग आला तो॥४॥''

वादाचा आश्रय घेऊ नये याचे आणखी एक कारण असे की वाद कसा वाढेल आणि कोणीकडे वहात जाईल ते सांगता येत नाही. काही वेळा मुद्दे संपतात आणि मग व्यक्तिगत उखाळ्यापाखाळ्यांना सुरुवात होते. ईश्वराचे अस्तित्व तर्काने व वादविवादाने सिद्ध करता येत नाही आणि खोडून काढता येत नाही. तो श्रद्धेचा व अनुभूतीचा विषय आहे. भक्ती ही स्वयंप्रमाणरूप असून तिला दुसऱ्या कोणत्याही प्रमाणाची आवश्यकता नाही असे नारदांनी ५९ व्या सूत्रात सांगितले आहे. म्हणून भक्ती हा वादविषय होऊच शकत नाही. श्रेष्ठ भक्त वादाच्या वाटेला कधीच जात नाहीत पण साधकांनीही या बाबतीत सावध राहिले पाहिजे.

## ४.४ : भक्ताने काय करावे

### सूत्र शहात्तरावे

**भक्तिशास्त्राणि मननीयानि तदुद्बोधककर्माणि करणीयानि॥७६॥**

**भक्तिशास्त्राणि**= भक्तिविषयक शास्त्रे. **मननीयानि**= मनन करावे. **तदुद्बोधक**= त्याला (भक्तीला) साहाय्यभूत होणारी. **कर्माणि**= कर्मे. **करणीयानि**= करावी.

**भक्तिविषयक शास्त्रांचे मनन करावे आणि भक्तीला साहाय्यभूत होणारी (ज्यांमुळे भक्ती वाढेल अशी) कर्मे करावी.**

**विवरण** : 'हितशासनाच्छास्त्रम्' म्हणजे प्राणिमात्रांच्या हिताचे शिक्षण जे देते त्याला शास्त्र म्हणतात. शास्त्रामध्ये व्यवस्था (order) असते आणि योजना (system) असते. षड्दर्शनांमधील दर्शन या शब्दाचा System of Philosophy असा अर्थ आहे. कोणत्याही शास्त्रामध्ये -शास्त्रग्रंथामध्ये पुढील आठ गोष्टी असतात. ''उपक्रमोपसंहारो अभ्यासोऽपूर्वता फलम्। अर्थवादोपपत्तिश्च लिंगं तात्पर्यनिश्चयम्॥'' उदाहरणार्थ, श्रीमत्‌भगवद्गीता हे शास्त्र आहे. कुरुक्षेत्रावर लढाई करण्यासाठी आलेल्या अर्जुनाला मोह होऊन मी लढत नाही असे त्याने श्रीकृष्णाला सांगितले हा या शास्त्राचा **उपक्रम** आहे तर श्रीकृष्णाचा उपदेश ऐकल्यानंतर माझा मोह नाहीसा झाला; आता तू सांगशील तसे मी करेन असे त्याने श्रीकृष्णाला सांगितले हा या शास्त्राचा **उपसंहार** आहे. **अभ्यास** म्हणजे गोष्ट स्वाधीन नाही ती स्वाधीन होईपर्यंत पुनःपुन्हा प्रयत्न करणे. **अपूर्वता** म्हणजे पूर्वी जे सांगितलेले नाही ते सांगणे. **फल** म्हणजे त्या शास्त्राच्या अभ्यासाने काय साध्य होईल ते सांगणे. **अर्थवाद** म्हणजे शास्त्रविषयाची स्तुती. **उपपत्ति** म्हणजे तर्कशुद्ध विवेचन आणि **तात्पर्यनिश्चय** म्हणजे त्या शास्त्राचे - शास्त्रग्रंथाचे तात्पर्य निश्चयपूर्वक -ठामपणे सांगणे.

कोणत्याही शास्त्राची सुरुवात त्या शास्त्राच्या व्याख्येने होते. व्याख्येमुळे त्या विषयाचा विस्तार आणि मर्यादा स्पष्ट होतात. नारद भक्तिसूत्रात नारदांनी ''सात्वस्मिन् परमप्रेमरूपा'' अशी भक्तीची व्याख्या दिलेली आहे. शास्त्रविषयाची व्याख्या जरी सुरुवातीला दिलेली असली तरी तिचा संपूर्ण अर्थ त्या शास्त्राच्या अभ्यासाच्या शेवटी अभ्यासकाच्या लक्षात पूर्णपणे ठसतो. म्हणूनच Definition is the beginning and end of knowledge असे ॲरिस्टॉटलने म्हटले आहे. एकाच शास्त्राच्या वेगवगळ्या अभ्यासकानी वेगवेगळ्या व्याख्या केलेल्या असतात आणि त्यांपैकी आपल्याला कोणती मान्य आहे ते अभ्यासकाला कारणे देऊन सांगावे लागते. नारदांनी केलेल्या व्याख्येचा विचार आपण दुसऱ्या सूत्राच्या विवरणात केलेला आहे. या ठिकाणी भक्तीच्या आणखी काही व्याख्या पाहू.

(१) भज् या धातूचा सेवा करणे असा अर्थ आहे. (भज् सेवायाम्) म्हणून भगवंताची अथवा आपल्या गुरूंची सेवा करणे म्हणजे त्यांना जे आवडते ते करणे म्हणजे भक्ती असे म्हणता येईल. त्यांना पूजेच्या आडंबराऐवजी अखंड स्मरण आवडते, ते करावे.

(२) भज् म्हणजे भाग करणे असाही अर्थ आहे. प्रपंचात जे माझे आहे त्याचा मी उपभोग घ्यावा व जे भगवंताचे आहे ते भगवंताला द्यावे, म्हणजे भक्ती होते. विचार केला की लक्षात येते की माझे असे काहीच नाही, जे आहे ते सर्व भगवंताचेच आहे; म्हणून ते सर्व त्याला दिले की मी फक्त साधनापुरता रहातो..

(३) भज् म्हणजे भंजन करणे, विध्वंस करणे, प्रपंचाची वासना, विकार, आसक्ती यांचा नाश करणे म्हणजे भक्ती.

(४) गोपालपूर्वतापिनी उपनिषदात म्हटले आहे 'किं नाम भजनम् ?' 'भजनं नाम रसनम्' गाय जशी रवंथ करते तसे भगवंताचे नाम एकसारखे मनात घोळवणे म्हणजे भक्ती.

(५) ''अनुकूलस्य वर्तनम्, प्रतिकूलस्य वर्जनम्। कृष्णानुशीलनं नित्यं भक्तिरित्यभिधीयते॥'' कूल म्हणजे किनारा. अनुकूल म्हणजे आपल्याला ज्या किनाऱ्यावर रहावयाचे आहे तो किनारा व प्रतिकूल म्हणजे दुसरा किनारा. ज्या किनाऱ्यावर भगवंत आहे तेथे रहाण्याचा प्रयत्न करावा आणि जेथे तो नाही तेथे रहाणे टाळावे आणि त्यासाठी सतत कृष्णाचे अनुशीलन म्हणजे चिंतन करावे यालाच भक्ती म्हणतात. चिंतन प्रेमाने, भीतीने अथवा द्वेषाने होऊ शकते. भक्तीमध्ये प्रेमाने केलेले चिंतन अभिप्रेत आहे.

(६) शंकराचार्यांनी 'विवेकचूडामणि'मध्ये भक्तीची व्याख्या केली आहे ती अशी :

''मोक्षकारण सामग्र्यां भक्तिरेव गरीयसी।
स्वस्वरूपानुसंधानं भक्तिरित्यभिधीयते॥''

आपल्या मूळ स्वरूपाचे अनुसंधान ठेवणे म्हणजे भक्ति. त्यासाठी आचार्यांनी सर्वकर्मसंन्यास सांगितला आहे. संन्यासाश्रमात प्रवेश करून भगवी वस्त्रे धारण करण्याला कर्मसंन्यास म्हणतात. पण कर्म करीत असताना मी कर्ता हा भाव सोडणे हा सर्वकर्मसंन्यास होय.

(७) जें जें भेटिजे भूत। तें तें मानिजे भगवंत। हा भक्तियोग निश्चित। जाण माझा॥ ही ज्ञानेश्वर महाराजांनी केलेली भक्तीची व्याख्या आहे.

(८) सा तु अस्मिन् परमप्रेमरूपा। ही नारदांची व्याख्या आपण पाहिली आहे.

(९) हेचि थोर भक्ती आवडते देवा॥ संकल्पांची माया संसाराची ॥१॥ ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें। चित्तीं असों द्यावें समाधान ॥२॥ असे तुकाराम महाराज सांगतात. संसाराच्या मायेवर म्हणजे आसक्तीवर पाणी सोडून भगवंत ठेवील त्या स्थितीत समाधानाने रहाणे म्हणजे भक्ती होय.

(१०) प्रपंचात जेवढी आसक्ती। तेवढी भगवंतावर प्रीती। याचें नांव भक्ती॥ अशी श्रीमहाराजांनी भक्तीची व्याख्या केली आहे. प्रपंचात गुंतलेले आपले मन प्रपंचातून काढून भगवंताकडे अथवा सद्गुरूंकडे वळवावे. त्यांचा वियाग सहन होऊ नये आणि मी आणि माझे सर्व त्यांच्या पायावर वाहावे. भक्त मीपणाने मेला म्हणजेच तो भगवंताचा अथवा सद्गुरूंचा होतो. भगवंताला भक्ताचा संसार नको असतो कारण खरे म्हणजे सर्व संसार त्याचाच आहे. प्रपंचातील आसक्ती सोडून जीवनात जी चांगली-वाईट स्थिती येईल ती भगवंताच्या इच्छेने आलेली आहे असे खऱ्या भक्ताला वाटते व त्यामुळे त्याचे समाधान भंगत नाही.

या अनेक व्याख्यांपैकी आपणास रुचेल त्या कोणत्याही व्याख्येवर साधकाने चिंतन, मनन करावे. गुरु जो मार्ग दाखवितील त्या मार्गानेच जावे. भक्तिशास्त्रावर अनेक ग्रंथ लिहिलेले आहेत म्हणून या सूत्रात भक्तिशास्त्राणि असे बहुवचन दिलेले आहे. अनेक ग्रंथ असले तरी केवळ त्यांच्या अभ्यासात साधकाने रमून जाऊ नये. वाचनापेक्षाही गुरूंनी जे सांगितले असेल त्यावर मनन आणि त्या नंतर त्यानुसार आचरण महत्त्वाचे आहे. भगवद्गीता, भागवत, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, दासबोध, तुकाराम महाराजांचे अभंग, नारदांची व शांडिल्यांची भक्तिसूत्रे यांसारखे भक्तीसंबंधी सांगणारे अनेक उत्तमोत्तम ग्रंथ आहेत. पण त्या सर्वांचा केवळ अभ्यास करावयाचे ठरविले तरी आयुष्य पुरणार नाही आणि साधन करणे बाजूलाच राहील! म्हणून शब्दपांडित्याच्या मागे न लागता साधकाने नामस्मरणासारख्या भक्तिसाधनाला जास्तीत जास्त वेळ द्यावा. साधन डोळस होण्यापुरताच भक्तिशास्त्राचा अभ्यास करावा. यासाठीच सूत्राच्या दुसऱ्या भागात नारदांनी भक्तीला उपयोगी ठरणारी कर्मे, उदाहरणार्थ, पूजा, पोथीवाचन, भजन, कीर्तन इत्यादी भक्ती वाढण्यास मदत करणारी कर्मे करावी असे सांगितले आहे. ज्या कर्मांतून भक्तीचे पोषण होत नाही ती कर्मे करणे म्हणजे केवळ कर्मकांड होते. म्हणून ती कर्मे करताना

साधकाने अखंड सावधान राहिले पाहिजे. साधक भक्तांप्रमाणे श्रेष्ठ भक्तांनीही इतरांना मार्ग दाखविण्यासाठी भक्तिशास्त्राचा अभ्यास, मनन आणि आचरण करून साधकांपुढे आदर्श ठेवावा. "यद्यदाचरति श्रेष्ठः" या भगवद्गीतेतील श्लोकावर व्याख्यान करताना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "एथ वडिल जें जें करिती। तया नामु धर्मु ठेविती। तेंचि येर अनुष्ठिती। सामान्य सकळ ॥ १५८॥ हें ऐसें असे स्वभावें। म्हणोनि कर्म न संडावें। विशेषें आचरावें। लागें संतीं॥ १५९॥" ज्ञानेश्वरी अ. ३॥

सिद्ध भक्ताचाच खरा कर्मफल त्याग घडतो. हे खरे असले तरी साधक भक्तानेही ईश्वरार्पण बुद्धीने आपली कर्मे करावी. कर्तव्यबुद्धीने कर्मे करत राहिले म्हणजे त्यापासून अहंकार निर्माण होत नाही आणि चित्त शुद्ध होऊ लागते. ईश्वरार्पण बुद्धीने कर्म कसे करावे ते भगवंत सांगत आहेत. "परि मनें वाचा देहें। जैसा जो व्यापारु होये॥ तो मी करितु आहें। ऐसें न म्हणें ॥ ११७॥ करणें कां न करणें। हें आघवें तोचि जाणे। विश्व चळतसे जेणें। परमात्मेनि ॥ ११८॥ ...माळियें जेउतें नेलें। तेउतें निवांतचि गेलें। तया पाणिया ऐसें केलें। होआवें गा ॥ १२०॥ ...म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ती। इयें वोझीं नेघें मती। अखंड चित्तवृत्ती। आठवीं मातें॥ १२२॥ आणि जें जें कर्म निपजे। तें थोडें बहु न म्हणिजे। निवांतचि अर्पिजे। माझां ठायीं ॥ १२३॥ ज्ञानेश्वरी अ. १२॥ अशा प्रकारे कर्म करणे म्हणजे भक्तिशास्त्राला उद्बोधक कर्म करणे होय. कारण अशा कर्मांमुळे चित्तशुद्धी झाली की साधक करत असलेल्या नामस्मरणाची तीव्रता वाढते आणि काळही वाढू लागतो. तथापि जोपर्यंत नामस्मरण कर्माच्या पातळीवर असते तोपर्यंत त्याला मर्यादा रहाते. अखंड नामस्मरण करण्याइतकी धारणा नसल्यामुळे जेव्हा नामस्मरण होऊ शकत नाही तेव्हा साधकाने त्याला पोषक अशी भजन, कीर्तन, ग्रंथवाचन, श्रवण, पूजा इत्यादी कर्मे करून भगवंताचे प्रेम वाढावे म्हणून मनाला गुंतवून ठेवले पाहिजे. यासंबधीच्या भागवतातील श्लोकांवरील नाथांच्या टीकेतील काही भाग आचरणात आणण्यासारखा असल्याने त्या ओव्या येथे देत आहे. स्वतः भगवान श्रीकृष्ण उद्धवाला सांगत आहेत :

"ऐक उद्धवा पुण्यमूर्ती। ज्यासी आवडे माझी भक्ती। तो मज पढिया त्रिजगतीं। भजनें परमप्राप्ती मद्भक्तां ॥ २१५॥ ...अमृतरूपा ज्या माझ्या कथा। श्रद्धायुक्त श्रवण करितां। फिकें करूनियां अमृता। गोडी भक्तिपंथा तत्काळ लागे ॥ २१७॥ ...देखोनि कीर्तनाची गोडी। देव धावें लवडसवडीं। वैकुंठींहूनि घालीं उडी। अतितांतडीं स्वानंदें ॥ २२५॥ ...जैसें कीर्तन तैशीच पूजा। आदरें पूजी

गरुडध्वजा। पुष्पादि संभारसमाजा। अतिवोजा घवघवीत ॥२२७॥ ...'इंद्रियें' वेंचिलीं पूजाविधानें। 'वाचा' वेंचली हरिकीर्तनें। 'हृदय' वेंचलें माझेनि ध्यानें। 'अष्टांग' नमनें वेंचलें ॥२२९॥ ऐसा अत्यादरें वाडेंकोडें। सबाह्य वेंचला मजकडे। माझे भक्त देखिल्या पुढें। हरिखें मजकडे येवोंचि विसरे ॥२३०॥ माझे भक्त भाग्यें येती घरा। तैं पर्वकाळ दिवाळी दसरा। तेथें तीर्थे धांवतीं माहेरा। जेवीं सासराहूनि कुमारी ॥२३१॥ ...मागां सांडूनि माझी पूजा। जेणें मद्भक्त पूजिले वोजा। तेणें मज पूजिलें अधोक्षजा। परिवारसमाजासमवेत ॥२३६॥ प्रतिमा माझ्या अचेतन व्यक्ती। भक्त माझ्या सचेतन मूर्ति। त्यासीं पूजिल्या मीं श्रीपती। यथानिगुतीं संतोषें ॥२३७॥ ...सांडूनि अहंकार दुजा। सर्व भूतीं भावो माझा। हे उत्तमोत्तम माझी पूजा। मज अधोक्षजा पढियंती ॥२४२॥ ...स्वधर्मक्रिया करणें। तेही अर्पी मजकारणें। मजवेगळें कांही करणें। करूं नेणे अणुमात्र॥२४७॥ सर्वेंद्रियांचिये स्थितीं। सहजें निपजे माझी भक्ती। माझें नाम माझी कीर्ती। वाचा रिती राहों नेणे ॥२४८॥ मनासी आवडे जें जें कांहीं। तें तें अर्पी मजचि पाहीं। शेखीं आपुलें मन तेंही। माझ्या ठायीं समर्पी॥२४९॥ ...आवडीं करितां माझें भजन। विसरे भोगाची आठवण। माझे प्राप्तीलागीं जाण। रिता क्षण जावों नेदी ॥२५५॥ ...हृदयीं मी स्वतःसिद्ध जांण। त्या माझें करूनि आवाहन। आपण करी जें भोजन। तेंही मदर्पण तो करी ॥२५९॥ कवळकवळीं हरिस्मरण। तें अन्नचि होय ब्रह्म पूर्ण। यापरी माझे भक्त जाण। कर्म मदर्पण स्वयें करिती ॥२६०॥ ऐशीं सर्व कर्में कृष्णार्पण। सर्वदा जो करी जाण। त्याचें मन होय मदर्पण। तेंचि निरूपण देवो सांगे ॥२६१॥ ...निःशेष मावळल्या अहंकृती। भूतें निजात्मरूप दिसती॥ माझ्या स्वरूपाची 'सहजस्थिती'। ते माझी मुख्य भक्ति उद्धवा ॥२६९॥"

एकनाथी भागवत अध्याय १९

साधकाने कोणता आदर्श समोर ठेवावा हे वरील अवतरणावरून लक्षात येईल. साधकाने अतिशय सावधान राहून मनाला साधनात गुंतवून ठेवले पाहिजे. थोडा वेळ देखील मनाला भरकटू देऊ नये. यासाठी साधकाने अर्धा क्षण देखील व्यर्थ घालवू नये असे पुढील सूत्रात नारद सांगत आहेत.

## सूत्र सत्याहत्तरावे

**सुखदुःखेच्छलाभादित्यक्ते काले प्रतीक्ष्य (क्ष)माणे क्षणार्धमपि व्यर्थं न नेयम् ॥७७॥**

**सुख, दुःख, इच्छा, लाभ आदि त्यक्ते= सुख, दुःख, इच्छा, लाभ वगैरेंचा त्याग करून - इत्यादींपासून मोकळे होऊन (मग साधन करू म्हणून) काले प्रतीक्ष्यमाणे= (योग्य) काळाची वाट पहात. क्षणार्धम्= अर्धा क्षण. अपि= देखील. व्यर्थं= वाया. न नेयम्= घालवू नये.**

**सुख, दुःख, इच्छा (वासना) लाभ इत्यादींपासून मुक्त होऊन (मग साधन करू असे मनाशी ठरवून) योग्य काळाची वाट पहात राहून अर्धा क्षण देखील (साधन न करता) वाया घालवू नये.**

**विवरण :** एकनिष्ठ भक्ताला अखंड भगवत् चिंतनात रहा असे सांगावे लागत नाही कारण ते साधल्याखेरीज तो एकनिष्ठ किंवा सिद्ध भक्त होऊ शकत नाही. म्हणून हे स्पष्ट आहे की हे सूत्र साधकांसाठी आहे. वाद करू नये या चौऱ्याहत्तराव्या सूत्रापासूनची ही सूत्रे साधकांसाठी आहेत. संसारात सुख-दुःख, लाभ-हानी, यश-अपयश, सन्मान-अपमान ही द्वंद्वे रहाणारच आणि त्यांपासून सुख दुःखही भोगावे लागणार. तथापि होणारे सुख वा दुःख तात्पुरते असते. संसारात शाश्वत सुख मिळणे शक्य नाही अशी माणसाची खात्री झाली आणि तात्पुरत्या सुखाऐवजी शाश्वत सुख हवे असा साधकाचा दृढ निश्चय झाला की ते मिळविण्याचा मार्ग कोणता याचा शोध तो घेऊ लागतो. सद्ग्रंथांच्या वाचनाने आणि सत्पुरुषांच्या भेटीमुळे त्याच्या साधनाला निश्चित दिशा मिळते. भक्तिमार्गाकडे तो वळला तर नवविधा भक्तीमधील एखाद्या मार्गाने तो वाटचाल करू लागतो. तथापि प्रपंचाची खेच त्या वाटचालीत अडथळे निर्माण करते. साधनाची गोडी निर्माण झालेली नसल्यामुळे ते करताना आळस येतो. अजून भगवंताविषयी प्रेम वाटत नसते; मग परमप्रेमाची गोष्ट दूरच. म्हणून जोपर्यंत भगवंताच्या भेटीची तळमळ लागत नाही तोपर्यंत साधनात उत्कटता येत नाही. यासाठी सुरुवातीच्या काळात साधकाने काही संकल्प करून साधनाचा दृढ अभ्यास केला पाहिजे. हा अभ्यास करताना कधीही आत्मसंतुष्टता येता कामा नये. म्हणून अखंड सावधानता हे साधनाचे मर्म आहे असे श्रीमहाराज सांगत असत. भगवंताचे दर्शन हे ध्येय ठरविल्यानंतर साधकाने सर्व काही ठाक-ठीक झाल्यावर साधन करू असा विचार सुद्धा मनात आणू नये आणि दिवसातला अर्धा क्षण सुद्धा साधन न करता फुकट घालवू नये असे नारदांनी या सूत्रात सांगितले आहे.

श्रीमहाराज एका प्रवचनात (२५ जानेवारी) म्हणतात, "कारवारकडचे एक गृहस्थ भेटायला आले आणि म्हणाले, 'मी रिकाम्या वेळात नामस्मरण करतो.'

त्यावर मी म्हटले, साऱ्या जन्मात महत्त्वाचा आणि सार्थकी लागलेला वेळ असेल तर तो हाच; त्याला तुम्ही रिकामा वेळ कसा म्हणता?'' आणखी एकदा ते म्हणाले की तुमचा जेवढा वेळ रिकामा जातो तेवढा वेळ नाम घेतलेत तर नामाच्या राशी पडतील. परिस्थिती सुधारली की नाम घेईन, म्हातारपणी नामस्मरण करीन म्हणणाऱ्याकडून ते कधीच होत नाही. म्हणून म्हणतात की 'जाते घडि ती आपुली साधा, करा काय ते आता करा' कारण पुढच्या क्षणी काय घडणार आहे ते कोणास माहीत! एक सूफी संत त्याच्याकडे जाणाऱ्या प्रत्येकास अंतकाळी मुखात नाम यावे म्हणून अखंड नामस्मरण करा असे सांगत असे. त्याच्याकडे जाणारा एक माणूस त्याला म्हणाला, महाराज, याची खरेच आवश्यकता आहे का? संत म्हणाला, तसेच काही नाही; मृत्यूच्या आधीचा एक दिवस जरी तू अखंड नामस्मरण केलेस तरी चालेल. रोज नामस्मरण करत रहाण्यापेक्षा हे बरे आहे म्हणून तो माणूस घरी गेला. मात्र रात्री अंथरुणावर पडल्यावर त्याच्या लक्षात आले की आपल्याला मृत्यू केव्हा येणार हे माहीत नसल्यामुळे त्याच्या आधीचा एक दिवस ठरविता येणे शक्य नाही. मृत्यू केव्हाही येऊ शकतो म्हणून साधूने वेगळ्या शब्दात आपल्याला सर्वकाळ अखंड नामस्मरण करावयास सांगितले आहे. म्हातारपणी परमार्थ करू, आत्तापासून कशाला असे जर तरुणपणी म्हटले तर एक म्हणजे म्हातारे होईपर्यंत आपण जगू ही खात्री नाही आणि जगलो तरी त्यावेळी शरीराची व मनाची अवस्था कशी राहील कोणास ठाऊक! भर्तृहरीने म्हटले आहे, ''यावत्स्वस्थमिदं कलेवरगृहं यावच्च दूरे जरा। यावच्चेन्द्रियशक्तिरप्रतिहता यावत्क्षयो नायुषः। आत्मश्रेयसि तावदेव विदुषा कार्यः प्रयत्नो महान्। प्रोद्दीप्ते भवने च कूपखननं प्रत्युद्यमः कीदृशः॥'' (जोपर्यंत शरीर सुदृढ व रोगरहित आहे, म्हातारपण दूर आहे, इन्द्रियांची शक्ती चांगली आहे, आयुष्य शिल्लक आहे तोपर्यंतच विचारी माणसाने आत्मसिद्धीसाठी मोठे प्रयत्न केले पाहिजेत. घराला आग लागल्यावर विहीर खणण्याचे काम करून काय होणार?) म्हणून एखाद्या शुभ दिवसाची अथवा मुहूर्ताची वाट पहात न थांबता साधकाने आत्ता या क्षणी साधनास सुरुवात करावी. कारण जगाचे साम्राज्य दिले तरी त्याच्या मोबदल्यात गेलेला क्षण पुन्हा मिळू शकत नाही. जीवनाची अनिश्चितता लक्षात घेऊन ''मरणाचें स्मरण असावें। हरिभक्तीस सादर व्हावें।'' असे समर्थ रामदास सांगतात. कबीर म्हणतात, ''काल करै सो आज कर, आज करै सो अब। पलमें परलै होयगी, फेरि करैगा कब॥'' तसेच ''कबिरा सब सुख राम है, औरहिं दुखकी रासी। सुर नर मुनि असुर सुर, परै

कालकी फाँसी॥'' शंकराचार्यांनी ईश्वराची आर्तपणे प्रार्थना करताना म्हटले आहे, ''आयुर्नश्यति पश्यतां प्रतिदिनं याति क्षयं यौवनम्। प्रत्यायान्ति गताः पुनर्नदिवसाः कालो जगद्भक्षकः। लक्ष्मीस्तोयतरङ्गभङ्गचपला विद्युच्चलं जीवितम्। तस्मान्मां शरणागतां शरणद त्वं रक्ष रक्षाधुना॥'' (पहाता पहाता रोज आयुष्य संपते आहे, तारुण्य सरते आहे, गेलेला दिवस पुन्हा परतून येत नाही. काल जगाचा घास करतो आहे. पाण्यावरील तरंगांप्रमाणे लक्ष्मी चंचल आहे आणि जीवन विजेप्रमाणे अस्थिर आहे. म्हणून आश्रय देणाऱ्या भगवंता, मी तुला शरण आलो आहे; माझे रक्षण कर.) भगवद्गीतेत आठव्या अध्यायात भगवंतानी आश्वासन दिले आहे की जो कोणी अंतकाळीही केवळ माझेच स्मरण करीत शरीराचा त्याग करून जातो तो साक्षात माझ्या स्वरूपाला प्राप्त होतो. अंतकाळीही म्हणताना त्या पूर्वीचा सर्वकाळ भगवंताचे नाम मुखात असावे हे अभिप्रेत आहे. शिवाय सर्वकाळ नामस्मरणाचा अभ्यास केला तरच अंतकाळी ते स्मरण रहाण्याची शक्यता. शक्यता म्हणावयाचे कारण असे की अंतकाळी कोणती सुप्त वासना प्रबळ होईल ते सांगता येत नाही. म्हणून अर्धा क्षण देखील वाया न घालवता जन्मभर इतके नाम घ्यावे की नाम घेण्यापलीकडे दुसरी वासनाच राहू नये. अंतकाळी वात, पित्त, कफादींचा जोर वाढला तर नाम मुखात येऊ शकत नाही म्हणून भक्त भगवंताजवळ प्रार्थना करतो की ''इतना तो करना स्वामी! जब प्राण तनसे निकले। गोविन्द नाम लेकर फिर प्राण तनसे निकले॥ जब प्राण कण्ठ आवे, कोई रोग ना सतावे। यम दरश ना दिखावे, जब प्राण तनसे निकले॥'' समर्थ रामदास सांगतात, ''नाम स्मरें निरंतर। तें जाणावें पुण्यशरीर। महादोषांचे गिरिवर। रामनामें नासती॥'' म्हणून काल व्यर्थ न घालवतां सदैव भगवत् स्मरणात रहावे.

अशा प्रकारे अखंड साधन करताना कोणते दैवी गुण साधकाने आपल्या अंगी बाणवावे ते नारदांनी पुढील सूत्रात सांगितले आहे.

## सूत्र अठ्ठ्याहत्तरावे

**अहिंसासत्यशौचदयास्तिक्यादिचारित्र्याणि परिपालनीयानि ॥७८॥**

**अहिंसा= हिंसा न करणे. सत्य= खरेपणा. शौच= शुद्धता, पावित्र्य. दया= दया. आस्तिक्य= देवाच्या अस्तित्वावर श्रद्धा. आदि= वगैरे. चारित्र्याणि= सद्गुण. परिपालनीयानि= सर्व प्रकारे पालन करावे-आचरणात आणावे.**

**अहिंसा, सत्य, पावित्र्य, दया, देवाच्या अस्तित्वावर श्रद्धा यांसारख्या सद्गुणांचे आचरण व संवर्धन करावे.**

**विवरण** : श्रीमद्भगवद्गीतेत सांगितलेल्या दैवी गुणांपैकी काही गुणांचा उल्लेख करून नारदांनी आदि म्हणजे यांसारख्या दैवी गुणांचे आचरण व संवर्धन करावे असे या सूत्रांत सांगितले आहे. व्यवहारात देखील समाजाच्या स्वास्थ्यासाठी आणि स्थैर्यासाठी व व्यक्तीच्या उत्कर्षासाठी आणि शुद्ध चारित्र्यासाठी सर्वांनी नीतिनियमांचे पालन करावे अशी अपेक्षा असते. मग पारमार्थिक जीवन पद्धतीचे आचरण करताना ज्यांची विवेकबुद्धी जागी आहे व तिला वैराग्याची जोड मिळालेली आहे अशा साधकांनी चित्तशुद्धीसाठी दैवी गुणांचे संवर्धन करणे आवश्यक आहे हे मुद्दाम सांगावयाला नको. तथापि सूत्रे रचताना कोणतीही संदिग्धता रहाता कामा नये म्हणून साधकाचे आचरण कसे असले पाहिजे ते नारदांनी काही सूत्रांत सांगितले आहे. अंतःकरणाच्या शुद्धीसाठी दुर्गुणांचा त्याग आणि सद्गुणांचे संवर्धन आवश्यक असते. दुर्गुणांचे मूळ विषयवासना आणि देहाहंकारात आहे. म्हणून ज्यांच्यामुळे विषयवासना आणि देहाहंकार यांची वाढ होते ते दुर्गुण आणि ज्यांच्या आचरणामुळे ही दोन्ही कमी होतात ते सद्गुण असे म्हणावयास हरकत नाही. नारद भक्तीसंबंधी सांगत आहेत, म्हणून साहजिकच भक्ती करणाऱ्या साधकांनी भक्तिसाधनांनीच चित्तशुद्धी साधावी हे त्यांना अभिप्रेत आहे. उदाहरणार्थ, मनात येणारे विषयाचे स्मरण नाहीसे करण्यासाठी उठता-बसता, येता-जाता, खाता-पिता नामस्मरणाचा अभ्यास करून विषयांच्या स्मरणाला वेळच मिळू नये असा साधकाचा प्रयत्न असावा. "बोलावा विठ्ठल, पहावा विठ्ठल। करावा विठ्ठल जीवभाव॥" असा तुकाराम महाराजांनी अभ्यास केला आणि त्यामुळे "तुका म्हणे देह भरिला विठ्ठलें। काम क्रोधें केलें घर रितें॥" अशी त्यांची अवस्था झाली. दुर्गुणांचा त्याग केला पाहिजे हे त्यांच्या मनात ठसले, विठ्ठलाची आवड मनात निर्माण झाली आणि त्यांनी विठ्ठलाची कळवळून प्रार्थना केली की "पापाची वासना नको दावूं डोळां। त्याहूनि अंधळा बराच मी ॥१॥ निंदेचें श्रवण नको माझे कानीं। बधिर करोनि ठेवीं देवा ॥२॥ अपवित्र वाणी नको माझ्या मुखा। त्याजहुनि मुका बराच मी ॥३॥ नको मज कधीं परस्त्रीसंगति। जनांतुन माती उठतां भली ॥४॥ तुका म्हणे मज अवघ्याचा कांटाळा। तूं एक गोपाळा आवडसी ॥५॥" वासना क्षीण झाल्या की साधकाला साधनात गोडी वाटू लागते. तथापि वासना क्षीण झाल्या तरी त्या चित्तात खोल असतात

म्हणून त्या बाबतीत साधकाने सावध राहणे आवश्यक असते. शेवटी आत्मसाक्षात्कारानंतरच वासना समूळ नाहीशा होतात. साधन स्वरूपात सद्गुण अपूर्ण असतात आणि पराभक्तीच्या प्राप्तीनंतर त्यांना पूर्णत्व येते. या दृष्टीने भक्ती ही सर्व सद्गुणांची जन्मभूमी म्हणता येईल. गुरुदेव रानडे तर म्हणतात, की भक्ती हा मुख्य वा केन्द्रिय सद्गुण असून इतर सद्गुण हे भक्तीचे निरनिराळे आविष्कार अगर पैलू आहेत.

पतंजलींनी योग सिद्ध होण्यासाठी अहिंसा, सत्य, अस्तेय (चोरी न करणे), ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह (अनावश्यक विषयांचा व त्यांच्या साधनांचा संग्रह न करणे) हे पाच यम आणि शौच, संतोष, तप, स्वाध्याय आणि ईश्वर प्रणिधान हे पाच नियम सांगितलेले आहेत. शरीर स्वच्छ ठेवणे आणि मन पवित्र राखणे हे शौच, प्राप्त परिस्थितीत मनाचे समाधान राखणे हा संतोष, जिभेवर नियंत्रण ठेवून, इंद्रिये स्वाधीन करून शीत उष्णादि द्वंद्वे सहन करणे हे तप, उपास्य देवतेच्या मंत्राचा जप करणे, शास्त्राध्ययन करणे हा स्वाध्याय आणि सर्व कर्मे ईश्वरार्पण बुद्धीने करणे म्हणजे ईश्वर प्रणिधान होय. ज्ञानमार्गातही साधन चतुष्टय संपन्न झाल्यानंतरच साधकाची या मार्गावरची खरी वाटचाल सुरू होते. या संक्षिप्त वर्णनावरून लक्षात येईल की ज्ञानमार्ग असो, योगमार्ग असो किंवा भक्तिमार्ग असो या तीन्हींमध्ये दुर्गुणांचा त्याग आणि सद्गुणांचे संवर्धन केल्याशिवाय साधकाची प्रगती होऊ शकत नाही.

या सद्गुणांनुसार आचरण करताना त्यांचा अतिरेक करणे हा दुर्गुण ठरतो म्हणून त्यांचे आचरण करताना तारतम्य ठेवावे लागेल. उदाहरणार्थ, अहिंसा पालन करताना एखादा आततायी माणूस मारावयाला आला तर त्याला मारूनच स्वतःचे व इतरांचे रक्षण करावे लागेल. 'आततायिनमायान्तम् हन्यादेवाविचारयन्' असे मनूंनी सांगितले आहे. तसेच गायीमागे धावणाऱ्या कसायाने इकडून गाय गेली काय म्हणून विचारले तर खोटे बोलावे लागेल. अशा प्रसंगी मौन पाळावे अथवा असंबद्ध बोलावे असे मनूंनी म्हटले आहे. याचाच अर्थ स्वार्थासाठी हिंसा वा असत्य यांचा आश्रय करू नये. हा नियम लक्षात ठेवून आपण सूत्रात सांगितलेल्या सद्गुणांचा विचार करू.

**अहिंसा**

भगवद्गीतेच्या बाराव्या अध्यायात भक्ताची लक्षणे सांगताना 'अद्वेष्टा सर्वभूतानां' म्हटले आहे. भक्ताच्या मनात भूतमात्रांविषयी द्वेष नसतो. त्यामुळे त्याच्या मनात हिंसेचे विचार येत नाहीत. प्रसंगी घरातील डास, झुरळे मारावी

लागली तरी त्यांच्याविषयी त्याच्या मनात द्वेष नसतो. हिंसा शरीराने, मनाने व वाणीने करता येते. या तीन्ही बाबतीत साधकाने सावध राहिले पाहिजे. एखाद्याला मारणे, रागाने बोलणे किंवा अबोला धरणे म्हणजे सामान्यतः हिंसा म्हणता येईल. पण मुलाने वाईट आचरण करू नये किंवा चुका सुधाराव्या या हेतूने त्याच्या आईवडिलांनी यांपैकी काही केले तर ती हिंसा होणार नाही. म्हणून अहिंसा व हिंसा यांचा विचार फार सूक्ष्म आहे. ज्ञानेश्वर महाराजांनी ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायात अहिंसेसंबंधी सुमारे शंभर ओव्या लिहिल्या आहेत. अहिंसेचे आचरण करणारा भक्त कसा असतो हे सांगताना ते म्हणतात, "कां कमळावरी भ्रमर। पाय ठेविती हळुवार। कुचुंबैल केसर। इया शंका ॥२४७॥ तैसे परमाणु पां गुंतले। जाणुनि जीव सानुले। कारुण्यामाजीं पाउलें। लपवूनि चाले ॥२४८॥" त्याचे बोलणे कसे असते? "कां नादब्रह्मचि मुसे आलें। कीं गंगापय उसळलें। पतिव्रते आलें। वार्धक्य जैसें ॥२६८॥ तैसे साच आणि मवाळ। मितले आणि रसाळ। शब्द जैसे कल्लोळ। अमृताचे॥"२६९॥" त्याच्या मनातच हिंसा नसते मग कृतीत कोठली असणार? "आतां मन तयाचें। सांगों म्हणों जरी साचें। तरी सांगितले कोणाचे। विलास हे ॥२९२॥ ...जें बीज भुईं खोंविलें। तेंचि वरी रुख जाहलें। तैसें इंद्रियाद्वारीं फांकलें। अंतरचि॥" १३.२९६॥ म्हणूनच "चित्त शुद्ध तरी शत्रु मित्र होती। व्याघ्रही न खाती सर्प तया॥" असे तुकाराम महाराज सांगतात. पूर्वी ऋषींच्या आश्रमात प्राणी आपले नैसर्गिक वैर विसरून एका ठिकाणी राहात अशी वर्णने पुराणात आढळतात. अहिंसा सिद्ध झाली की हे घडते. पतंजलीनीही त्यांच्या "अहिंसाप्रतिष्ठायां तत्संनिधौ वैरत्यागः।' या सूत्रात असे घडते म्हणून सांगितले आहे.

### सत्य

अहिंसेप्रमाणे सत्यालाही भक्ताच्या जीवनात महत्त्वाचे स्थान आहे. दैनंदिन व्यवहारात देखील खरे बोलणे हा गुण नीतिदृष्ट्या समाजाच्या धारणेसाठी महत्त्वाचा आहे. समाजातील सर्वजण खोटेच बोलू लागले तर त्या समाजात दैनंदिन व्यवहार चालणे अशक्य होईल. परमार्थाच्या दृष्टीने तर सत्यभाषण हे फार मोठे तप आहे. ज्ञानेश्वर महाराज सांगतात की मी सत्य भाषणाचे तप अनेक कल्प केल्यामुळे हे गीतारूपी बेट मला लाभले आहे - गीतेवर व्याख्यान करण्याची पात्रता आली आहे. "माझिया सत्यवादाचें तप। वाचा केलें बहुत कल्प। तया फळांचे हें महाद्वीप। पातली प्रभु ॥अ. १६.३२॥ भागवत धर्माच्या साधनात सत्याचा अंतर्भाव होतो. एकनाथ महाराज सांगतात, "सत्यापरतें

नाहीं तप। सत्यापरता नाहीं जप। सत्यें पाविजे सद्रूप। सत्यें निष्पाप साधक होती॥'' ए. भागवत ३.५३६॥ तथापि सत्य बोलताना कठोर बोलू नये. सत्य कसे बोलावे ते महाभारतात सांगितले आहे. ''सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात् न ब्रूयात्सत्यमप्रियम्। प्रियं च नानृतं ब्रूयात् एष धर्मः सनातनः॥'' म्हणजे या गुणाचे आचरण करतानाही साधकाने तारतम्य ठेवले पाहिजे. वाणीप्रमाणे कर्मामध्येही सत्याचाच आश्रय घेतला पाहिजे कारण असत्य कर्म बंधनाला कारण होते. म्हणून सत्पुरुषांचे आचरण कसे असते ते पुढील श्लोकात फार समर्पकरीतीने सांगितले आहे. ''यथा चित्तस्तथावाचा यथावाचस्तथाक्रिया। चित्तेवाचौक्रियायांच साधूनामेकरूपता॥''

**शौच**

शौच म्हणजे शुचिता, निर्मळपणा. बाह्य म्हणजे शरीर शुद्धी आणि अंतर्शुद्धी म्हणजे अंतःकरणाची शुद्धी या दोन्हींचा शौच या गुणात अंतर्भाव होतो. नित्य स्नान करणे, स्वच्छ वस्त्रे वापरणे, व्यायाम आणि योग्य असा आहार घेऊन शरीर निरोगी ठेवणे, पवित्र तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी जाणे व तेथे रहाणे इत्यादींमुळे बाह्य शुद्धी ठेवता येते. अंतर्शुद्धी जास्त सूक्ष्म आहे. मनाची स्वाभाविकपणे विषयांकडे ओढ असते; तेथून ते आवरून विकाररहित करावे लागते. त्यासाठी मनाला नामस्मरणात गुंतवून ठेवावे व नेहमी भगवंताची व सद्गुरूंची प्रार्थना करावी. दैवी गुणांची वाढ होऊ लागली की अंतःकरणाच्या शुद्धीसाठी साधकाला वेगळे प्रयत्न करावे लागत नाहीत. शौच या गुणासंबंधी ज्ञानेश्वर महाराज सांगतात, ''आतां निर्वाळूनि कनकें। भरिला गांगें पीयूखें। तया कलशाचियासारिखें। शौच असे ॥१९७॥ जे आंगीं निष्काम आचारु। जीवीं विवेकु साचारु। तो सबाह्य घडला आकारु। शुचित्वाचा॥अ. १६.१९८॥ ज्ञानेश्वरीच्याच तेराव्या अध्यायात श्रीकृष्ण अर्जुनाला सांगतात, ''म्हणे शुचित्व गा ऐसें। जयापाशीं दिसे। आंग मन जैसें। कापुराचे ॥४६१॥ ...बाहेरीं कर्मे क्षाळला। भितरीं ज्ञानें उजळला। इहीं दोहीं परी आला। पाखाळा एका ॥४६३॥ ...किंबहुना इयापरी। बाह्य चोख अवधारी। आणि ज्ञानदीपु अंतरीं। म्हणौनि शुद्ध ॥४६६॥ एऱ्हवीं तरी पांडुसुता। आंत शुद्ध नसतां। बाहेरि कर्म तो तत्त्वतां। विटंबु गा ॥४६७॥ ...म्हणोनि अंतरीं ज्ञान व्हावें। मग बाह्य लाभेल स्वभावें। वरि ज्ञानकर्मे संभवे। ऐसें कें जोडे ॥४७२॥ यालागीं बाह्य विभागु। कर्मे धुतला चांगु। आणि ज्ञानें फेडिला वंगु। अंतरींचा ॥४७३॥ तेथ अंतरबाह्य गेले। निर्मळत्व एक जाहलें। किंबहुना उरलें। शुचित्वचि ॥४७४॥

म्हणोनि सद्भाव जीवगत। बाहेरि दिसती फाकतजे स्फटिकगृहींचे डोलत। दीप जैसे ॥४७५॥ ...तैसें हृदय चोख। संकल्पविकल्पीं सनोळख। कृत्याकृत्य विशेख। फुडें जाणे ॥४८१॥ पाणिये हिरा न भिजे। आधणीं हरळु न शिजे। तैसी विकल्पजातें न लिंपिजे। मनोवृत्ती ॥४८२॥ तया नांव शुचित्वपण। पार्था गा संपूर्ण। हें देखसी तेथ जाण। ज्ञान आहे॥४८३॥" ज्ञानेश्वरी अ १३॥ कर्माचा हेतु चित्तशुद्धी असून आत्मज्ञान त्याच्याही पलीकडे आहे असे शंकराचार्यांनी विवेकचूडामणीत सांगितले आहे. एकनाथ महाराज सांगतात, "अंतर्शुद्धीचे कारण। मुख्यत्वे हरिकीर्तन। नामापरतें साधन। सर्वथा आन असेना॥" ए. भागवत अ. ५.३५३॥

**दया**

भूतमात्रांच्या दुःखाने अंतकरणात कळवळा उत्पन्न होऊन ते दुःख नाहीसे करण्यासाठी शक्य ते सर्व प्रयत्न करणे म्हणजे दया. निःस्वार्थी प्रेम हा दयेचा पाया आहे. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "कां चिखलीं रुतली गाये। धड भाकड न पाहे। जो तियेचिया ग्लानी होये। कालाभुला"॥अ. १६.१४२॥ जेथे स्वार्थ व ममता असते त्या प्रेमाला माया म्हणतात. त्या प्रेमामधील स्वार्थ गेला आणि सर्व भूतमात्रांचा समावेश होण्याइतका त्याचा विस्तार झाला की मायेचे दयेत रूपांतर होते. दया केवळ मानसिक पातळीवर न रहाता दुसऱ्याचे दुःख हलके करण्याचा माणूस प्रयत्न करू लागतो. भगवद्गीतेच्या सोळाव्या अध्यायातील दया या दैवी संपत्तीच्या गुणाबद्दल सांगताना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "आतां दया ते ऐसी। पूर्ण चंद्रिका जैसी। निववितां न कडसी। सानें थोर ॥१५४॥ तैसें दुःखिताचें शिणणें। हिरतां सकणवपणें। उत्तमाधम नेणें। विवंचू गा ॥१५५॥ ...तैसे पुढिलाचेनि तापें। कळवळलिये कृपे। सर्वस्वेंसीं दिधलें आपणपें। तरी थोडेंचि गमे॥१५७॥ निम्न भरलिया उणें। पाणी ढळोंचि नेणें। तेवी श्रांता तोषौनि जाणें। सामोरेया ॥१५८॥ पैं पायीं कांटा नेहटे। तंव व्यथा जीवीं उमटे। तैसा पोळे संकटें। पुढिलांचेनि ॥१५९॥ कां पावो शीतळता लाहे। कीं ते डोळ्यांचिलागीं होये। तैसा परसुखें जाये। सुखावतु ॥१६०॥ ...तो पुरुषु वीरराया। मूर्तिमंत जाण दया। मी उदयजतांचि तया। ऋणिया लाभे ॥१६२॥"

वाहाणारे पाणी वाटेमधील खळगा भरल्याखेरीज पुढे जात नाही त्याप्रमाणे समोरच्या दुःखी माणसाचे दुःख नाहीसे केल्याखेरीज दयाळू माणसाला स्वस्थ बसवत नाही. सर्व भूतमात्रांशी त्याची मैत्री असते, कारण तो सर्वांना आत्मवत् जाणत असतो. त्यामुळे त्याच्या ठिकाणी दया दाखवताना पक्षपात नसतो.

अहिंसा नकारात्मक आहे तर दया सकारात्मक आहे. ज्याच्याविषयी साधकाच्या मनात दया उत्पन्न होते आणि त्याला तो साहाय्य करतो त्याचे दुःख तर कमी होतेच पण त्याचबरोबर दया दाखविणाऱ्या साधकाचीही आध्यात्मिक प्रगती होते. शेक्सपिअरनेही म्हटले आहे, "Mercy is twice blest : It blesseth him that gives and him that takes, Tis mightiest in the mightiest; ...It is enthroned in the hearts of Kings, it is an attribute to God himself." (The Merchant of Venice Act IV Scene1.)

साधू कसा असतो ते सांगताना तुकाराम महाराज म्हणतात, "ज्यासि आपंगिता नाहीं। त्यासि धरी जो हृदयीं॥ दया करणें जे पुत्रासी। तेचि दासा आणि दासी॥" तो निराश्रितांचा आश्रय असतो आणि ममत्वरहित झालेला असल्यामुळे दया दाखविताना आपली मुले आणि दास यांच्यामध्ये भेदभाव करत नाही. असे साधू या खरोखर भगवंताच्या मूर्तीच होत. दुसऱ्या एका अभंगात मात्र त्यांनी सांगितलेले दयेचे लक्षण भगवंतांच्या गीतेतील वचनाशी मिळते जुळते आहे. आपल्या अवताराचा हेतु सांगताना साधूंचे रक्षण आणि दुष्टांचा नाश करण्यासाठी मी प्रत्येक युगात अवतार घेतो असे भगवंतांनी म्हटले आहे. तुकाराम महाराजही म्हणतात की प्राण्यांचे रक्षण ही दया आहेच पण दुष्टांना शासन करणे याचाही दयेतच अंतर्भाव होतो. "दया तिचे नांव भूतांचे पाळण। आणिक निर्दळपण कंटकांचे॥"

**आस्तिक्य**

वर सांगितलेल्या अहिंसा, सत्य, दया या गुणांचे मूळ आस्तिक्यात आहे. सामान्यतः वेदांवरील श्रद्धेला आस्तिक्य म्हणतात. पण भक्तिसूत्रांच्या संदर्भात आस्तिक्य म्हणजे ईश्वरभाव असा अर्थ योग्य ठरतो. मी आहे यावर माझा जितका दृढ विश्वास आहे तितकाच ईश्वर आहे यावर दृढ विश्वास असणे म्हणजे आस्तिक्यभाव. "हे त्रैलोक्यचि पुरुषोत्तमु। ऐसा साचा जयांचा मनोधर्मु। तया आस्तिकांचा आश्रमु। पांडवा गा॥" ज्ञानेश्वरी अ. ८.१९३॥ ही आस्तिकता येण्यासाठी साधकाने अभ्यास केला पाहिजे. "वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः॥" ज्ञानेश्वर महाराज सांगतात, "हे समस्तही श्रीवासुदेवो। ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भावो। म्हणोनि भक्तांमाजीं रावो। आणि ज्ञानिया तोचि॥" ज्ञानेश्वरी अ.७.१६॥ हे विश्व चालविणाऱ्या शक्तीची आस्तिकाला जाणीव असते; आणि विश्व चालविणारी ही शक्ती माझेही जीवन चालविते आहे असे तो

निष्ठापूर्वक जाणतो. नामस्मरणामुळे साधकाचा आस्तिकभाव जागा होतो, आणि अखंड स्मरणाने तो सतेज होतो. आस्तिकभाव दृढ होण्यासाठी भगवंताचे अखंड नामस्मरण, भगवंताशी संभाषण आणि सर्वकाळ त्याचे अनुसंधान ठेवणे अशा तीन पायऱ्या ब्रदर लॉरेन्सने सांगितल्या आहेत त्याचा साधकाने निष्ठापूर्वक अभ्यास केला पाहिजे. भगवंत सर्वज्ञ आहे, सर्व शक्तींनी परिपूर्ण आहे, तोच कर्ता आहे. तो जे जे करतो ते सर्व माझ्या हिताचेच करतो या सर्व गोष्टींची नामस्मरणाला पार्श्वभूमी असावी. मागे त्रेसष्टाव्या सूत्रात नारदांनी नास्तिकाचे नांवदेखील उच्चारू नये असे सांगितले आहे. त्याचबरोबर ज्यांच्या ठिकाणी आस्तिक्यभाव परिपूर्ण आहे अशा संतांची संगत करावी. श्रद्धा ही दह्यासारखी जमावी लागते. विरजण लावून दूध एकसारखे हलवले तर दही लागणार नाही. म्हणून श्रद्धेला धक्का पोहोचेल अशा ठिकाणी साधकाने जाऊ नये, अशा गोष्टी पाहू नयेत, ऐकू नयेत. त्याचप्रमाणे दुसऱ्याची श्रद्धा आणि आनंद बिघडवणे हे पाप आहे हे ध्यानात ठेवावे. श्रीमहाराज म्हणाले, हिमालयात बर्फ पडते; ते पडतांना कापसासारखे मऊ असते, पण थोडा वेळ गेल्यावर ते दगडापेक्षाही कठीण होते. श्रद्धा अशी घट्ट कठिण होईपर्यंत तिला सांभाळले पाहिजे. ती सांभाळणे म्हणजे साधनाचा अभ्यास आणि सत्पुरुषांचा सहवास करणे आहे.

ह्या सूत्राच्या शेवटी 'आदि' ह्या पदाचा उपयोग करून नारदांनी यांसारख्या इतर दैवी संपत्तीच्या गुणांचे आचरण व संवर्धन करावे असे सुचविले आहे. हृदयस्थ परमात्म्याचे सगुण साकार दर्शन व्हावे म्हणून त्याला शरण जाऊन त्याचे सर्वकाळ चिंतन करावे, सेवा करावी असे नारदांनी पुढील सूत्रात सांगितले आहे.

## सूत्र एकोणऐंशीवे

**सर्वदा सर्वभावेन निश्चिन्तितैर्भगवानेव भजनीयः ॥७९॥**

**सर्वदा= नेहमी. सर्वभावेन= सर्व शक्तींनिशी प्रेमभावाने निश्चिन्तितैः= कोणतीही चिंता न करता. भगवान्= भगवान. एव= केवळ. भजनीयः= प्रेम, पूजा, सेवा करण्यास योग्य.**

**सर्वकाली सर्व शक्तींनिशी प्रेमभावाने कोणतीही चिंता न करता केवळ भगवानच भजनीय म्हणजे सेवा करण्यास योग्य आहे.**

**विवरण** : मागे सदतिसाव्या सूत्रात भक्तीची साधने सांगत असताना जीवनातील सर्व व्यवहार चालू असताना देखील भगवंताच्या गुणांचे श्रवण करावे,

कीर्तन करावे असे सांगितले. ह्या सूत्रात साधनाचा काळ आणि लौकिक व्यवहार करतानाचा काळ असा भेद न करता भगवंताची सेवा सर्वकाळ करावी असे नारद सांगतात. ज्ञानेश्वर महाराज हरीपाठात "काळवेळ नाम उच्चारितां नाहीं।" असे सांगतात. नाम घेण्यासाठी देश, काल, अवस्था इत्यादींची अट नाही. नारदपुराणात नारद सांगतात, "न देशनियमो राजन्न काल नियमस्तथा। विद्यते नात्र संदेहो विष्णोर्नामानुकीर्तने॥" "नाम स्मरे निरंतर। तें जाणावें पुण्यशरीर।" असे समर्थ रामदास सांगतात. गंगेचा प्रवाह जसा अखंड वाहातो तसा साधकाने भगवंताशी अखंड संबंध जोडावा. हा संबंध सर्वभावेन म्हणजे मनाच्या ज्या शक्ती आहेत त्या सर्व शक्ती साधनाकडे लावाव्या. त्यामध्ये प्रेम असावे. भावना, कल्पना, विचार, स्मृती इत्यादी मनाच्या सर्व शक्तींनिशी भगवंताची सेवा केली पाहिजे. भावना करावी भगवंताची, कल्पना करावी त्याच्या भेटीची, त्याच्या स्वरूपाचा विचार करावा, त्याचेच चिंतन करावे, सदैव त्याच्या नामाच्या आठवणीत म्हणजे नामस्मरणात रमावे, कानांनी त्याचे गुणवर्णन ऐकावे, डोळ्यांनी त्याचे सगुण सुंदर रूप पहावे, हातांनी त्याला सुवासिक फुले वहावीत, पायांनी प्रदक्षिणा करावी. अशा प्रकारे आपल्या सर्व शक्ती संसाराकडून भगवंताकडे वळवाव्या. हे साधण्यासाठी साधकाला संसार सोडावा लागत नाही; केवळ संसाराची आसक्ती सोडून ती भगवंताकडे वळवावी लागते. म्हणून मला 'स्व' दिलात की सर्व दिले पाहिजे असे नाही असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे. जे सर्व कर्मे मला अर्पण करतात त्यांचा मी मृत्युरूपी संसार सागरातून उद्धार करणारा होतो असे भगवंतानी अर्जुनाला सांगितले आहे. "आणीकही जे जे सर्व। कायिक वाचिक मानसिक भाव। तयां मीवांचूनि धांव। आनौती नाहीं॥७९॥ ऐसे जे मत्पर। उपसिती निरंतर। ध्यानमिषें घर। माझें झाले॥८०॥... ऐसे अनन्य योगें। विकले जीवें मनें आंगें। तयांचे कायि एक सांगें। जें सर्व मी करीं॥८२॥" ज्ञानेश्वरी अध्याय १२.

भगवंताला सर्व भावांनी शरण गेलेल्यांची जबाबदारी भगवंत आनंदाने घेतो. त्यामुळे चिंता हा शब्दच भक्ताच्या जीवनातून नाहीसा होतो. भक्त आधीच संशयरहित झालेला असतो. त्यामुळे भगवंताच्या चिंतनाखेरीज त्याच्या मनाला दुसरा व्यापारचं राहात नाही. मन निश्चिंत व्हावयाला लागणारी शक्ती श्रवणाने, विचाराने आणि सत्संगतीने येते. निश्चिंत झालेले मन वेगळेच बनते. अशा प्रकारे श्रद्धा दृढ झालेला साधक भाग्यवानच म्हटला पाहिजे. सद्गुरूंच्या शक्तीची शिष्याला थोडी जरी जाणीव झाली तरी तो निश्चिंत होतो.

श्रीमहाराजांनी भाऊसाहेब केतकरांना 'भाऊसाहेब, आजपासून तुमचा संसार माझा' म्हणून सांगितल्याबरोबर भाऊसाहेबांनी तो श्रीमहाराजांच्या पदरात टाकला आणि ते निश्चिंत झाले! ''एक धरिला चित्तीं। आम्ही रखुमाईचा पती ॥१॥ तेणें झालें अवघें काम। निवारला भवभ्रम ॥२॥'' असे तुकाराम महाराजांनी म्हटले आहे. ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायात भगवंत विचारतात, ''येऱ्हवी तरी माझिया भक्ता। आणि संसाराची चिंता। काय समर्थाची कांता। कोरान्न मागे ॥८५॥... म्हणोनि गा भक्ता। नाहीं एकही चिंता। तयातें समुद्धर्ता। आथि मी सदा ॥९४॥''

'भगवान् एव भजनीयः' गुरूशी किंवा भगवंताशी संबंध जोडताना 'कृष्ण माझी माता। कृष्ण माझा पिता॥' ह्या अभंगात सांगितल्याप्रमाणे सर्व संबंधांचे पर्यवसान सद्गुरूत अथवा भगवंतात व्हावे. 'त्वमेव माता च पिता त्वमेव' ह्या श्लोकात त्वमेव विद्या म्हणताना गुरुआज्ञापालनापलीकडे दुसरी विद्या नाही आणि द्रविणं त्वमेव म्हणताना पैशापेक्षा गुरूंचा आधार खरा वाटला पाहिजे. हे सर्व एकनिष्ठ भक्तच करू शकतो. निष्ठा एका दिवसात निर्माण होत नाही. म्हणून ह्या सूत्रात सांगितलेला अभ्यास साधकाने सतत केला पाहिजे. योगाभ्यासात वृत्तिनिरोध स्थिर होण्यासाठी पतंजलींनी ''स तु दीर्घकाल नैरन्तर्य सत्कारसेवितो दृढभूमिः।'' असे सांगितले आहे. अभ्यास निरंतर पाहिजे, दीर्घ काल पाहिजे आणि त्या अभ्यासानेच साधणार अशी दृढ श्रद्धा असली पाहिजे. भक्ती किती दिवस करायची असा प्रश्न साधकाच्या मनात देखील येता कामा नये. भक्ती हेच भक्तीचे फळ असून साधनच साध्य बनते. म्हणून सर्वदा सर्वभावाने भक्तीच करावी. भक्तीमध्ये सुरुवातीला कष्ट वाटले तरी भक्ताला प्रतिसाद मिळू लागला की चिंता नाहीशी होऊन त्याच्या समाधानात वाढ होऊ लागते. मग साधनात प्रेमाशिवाय दुसरे काही रहात नाही. सारांश, स्थल, काल निमित्ताच्या मर्यादा ओलांडून, मनाच्या सर्व शक्तींचा उपयोग करून, चिंतामुक्त होऊन व कोणताही संशय येऊ न देता भक्ती करावी. आता यानंतर पुढील सूत्रापासून नारदांनी भक्तीची फलश्रुती सांगण्यास सुरुवात केली आहे.

## ४.५ : भक्तीची श्रेष्ठता व फलश्रुती

### सूत्र ऐंशीवे

**स कीर्त्यमानः शीघ्रमेवाविर्भवति अनुभावयति च भक्तान् ॥८०॥**

**सः= तो (भगवंत) कीर्त्यमानः= ज्याची कीर्ति गाइलेली आहे असा.**

**शीघ्रम्= जलद. एव= च. आविर्भवति= प्रकट होतो. अनुभावयति= अनुभवास येतो. च= आणि. भक्तान्= भक्तांच्या.**

**ज्याची कीर्ती गाइलेली आहे असा तो भगवंत भक्तांमध्ये प्रकट होतो आणि त्यांच्या अनुभवास येतो - त्यांना अनुभव देतो.**

**विवरण** : मागच्या सूत्रात नारदांनी मनाच्या सर्व शक्ती एकत्रित करून सर्व ठिकाणी, सर्व काळी, सर्व अवस्थांमध्ये पूर्णपणे संशयरहित होऊन भगवंताचे भजन करावे असे सांगितले. प्रस्तुत सूत्रात ते सांगत आहेत की एकान्तभक्तांनी परमेश्वराचे स्तवन, गुणगान, कीर्तन इत्यादी केल्यावर लवकरच तो प्रकट होतो आणि त्याच्या सत्तेचा तो त्या भक्ताला अनुभव देतो. भगवंताची कीर्ती - शब्दांनी सांगणे अशक्य आहे. त्याचे गुण अनंत आणि अपार आहेत. तथापि यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य या सहा प्रमुख गुणांनी युक्त अशा परमात्मस्वरूपासाठी भगवान ही संज्ञा वापरतात. भजन करणाऱ्याच्या सर्व कामना पूर्ण करण्याचे सामर्थ्य त्याच्यामध्ये आहे. ज्याप्रमाणे 'जो जें वांछील तो तें लाहो। प्राणिजात॥' अशी ईश्वराजवळ प्रार्थना करताना ज्ञानेश्वर महाराजांनी आधी 'दुरिताचे तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्ये पाहो।' अशी इच्छा प्रकट केली आहे त्याप्रमाणे येथेही भजनाच्या बाबतीत आहे. विश्वात स्वधर्म सूर्याचा प्रकाश पसरला आणि पापरूपी अंधार नाहीसा झाला की प्राणिजातांच्या इच्छा मंगलमय सदिच्छाच होतील. त्यांमध्ये कोणताही हिणकस भाव राहणार नाही. त्याचप्रमाणे षड्गुणेश्वर भगवंताचे भजन कीर्तन केले की त्याचा परिणाम उन्नत, उदात्त आणि मंगलच होणार हे उघड आहे. नारद म्हणतात की प्रेमपूर्वक कीर्तन केले की भगवान लवकरच प्रकट होतो व भक्ताला आपला अनुभव देतो. आविर्भवति म्हणजे भक्तामध्ये भगवंताचा आवेश होतो असाही अर्थ करता येईल. संचार आणि आवेश यांमध्ये मानसशास्त्राच्या दृष्टीने मोठा फरक आहे. जेव्हा माणसामध्ये दुसऱ्या शक्तीचा संचार होतो तेव्हा त्या माणसाच्या व्यक्तिमत्त्वाचा तात्पुरता का होईना पण लोप होऊन त्या शक्तीचे व्यक्त रूप त्याच्या ठिकाणी येते. पण आवेशात ज्या माणसामध्ये शक्तीचा आवेश होतो त्याचे व्यक्तिमत्त्व तसेच राहूनही त्याची जगाकडे पहाण्याची दृष्टी बदलते. कुरुक्षेत्रात समोरचे गुरु, बंधु, पितामह भीष्म इत्यादींना पाहून अर्जुनाच्या मनामध्ये कृपेचा आवेश झाला आणि क्षत्रियाला न शोभणारा युक्तिवाद तो करू लागला. आवेश झाला की माणूस एकाच दृष्टीने जगाकडे पाहू लागतो. यालाच Centralising focus म्हणतात. मुख्य किंवा

एकनिष्ठ भक्तामध्ये भगवंताचा आवेश झाला की भक्त म्हणून वेगळेपणाने कर्मे करीत असतानाही त्या सर्व कर्मांमध्ये त्याला भगवंताचा हात दिसू लागतो. तो शीघ्रमेव म्हणजे झपाट्याने सलोकता, समीपता व सरूपता या पायऱ्यांवरील अनुभव घेत घेत सायुज्य मुक्तीचा अनुभव घेतो आणि भक्तिसुखाचा आनंद लुटण्यासाठी पुन्हा भक्तपणाने वेगळा उरतो. भगवंताचे अस्तित्व त्याच्या देहाच्या व मनाच्या सर्व अवस्थांना व्यापून राहाते. त्याला सर्वत्र भगवंताचे अस्तित्व जाणवते. तो जाईल तेथे भगवंत त्याच्या बरोबर असतो. त्याची छाया विठ्ठलमय होते. त्याची सर्व कर्मे भगवदर्पण भावाने घडतात. हे तीन पायऱ्यांनी घडते असे श्रीमहाराजांनी सांगितले आहे. (१) पहिली पायरी आस ही आहे. मला भगवंत हवा असे भक्ताला वाटू लागते. (२) दुसऱ्या पायरीवर या गोष्टीचा हव्यास निर्माण होतो. आणि (३) तिसऱ्या पायरीवर त्याचे ध्यासात रूपांतर होते. भक्ताला भगवंताशिवाय दुसरे काही सुचेनाचे होते. त्याच्या सर्व चित्तवृत्ती भगवंताने भरून जातात. अशा प्रकारे वृत्ती भगवदाकार झाल्या की भगवंताचे दर्शन होते. हृदयात भगवंताच्या मूर्तीचा आविर्भाव होतो. 'प्रगटे हृदयींची मूर्ती। भावशुद्धी देखोनिया॥' जे केवळ कल्पनेत होते ते साक्षात अनुभवाला येते. सुरुवातीला हा दर्शनाचा अनुभव कायम टिकत नाही. भावना प्रदीप्त असताना दर्शन होते आणि ती शांत झाली की नाहीसे होते, आणि दर्शनाची केवळ स्मृती उरते. जेव्हा भावना स्थिर होते तेव्हाच तो अनुभव होतो. मग दर्शनात खंड पडत नाही आणि जीवनात घडणारी प्रत्येक गोष्ट त्याच्या इच्छेने घडते आहे याविषयी भक्ताच्या मनात कोणताही संदेह राहात नाही. दिवे, पंखे, मिक्सर, रेफ्रिजिरेटर इत्यादी उपकरणे जशी विजेवर चालतात तशी आपल्या जीवनातली प्रत्येक गोष्ट भगवंताच्या शक्तीने चालते आहे अशी भक्ताची खात्री होते. वीज जड आहे; तिला चांगले वाईट हा भेद नाही. पण भगवंत चेतन आहे. तो कल्याणाचा साठा आहे. त्यामुळे तो माझ्या हिताचे असेल तेच करतो अशी भक्ताची दृढ धारणा असते आणि त्यामुळे त्याचे समाधान कायम राहाते.

भगवान शब्दाबद्दल भागवतात म्हटले आहे, "वदन्ति तत्तत्त्वविदस्तत्त्वं यज्ज्ञानमद्वयम्। ब्रह्मेति परमात्मेति भगवानिति शब्द्यते॥" भागवत १.२.११. (ज्ञाता आणि ज्ञेय असा भेद नसलेल्या अखंड, अद्वितीय सच्चिदानंदस्वरूप ज्ञानालाच तत्त्ववेत्ते तत्त्व म्हणून जाणतात. त्यालाच कोणी ब्रह्म, कोणी परमात्मा आणि कोणी भगवान असे म्हणतात.) नाम हे सगुणही आहे आणि निर्गुणही

आहे. ''अगुन सगुन बिच नाम सुसाखी। उभय प्रबोधक चतुर दुभाषी॥'' (रामचरितमानस बालकाण्ड.) असे तुलसीदासांनी नामाचे वर्णन केले आहे. अशा नामाचे अखंड स्मरण आणि अनुसंधान ठेवणाऱ्या भक्ताला भगवंताच्या सगुण रूपाचा आणि निर्गुण ब्रह्माचा अनुभव येतो. देहतादात्म्यामुळे निर्माण झालेले मायेचे आवरण नष्ट होऊन तो ब्रह्मैक्यभावात स्थिर होतो. भगवंताला अनन्य शरण झालेल्या भक्तावर तो कृपा करतो. ही अत्युच्च अवस्था भक्तीची फलश्रुती होय. यानंतर मिळवावयाचे असे काही रहात नाही.

वृत्ती भगवदाकार होऊन मुख्य भक्ताची अंतर्यात्रा पूर्ण झाली तरी भगवद्दर्शनाचा अनुभव लगेच स्थिर होत नाही. दर्शन होणे जसे त्याच्या कृपेने घडते तसा अनुभवही त्याच्या कृपेनेच स्थिर होतो. गुरुदेव रानडे यांनी म्हटल्याप्रमाणे साक्षात्कार ही एक प्रक्रिया आहे; एका विशिष्ट क्षणाला होणारी घटना नव्हे. (It is a process and not an event.) शरणागती पूर्णतेला गेली म्हणजे देव करील ते मान्य, तो ठेवील त्या स्थितीत आनंद आणि समाधान अशी मुख्य भक्ताची स्थिती होऊन भगवत्कृपेने त्या मुख्य भक्ताच्या भक्तीची पराभक्तीमध्ये परिणती होते.

''भक्तिमार्गात ही कृपा केव्हां व कशी होते हे गुरुदेव रानडे यांनी आपल्या गीतेवरील ग्रंथात सांगितले आहे. ते म्हणतात की साधकाचे अंतःकरणाची शुद्धी पुरेशी होऊन, त्याचे स्मरण सतत व प्रेमयुक्त होऊ लागले म्हणजे भगवंत त्याचे मनबुद्धीला एक विशिष्ट वळण (turn) देतो आणि नामस्मरणात त्याची मनबुद्धी स्थिर करतो; ही पहिली कृपा होय. 'ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते।' गीता १०.१०. पुढे असेच भक्तिसाधन वाढत गेले म्हणजे परमात्मा साक्षात्काराचा दीप भक्ताच्या अंतर्यामी प्रज्वलित करतो. भक्ताला ध्यानाचे वेळी व त्या व्यतिरिक्तही उच्चतर अनुभव येऊं लागतात. हा कृपेचा दुसरा हप्ता पुढील श्लोकात सांगितला आहे. 'तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः। नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता॥' गीता १०.११. तिसरी कृपा म्हणजे भक्ताला आत्मानंदाच्या अवस्थेत पराशांतीचा लाभ होतो. 'तत्प्रसादात्परां शांतिम् स्थानम् प्राप्स्यसि शाश्वतम्॥' गीता १८.६२. ही कृपा म्हणजे जीव ब्रह्माचे पूर्ण ऐक्य. साधकाला आपल्यासकट सर्व विश्व ब्रह्मस्वरूप असल्याचे अनुभवास येते. साक्षात्काराची ही पूर्णावस्था आहे. द्वैताचा पूर्ण निरास या अनुभवात होतो. ही अवस्था म्हणजेच अद्वैतानुभूती होय.''- नारद भक्तिसूत्र रहस्य : वि. चिं. केळकर पृष्ठ २२४-२२५.

पराभक्ती अथवा अभेद भक्ती प्राप्त झाल्यानंतर ध्याता, ध्येय, ध्यान किंवा ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान यांसारख्या त्रिपुटी नाहीशा होतात. देव आणि भक्त एक होऊन भक्ताला देहाचा विसर पडतो आणि एक आनंदमय अवस्था तेवढी शिल्लक राहाते; हीच जीवन्मुक्तावस्था. आपल्या या अवस्थेचे तुकाराम महाराजांनी पुढील दोन अभंगांत समर्पक वर्णन केले आहे. ''अणुरणेया थोकडा। तुका आकाशाएवढा ॥१॥ गिळुनि सांडिलें कलिवर। भवभ्रमाचा आकार ॥२॥ सांडिली त्रिपुटी। दीप उजळला घटीं ॥३॥ तुका म्हणे आतां। उरलों उपकारापुरता॥'' (मी - तुकाराम अणुरेणूंपेक्षाही सूक्ष्म असून आकाशाएवढा मोठा आहे. मी भ्रमजन्य देहादि प्रपंचआकार नाहींसा केला. ज्ञेय, ज्ञाता, ज्ञान इत्यादि त्रिपुटींचा निरास करून, आत्मस्वरूपबोधरूपी दीप देहाच्या ठिकाणीं प्रकाशित केला. तुकाराम महाराज म्हणतात, आतां मी अवशिष्ट प्रारब्धाच्या योगानें लोकांवर उपकार करण्याकरितां उरलों आहे.) तसेच ''आनंदाचे डोहीं आनंद तरंग। आनंदचि अंग आनंदाचें ॥१॥ काय सांगों झालें कांहींचियाबाहीं। पुढें चाली नाहीं आवडीने ॥२॥'' (मी ब्रह्मानंदाचा डोह झालो आहे, म्हणून त्याच्यामध्ये आनंदाच्याच लाटा येतात, कारण आनंदाचे अंग आनंदच आहे. मला जें काहीं सुख झालें तें कांहींच्या बाहीच -- अवर्णनीय आहे कारण त्या सुखाच्या प्रीतीने प्रपंचाची पुढील हाव संपली.) ही अवस्था प्राप्त झाल्यानंतर भक्ताच्या हातून घडणारी प्रत्येक क्रिया ही भगवंताची पूजाच होते. भक्त्या मामभिजानाति या श्लोकावर व्याख्यान करताना ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ''या ज्ञानभक्ति सहज। भक्तु एकवटला मज। तो मीचि केवळ हें तुज। श्रुतही आहे ॥११३०॥... ज्ञानी इयेतें स्वसंविती। शैव म्हणती शक्ति। आम्ही परमभक्ति। आपुली म्हणो ॥११३३॥...तैसी क्रिया कीर न साहे। तऱ्ही अद्वैतीं भक्ति आहे। हें अनुभवाचिजोगें, नव्हे। बोलाऐसे ॥११५१॥...आणि शरीस्वभाववशें। कांहीं येक करूं जरी बैसे। तरी मीचि तो तेणें मिषें। भेटें तया ॥११७३॥ तेथ कर्म आणि कर्ता। हें जाऊनि पांडुसुता। मीच आत्मेनि मज पाहतां। मीचि होय ॥११७४॥... एवं तो बोले तें स्तवन। तो देखे तें दर्शन। अद्वया मज गमन। तो चाले तेंचि ॥११८०॥ तो करे तेतुली पूजा। तो कल्पी तो जपु माझा। तो असे तेचि कपिध्वजा। समाधी माझी ॥११८१॥ जैसें कनकेंसीं कांकणें। असिजे अनन्यपणें। तो भक्तियोगें येणें। मजसि तैसा ॥११८२॥... किंबहुना तंतूसीं पटु। कां मृत्तिकेसीं घटु। तैसा तो एकवटु। मजसीं माझा ॥११८४॥'' ज्ञानेश्वरी अ. १८.

या 'भक्त तोचि देव देव भक्त' या अवस्थेनंतर भक्ताला भगवंताचे प्रेम वेगळेपणाने भोगावेसे वाटते आणि भगवंतही त्या प्रेमसुखाला लालचावलेला असतो. त्यामुळे अद्वैतानुभवानंतर देव व भक्त हे द्वैत वरवर पहावयाला राहाते.

भक्तीची फलश्रुती सांगून झाल्यावर नारदांनी पुढील सूत्रात भक्तीचे श्रेष्ठत्व पुन्हा सांगितले आहे.

## सूत्र एक्याऐंशीवे

**त्रिसत्यस्यभक्तिरेव गरीयसी भक्तिरेव गरीयसी ॥८१॥**

**त्रिसत्यस्य= परमसत्याची (भगवंताची). भक्तिः एव= भक्तीच. गरीयसी= श्रेष्ठ आहे. भक्तिः एव= भक्तीच. गरीयसी= श्रेष्ठ आहे.**

**त्या परम सत्याची (भगवंताची) भक्तीच श्रेष्ठ आहे, केवळ भक्तीच श्रेष्ठ आहे.**

**विवरण** : कायिक वाचिक आणि मानसिक या तीन्ही सत्यांच्या पलिकडे असणारी, किंवा वर्तमान, भूत व भविष्य या तीन्ही कालांना ओलांडून जाणारी म्हणजे कालातीत, किंवा जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन्ही अवस्थांच्या पलीकडील म्हणजे तुरीय, किंवा सत्त्व, रज व तम या तीन्ही गुणांपलीकडील म्हणजे गुणातीत, तसेच ध्येय, ध्याता, ध्यान किंवा ज्ञेय, ज्ञाता, ज्ञान यांसारख्या त्रिपुटींचा नाश करणाऱ्या परम सत्याची भक्तीच श्रेष्ठ आहे. निर्गुण, निराकार असलेला परमात्मा भक्तीमुळे सगुण साकार होतो आणि त्याचा आधार घेऊनच भक्ताला निर्गुणाची प्राप्ती होते. समर्थ सांगतात, "सगुणाचेनि आधारें। निर्गुण पाविजे निधरिं। सारासारविचारें। संतसंगें॥" दासबोध-६.६.५५॥ परमात्मस्वरूप सूक्ष्म आहे. पण सत्पुरुषांच्या रूपाने ते स्थूल होते आणि त्यांचा सहवास मिळाला की त्यांच्या हाताला धरून वाटचाल करणे शक्य होते. परमात्मस्वरूप स्थूल होते याचे उदाहरण म्हणजे श्रीमहाराजांनी स्थापन केलेल्या थोरल्या रामाच्या डोळ्यात श्रीमहाराज आजारी होते तेव्हा अश्रु आले! दासबोधामध्ये शिष्याने समर्थांना प्रश्न केला आहे की "सगुण नासिवंत ऐसें सांगता। पुन्हा भजन करावें म्हणतां। तरी कशासाठी आतां। भजन करूं॥"६.७.७॥ यावर समर्थ स्वतःचा अनुभव सांगतात की "मनीं धरावें तें होते। विघ्न अवघेंचि नासोन जातें। कृपा केलिया रघुनाथें। प्रचीत येते ॥३०॥ रघुनाथ स्मरोन कार्य करावें। तें तत्काळचि सिद्धि पावे। कर्ता राम हे असावें। अभ्यंतरीं ॥३३॥

...मी कर्ता ऐसे म्हणसी। तेणें तूं कष्टी होसी। राम कर्ता म्हणता पावसी। यश कीर्ति प्रताप ॥ ३६ ॥" दासबोध ६.७

गुरु पासून गरीयस म्हणजे महान्, श्रेष्ठ. ज्ञानमार्ग, योगमार्ग, कर्ममार्ग यांच्यापेक्षा भक्ती श्रेष्ठ आहे, असे नारदांनी मागे पंचविसाव्या सूत्रात सांगितले. भक्ती इतर मार्गांपेक्षा सोपी आहे कारण कोणालाही सगुण साकारापासून भक्तीची सुरुवात करता येते. प्रपंचाची उपाधी न सोडता साधकाने प्रपंचाचे प्रेम भगवंताकडे वळविण्याचा अभ्यास भक्तीमध्ये करावयाचा असतो. भक्ती कोणालाही वर्ज नाही. प्रपंचात सुख नाही हे माहीत असूनही श्रीमहाराज लोकांना सांगत असत की सुखाने प्रपंच करा, पण त्यात भगवंताला विसरू नका. भगवंताला न विसरता साधक प्रपंच करू लागला तर जीवनात आनंद भोगण्याच्या त्याच्या कल्पना बदलू लागतात. खाणे, पिणे, कपडालत्ता, सवयी यांमध्ये नकळत बदल होऊ लागतो. भक्तांसंबंधी जे वाचले आहे, ऐकले आहे त्याचा आपल्यालाही अनुभव यावा असे वाटू लागते. भगवंताला जे आवडते ते करावे असे वाटू लागते; प्रत्यक्षात तसे वागता आले नाही तर त्याचे वाईट वाटते आणि त्यातून शरणागतीचा उदय होतो. जीवनात जे जे घडते ते सर्व भगवंताच्या इच्छेने घडते असे वाटू लागते. अशा प्रकारे जीवाला कमीत कमी कष्ट होऊन साधकाच्या जीवनाचा घाट बदलतो. म्हणून भक्ती श्रेष्ठ आहे, भक्तीच श्रेष्ठ आहे. येथे त्रिसत्यस्य म्हणताना नारद जणू शपथपूर्वक तीनदा सत्य सांगतो, सत्य सांगतो, सत्य सांगतो की ज्ञान, योग आणि कर्म हे सत्याच्या प्राप्तीचे जे तीन मार्ग आहेत त्यांच्यापेक्षाही भक्ती श्रेष्ठ आहे असे म्हणत आहेत.

त्रिसत्य याचा भगवंत असाही अर्थ आहे. म्हणून त्रिसत्यस्य भक्तिः एव म्हणजे श्रीहरीची भक्तीच श्रेष्ठ आहे असा अर्थ होतो. अन्य साधनांपेक्षा भक्ती सोपी आहे. ती स्वयंफलरूपा आहे. देवकीच्या उदरीं भगवंतांनी प्रवेश केल्यावर शिव, ब्रह्मदेव आणि नारदादि ऋषी तेथे गेले आणि त्यांनी भगवंताची स्तुती केली. त्या स्तुतीच्या सुरुवातीलाच त्यांनी श्रीहरीचा त्रिसत्य असा उल्लेख केला आहे. भागवतात म्हटले आहे "सत्यव्रतं सत्यपरं त्रिसत्यं। सत्यस्य योनिं निहितं च सत्ये। सत्यस्य सत्यमृत सत्य नेत्रं। सत्यात्मकं त्वां शरणं प्रपन्नाः॥" भागवत १०.२.२६॥ (हे प्रभो! तुम्ही सत्यसंकल्प आहात. सत्य हेच तुमच्या प्राप्तीचे साधन आहे. सृष्टीच्या पूर्वी, तिच्या प्रलयानंतर आणि तिच्या स्थितिकाळात म्हणजे या तीन्ही असत्य अशाश्वत अवस्थांत देखील

तुम्हीच सत्य आहात. आपणच त्यांच्यामध्ये अंतर्यामी रूपाने विराजमान आहात. आपणच मधुर वाणी व समदर्शनाचे प्रवर्तक आहात. भगवंता, आपण केवळ सत्यस्वरूप आहात. आम्ही आपणांस शरण आलो आहोत.)

भक्तीमध्ये भगवंताशी प्रेमाचा संबंध जोडला जातो. या प्रेमाचा आविष्कार विविध प्रकारांनी होऊ शकतो. पुढील सूत्रात नारदांनी त्यांपैकी काही महत्त्वाच्या प्रकारांचा उल्लेख केला आहे.

* * *

## अध्याय पाचवा

# उपसंहार

### ५.१ : भक्तीचे अकरा प्रकार

### सूत्र ब्यांयशीवे

**गुणमाहात्म्यासक्ति- रूपासक्ति- पूजासक्ति- स्मरणासक्ति- दास्यासक्ति सख्यासक्ति- कान्तासक्ति- वात्सल्यासक्ति- आत्मनिवेदनासक्ति- तन्मयासक्ति- परमविरहासक्ति- रूपा एकधा अपि एकादशधा भवति ॥८२॥**

**परमप्रेमरूपा भक्ती एकधा अपि= एकाच प्रकारची असूनही (पुढे दिलेल्या) एकादशधा भवति= अकरा प्रकारच्या आवडींद्वारा व्यक्त होते.**

**(१) गुणमाहात्म्यासक्ति= भगवंताच्या गुणांचे वर्णन करण्याच्या आवडीत**

**(२) रूपासक्ति= भगवंताच्या मनोहर रूपाचे सौंदर्य पहात राहाण्याचा आवडीत**

**(३) पूजासक्ति= भगवंताची पूजा करीत राहाण्याच्या आवडीत**

**(४) स्मरणासक्ति= भगवंताचे नामस्मरण करीत राहाण्याच्या आवडीत**

**(५) दास्यासक्ति= भगवंताची सेवा करण्याच्या आवडीत**

**(६) सख्यासक्ति= भगवंताशी मित्रभावाने राहाण्याच्या आवडीत**

**(७) कान्तासक्ति= भगवंताची प्रियतमा होण्याच्या आवडीत**

**(८) वात्सल्यासक्ति= भगवंताबद्दल वात्सल्य वाटण्याच्या आवडीत किंवा भगवंताचे मूल असा भाव राखण्याच्या आवडीत**

**(९) आत्मनिवेदनासक्ति= भगवंताला आत्मसमर्पण करण्याच्या आवडीत**

**(१०) तन्मयासक्ति= भगवंतमय होण्याच्या आवडीत. किंवा**

**(११) परमविरहासक्ति= भगवंताचा अत्यंत विरह अनुभवण्याच्या आवडीत**

**विवरण :** या सूत्रात विविध प्रकारच्या मानवी प्रेम संबंधांच्या द्वारा भक्ताच्या हृदयात भगवंतासंबंधी असलेले दिव्य प्रेम कसे व्यक्त होते ते नारदांनी

सांगितले आहे. श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणम् इत्यादी भक्तीचे नऊ प्रकार प्रल्हादाने सांगितले. समर्थ रामदासांनी या नऊ प्रकारांचे दासबोधाच्या चौथ्या दशकात सविस्तर वर्णन केले आहे. स्वतः श्रीरामांनी शबरीला भक्तीचे नऊ प्रकार सांगून हे सर्व भाव तू करीत असलेल्या भक्तीत आहेत असे तिला सांगितले. हे नऊ प्रकार प्रल्हादाने सांगितलेल्या नऊ प्रकारांपेक्षा काहीसे वेगळे असून त्यांचे वर्णन तुलसीदासांनी रामचरितमानसमध्ये केलेले आहे. प्रस्तुत सूत्रात नारदांनी भक्तीचे जे अकरा प्रकार दिलेले आहेत त्यांपैकी एका किंवा जास्त प्रकारांनी भक्त भगवंताशी आपला संबंध जोडतो. तथापि त्यांपैकी जो प्रधान संबंध असेल त्याला अनुसरून त्या भक्ताच्या भक्तीचा प्रकार भक्तीचे आचार्य मानतात. उदाहरणार्थ नारद व व्यास यांची भक्ती गुणमाहात्म्य या पहिल्या प्रकारात मोडते तर गोपींची रूपासक्ती या प्रकारात धरता येते. हिरण्यकश्यपु, रावण, कंस, शिशुपाल यांनी भगवंताशी वैर केले तरीही भगवंताने त्यांचा वध करून त्यांना सद्‌गती दिली, हे खरे, पण म्हणून वैर हा भक्तीचा प्रकार होऊ शकत नाही. भक्तीमध्ये प्रेमाचा संबंध असतो हे लक्षात ठेवले पाहिजे. भगवंतावर श्रद्धा असल्याखेरीज भक्ती होऊ शकत नाही. साधकाच्या मनात भगवंताचे प्रेम निर्माण झाले की भगवंतही त्याच्यावर प्रेम करू लागतो. भक्ताच्या संबंधात भगवंताला किती प्रेम वाटते ते ज्ञानेश्वरीत श्रीकृष्ण 'तो वल्लभा मी कांतु। ऐसा पढियें॥' या शब्दात सांगतात. The moment you accept Him, He has already accepted you असे योगी अरविंद म्हणतात. हे खरे असले तरी भक्ताला मात्र भगवंताकडून त्या प्रेमाची काही तरी खूण मिळावी असे वाटत असते. नारदांनी सांगितलेल्या प्रकारात प्रेमाच्या बाह्य व अंतरंग लक्षणांचा समावेश आहे. प्रेमात आपलेपणा असतो. ज्याच्यावर प्रेम आहे त्याचे अंतःकरण दुखावेल असे वर्तन कधीही होत नाही. माझे काहीही होवो, त्याने आनंदात असावे असे वाटते. भक्ती म्हणजे भगवंतावरचे प्रगाढ प्रेम असे म्हणता येईल.

प्रेमाचा संबंध वेगवेगळ्या अकरा प्रकारांनी व्यक्त होतो असे नारद सागंतात याचे कारण असे की निरनिराळ्या स्वभावाची माणसे असतात आणि त्यांच्या मनोरचनेप्रमाणे प्रेमाचे स्वरूप प्रकट होते. ह्या प्रकट होण्याला नारदांनी आसक्ति म्हटले आहे. आसक्ति शब्दात सञ्ज हा धातु असून त्याचा अर्थ संलग्न होणे, चिकटणे असा आहे. आ ह्या उपसर्गाचा सर्व बाजूंनी असा अर्थ होतो. म्हणून आसक्त म्हणजे ज्याचे मन सर्व बाजूंनी चिकटले आहे असा. आसक्तीमध्ये

ज्याच्याबद्दल आसक्ती वाटते त्याला मन सर्व बाजूंनी चिकटते. म्हणून भक्तीसंबंधी बोलताना "प्रपंचात जशी आसक्ति, तशी भगवंतावर प्रीती म्हणजे भक्ती" असे श्रीमहाराजांनी म्हटले आहे. प्रल्हादाने नृसिंहाची प्रार्थना करताना म्हटले आहे, "या प्रीतिरविवेकानां विषयेष्वनपायिनी। त्वामनुस्मरतः सा मे हृदयान्मापसर्पतु॥" म्हणजे अविवेकी माणसांची विषयांपासून दूर न होणारी अव्यभिचारी प्रीति (आसक्ति) जशी असते तशी आसक्ति (प्रीति) तुझे स्मरण करणाऱ्या माझ्या अंतःकरणातून कधीही दूर न जावो; तुझ्या ठिकाणी माझी तशीच आसक्ति असावी. नारदांनी सांगितलेल्या भगवत्प्रेमाच्या अकरा प्रकारच्या आविष्कारात मानसशास्त्राच्या दृष्टीनेही काही प्रमाणात संगती आढळून येते. मात्र त्याचा अर्थ भक्ताचा हा मानसशास्त्रदृष्ट्या होणारा विकास वर्णन केलेला आहे असा समजू नये. आसक्तीत त्या त्या गुणाचा अतिरेक आढळतो. सामान्यतः कोणताही अतिरेक वाईट मानला जातो. पण पारमार्थिक अतिरेक हा त्याला अपवाद आहे. **The only permissible excess is the spiritual excess** असे गुरूदेव रानड्यांनी म्हटले आहे. प्रेमभक्ती सिद्ध झालेल्या भक्तांच्या भक्तीचे हे अकरा प्रकार आपण पाहू.

**(१) गुणमाहात्म्यासक्ति** : अनंताचे गुण अनंत अपार. भगवंताचे अद्‌भुत सामर्थ्य आणि विविध अवतारांमधील त्याच्या लीलांचे वर्णन करण्यात आणि ऐकण्यात काही भक्त रंगलेले असतात. "हरि अनंत हरिकथा अनंता। कहहिं सुनहिं बहुबिधि सब संता॥" असे तुलसीदास म्हणतात. रामाच्या आणि कृष्णाच्या बाललीलांचे प्रत्ययकारी वर्णन तुलसीदासांनी व सूरदासांनी केले आहे. श्रीरामाच्या बाललीलांमध्ये रमून गेल्यामुळे काकभुशुंडीने काक योनीतच राहाणे पसंत केले! भगवंताचे गुणगान करीत नारदांचा तीन्ही लोकात संचार असतो. नारदांनी सांगितल्यावर व्यासांनीही भगवंताचे गुणगान करण्यासाठी भागवत पुराणाची रचना केली आणि त्यामुळे त्यांना समाधान लाभले. मारुतिरायांनीही श्रीरामांकडे मला सदैव तुमच्या गुणश्रवणकीर्तनाचा लाभ व्हावा असा वर मागितला. ह्या वरयाचनेचे ग. दि. माडगूळकरांनी गीतरामायणात अतिशय मनोज्ञ दर्शन घडविले आहे. मारुती म्हणत आहे, "प्रभो, मज एकच वर द्यावा। या चरणांच्या ठायीं माझा निश्चल भाव असावा॥ रामकथा नित वदनें गावी। रामकथा या श्रवणीं यावी। श्रीरामा, मज श्रीरामाविण दुसरा छंद नसावा॥ मेघासम मी अखंड प्राशिन। असेल तेथुन श्रीरामायण। मेघापरि मी शतधारांनीं करीन वर्षावां॥ जोंवरि हें जग, जोंवरि भाषण। तोंवरि नूतन नित

रामायण। सप्तस्वरांनीं रामकथेचा स्वाद मला द्यावा॥ सूक्ष्म सूक्ष्मतम देहां धरुनी॥ फिरेन अवनीं फिरेन गगनीं॥ स्थलीं, स्थलीं पण रामकथेचा लाभ मला व्हावा॥" - गीतरामायण गीत. ५३वे. भावार्थ रामायणात एकनाथ महाराजांनी मारुतीची ही प्रार्थना पुढील ओव्यात दिली आहे. "जेथें जेथें रामकथन। तेथें तेथें मस्तकांजली पूर्ण। असावे माझे अधिष्ठान। हेचि वरदान मज द्यावे ॥९॥ जिणयाचें फळ तत्त्वतां। नित्य श्रवणीं रामकथा। वाचेसी रामगुण वर्णिता। उसंत नसावी ॥१०॥ युद्धकाण्ड अध्याय ३६५. तुकाराम महाराज म्हणतात "गुण गाईन आवडी। हेचि माझी सर्व जोडी॥ श्रीकृष्ण चरित्राचे, विशेषतः त्याच्या बाललीलांचे वर्णन करताना भक्तांचे देहभान नाहीसे होते. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "वृंदावनीं आनंदु रे। विठ्ठल देवो आळविती रे ॥१॥ गोपाळ रचले रे। विठ्ठल देवो आळविती रे ॥२॥ निवृत्तिदासा प्रियो रे। विठ्ठल देवो आळविती रे ॥३॥"

**(२) रूपासक्ति** : ज्याचे गुणवर्णन करताना कितीही वर्णन केले तरी अजूनही त्याचे पूर्ण गुणवर्णन झाले नाही असे वाटते तो भगवंत दिसतो तरी कसा तो पहाण्याची भक्तांच्या मनात ओढ असते. सदैव भगवंताचे रूप पहाण्यात रममाण होण्याच्या भक्तीच्या प्रकाराला नारदांनी रूपासक्ति म्हटले आहे. राजा जनक, व्रजगोपी ही रूपासक्त भक्तांची प्रमुख उदाहरणे असली तरी सर्व संतांनी भगवंताच्या मनोहर रूपाचे वर्णन केलेले आढळते. सीता स्वयंवरासाठी विश्वामित्रांबरोबर राम व लक्ष्मण मिथिला नगरीत गेल्यानंतर विश्वामित्रांचा कुशल समाचार घेण्यास राजा जनक गेला. तेथे राम लक्ष्मण यांना पाहून त्याने विश्वामित्रांना म्हटले, "कहउ नाथ सुंदर दोउ बालक। मुनिकुलतिलक कि नृपकुलपालक॥ ब्रह्म जो निगम नेति कहि आवा। उभय बेष धरि की सोइ आवा॥ सहज बिरागरूप मन मोरा। थकित होइ जिमि चंद चकोरा॥ तातें प्रभु पूछौं सति भाऊ। कहहु नाथ जनि करहु दुराऊ॥ इन्हहि बिलोकत अति अनुरागा। बरबस ब्रह्मसुखहि मन त्यागा॥" जनकाची अशी अवस्था झाली यात काहीच आश्चर्य नाही. कारण वानरांनी बांधलेल्या सेतूवरून जेव्हा श्रीराम व लक्ष्मण लंकेकडे जाऊ लागले तेव्हां त्यांच्या सौंदर्याने जलचर वेडे झाले व त्यांनी त्यांना पहाण्यासाठी इतकी गर्दी केली की समुद्राचे पाणी दिसेनासे झाले. श्रीरामांच्या दर्शनाने ते स्वतःला विसरले. त्यांच्या देहांवरून वानर पलीकडे जाऊ लागले तरी त्यांना देहाचे भान राहिले नाही. तुलसीदास वर्णन करतात, "देखन कहँ प्रभु करुनाकन्दा। प्रकट भए बहु जलचर बृन्दा॥

तिनकी ओट न देखिय बारी। मगन भये हरि रूप निहारी॥ सेतुबंध भइ भीर अति कपि नभ पंथ उडाहिं। अपर जलचरन्हि ऊपर चढि चढि पारहि जाहिं॥" - रामचरितमानस.

जगातील सर्व रूपे प्रकृतीपासून पंचभूतात्मक बनलेली असतात तर भगवंताचा देह अप्राकृत शुद्ध सत्त्वमय असतो. म्हणून ज्ञानेश्वर महाराज श्रीकृष्णाला विचारतात की "कान्होबा, तुझी घोंगडी चांगली। आम्हांशी कां दिली वांगली रे॥" ज्ञानेश्वर महाराजांचाच "पांडुरंग कांती दिव्य तेज झळकती॥ रत्नकीळा फांकती प्रभा॥ अगणित लावण्य तेजःपुंजाळलें। न वर्णवे तेथीची शोभा॥" हा रूप वर्णनाचा अभंग प्रसिद्ध आहे. तुकाराम महाराज "आवडे हें रूप गोजिरें सगुण। पाहतां लोचन सुखावलें॥" म्हणून आता तू माझ्या दृष्टीपुढे असाच सतत राहा असे पांडुरंगाला विनवितात. अशा प्रकारे भगवंताच्या रूपाच्या दर्शनात स्वतःला विसरणारे भक्त हे रूपासक्त भक्त होत.

**(३) पूजासक्ति :** भगवंताच्या मनमोहन रूपाचे दर्शन झाल्यावर भक्ताच्या मनात साहजिकच त्याच्या पूजेची ओढ निर्माण होते. ज्यांना असे दर्शन झाले नाही त्यांनाही सगुण मूर्तीची पूजा करावी व त्याला प्रसन्न करून घ्यावे असे वाटते. ते त्याची विविध उपचारांनी पूजा करतात. प्रत्यक्ष पूजेप्रमाणे मानसपूजेतही ते रंगून जातात. कल्पनेने दिलेले भोगही भगवंत घेतो असा त्यांचा अनुभव असतो. "काया वाचा आणी मनें। चित्तें वित्तें जीवें प्राणें। सद्भावें भगवंत अर्पणें। या नांव अर्चनभक्ती॥" दासबोध ४.५.२९॥ असे समर्थांनी म्हटले आहे. मागे "पूजादिष्वनुराग इति पाराशर्यः।" या १६ व्या सूत्राच्या विवरणात पूजा प्रकारांचे सविस्तर वर्णन केले आहे. ह्या सूत्रातील आसक्ति म्हणजेच १६ व्या सूत्रातील अनुराग होय.

**(४) स्मरणासक्ति :** मागे १९व्या सूत्रात नारदांनी "तद्विस्मरणे परमव्याकुलता" असे परमप्रेमरूपा भक्तीचे लक्षण सांगितले आहे. भगवंताच्या अखंड नामस्मरणात काही भक्त रंगलेले असतात. भगवंताच्या रूपापेक्षा, नव्हे साक्षात् भगवंतापेक्षाही त्याचे नाम श्रेष्ठ आहे असे अनेक भक्तांनी म्हटले आहे. तुलसीदास म्हणतात, "अगुन सगुन दुइ ब्रह्म सरूपा। अकथ अगाध अनादि अरूपा॥ मोरें मत बड़ नाम दुहूतें। किए जेहिं जुग निज बस निज बूतें॥" नामाने आपल्या शक्तीने निर्गुण व सगुण दोहोंनाही वश केले आहे. म्हणून ते सांगतात, "राम नाम मनिदीप धरू जीह देहरींद्वार। तुलसी भीतर बाहिरेहुँ जौं चाहसि उजिआर॥" सर्व साधनात नाम हे अत्यंत उपाधिरहित साधन आहे.

केव्हाही, कोठेही, देहाच्या कोणत्याही अवस्थेत नाम घेता येते. "चालतां बोलतां धंदा करितां। खातां जेवितां सुखी होतां। नाना उपभोग भोगितां। नाम विसरों नये ॥७॥ ...बाळपणीं तारुण्यकाळीं। कठिणकाळीं वृद्धापकाळीं। सर्वकाळीं अंतकाळीं। नामस्मरण असावें ॥१४॥ कांहींच न करूनि प्राणि। रामनाम जपे वाणी। तेणें संतुष्ट चक्रपाणी। भक्तांलागीं सांभाळी ॥२१॥ नाम स्मरे निरंतर। तें जाणावें पुण्यशरीर। महादोषांचे गिरिवर। रामनामें नासती ॥२२॥ ...चहूं वर्णां नामाधिकार। नामीं नाहीं लहानथोर। जडमूढ पैलपार। पावती नामें॥" दासबोध ४.३.२४॥ असे समर्थ रामदास सांगतात. "हरि मुखें म्हणा हरि मुखें म्हणा। पुण्याची गणना कोण करी॥" असे ज्ञानेश्वर महाराजांनी हरिपाठात म्हटले आहे. "न कळे तें कळों येईल उगलें। नामें या विठ्ठलें एकाचिया॥" या आपल्या अभंगात तुकाराम महाराज शेवटी म्हणतात, "तुका म्हणे जीव आसक्त सर्वभावें। तरतील नांवें विठोबाच्या॥" खरोखर नामस्मरणाचे महत्त्व किती सांगावे? श्रीमहाराज म्हणतात, "मी बोलायला शिकल्यापासून आजपर्यंत सहासष्ट वर्षे नामाबद्दलच बोलतों आहें, अजून नामाचें माहात्म्य संपत नाहीं! नामाचें माहात्म्य सांगून संपले तर भगवंताचें भगवंतपण लटकें झालें असें समजावे. जो नामांत मीपणानें नाहींसा झाला त्यालाच नामाच्या माहात्म्याची कल्पना आली. असा पुरुष नामाविषयीं मौन तरी धरील, कारण त्याचें माहात्म्य कोणासच सांगतां येणार नाहीं; किंवा शेवटच्या श्वासापर्यंत नामाचें माहात्म्य सांगत राहील, कारण तें कितीही सांगितलें तरी संपणार नाहीं!" - (श्रीगोंदवलेकर महाराज चरित्र आणि वाङ्मय. ले.के.वि.बेलसरे. त्रिदल प्रकाशन आवृत्ती तेरावी. पृ. ३१३-३१४) ध्रुव व प्रल्हाद ही पुराण कालातील तर सद्गुरु श्री ब्रह्मचैतन्य गोंदवलेकर महाराज, कान्हनगडचे स्वामी रामदास व गुरुदेव रानडे ही अलिकडच्या काळातील स्मरणासक्तीची आदर्श उदाहरणे म्हणून सांगता येतील.

**(५) दास्यासक्ति** : व्यवहारातील दास्यामध्ये स्वार्थ असतो. भक्ताला भगवंताने आपला म्हणावे अशी ओढ असते. मारुती हा दास्यभक्तीचा आदर्श मानला जातो. "रामदासीं अग्रगण्यु" असे समर्थांनी त्याचे वर्णन केले आहे. मारुतीप्रमाणे अक्रूरही श्रीकृष्णाचा दास होता. दासाला सर्वकाळ आपल्या स्वामीसाठी काहीतरी करत राहावे असे वाटते. त्यासाठी तो मंदिराची झाडलोट करील, फुले वेचील, देवासाठी हार, नैवेद्य तयार करील, मंदिरातील कार्यक्रमासाठी बैठकी घालील असे एकसारखे भगवंताच्या स्मरणात

भगवंतासाठी करीत राहील. एखादा स्वामिभक्त सेवक जसा धन्याची मर्जी ओळखून वागतो तसा दास असतो. अहंकाराचा वाराही तो स्वतःला लागू देत नाही. शिष्य सद्गुरूची दास्यभावानेच सेवा करतात. "तुझी सेवा करीन मनोभावें वो। माझें मन गोविंदीं रंगलें वो॥" असे ज्ञानेश्वर महाराज सांगतात.

**(६) सख्यासक्ति :** काही भक्त भगवंताला आपला मित्र मानून त्याच्यावर प्रेम करतात. सहैव ख्यायते इति सखा. ज्यांची एकाबरोबर दुसरा अशी एकत्र नांवें घेतली जातात ते सखे. दोन मित्र जसे एकमेकांशी मोकळेपणाने वागतात, आपल्या गुह्य गोष्टी एकमेकांना सांगतात, सल्ला देतात-घेतात तसा या भक्तांचा भगवंताशी संबंध असतो. अर्जुन व श्रीकृष्ण आणि उद्धव व श्रीकृष्ण ही या प्रकाराची उत्तम उदाहरणे आहेत. भगवद्गीतेच्या चौथ्या अध्यायात भगवान अर्जुनाला म्हणतात की तू माझा भक्त आणि सखा आहेस म्हणून मी हा योग तुला सांगितला. "हें जीविंचें निजगुज। परी केवीं राखों तुज। जे पढियेसी तूं मज। म्हणऊनियां ॥२८॥ तूं प्रेमाचा पुतळा। भक्तीचा जिव्हाळा। मैत्रियेची चित्कळा। धनुर्धरा ॥२९॥" ज्ञानेश्वरी अध्याय ४॥ कृष्ण परमात्मा आहे हे अर्जुनाला माहीत होते. तथापि कुरुक्षेत्रावर भगवंताने आपले विश्वरूप दाखविल्यावर आपल्या कृष्णाबरोबरच्या वर्तनाचा अर्जुनाला संकोच वाटला आणि तो कृष्णाला म्हणाला की "आपला हा प्रभाव न जाणल्यामुळे, आपण माझे मित्र आहात असे मानून प्रेमाने किंवा चुकीने मी 'हे कृष्णा, हे यादवा, हे सख्या!' असे जे काही विचार न करता मुद्दाम म्हटले असेल, आणि हे अच्युता! माझ्याकडून विनोदासाठी फिरतांना, झोपतांना, बसलेले असतांना, भोजन करतांना आपला एकान्तात किंवा मित्रांच्या समक्ष जो अपमान झाला असेल त्या अपराधांची मी क्षमा मागत आहे." मैत्रीमध्ये श्रेष्ठ कनिष्ठ भाव नसतो म्हणूनच श्रीकृष्ण परमात्मा अर्जुनाच्या रथावर सारथी झाले. तसेच धर्मराजाने केलेल्या राजसूय यज्ञाच्या वेळी त्यांनी उष्ट्या पत्रावळी उचलल्या! व्यासशिष्य संजय अर्जुनाच्या सख्यत्वाचे वर्णन करताना धृतराष्ट्रास म्हणाला की खरोखर देवाला (कृष्णाला) अर्जुनाचे वेडच लागले आहे की काय असे वाटते. "हा (अर्जुन) कोपे कीं निवांतु साहे। हा रुसे तरी बुझावीत जाये। नवल पिसें लागलें आहे। पार्थाचें देवा॥" ज्ञानेश्वरी अ.११.१७२॥ अर्जुन उद्धवाप्रमाणेच गोकुळातील सवंगडी व सुदामा कृष्णाचे सखे होते. एखाद्या जुन्या स्वामिभक्त सेवकाचा मालक काही वेळा सल्ला घेऊ लागतो त्याप्रमाणे काही वेळा दास्यभावातून सख्यभाव निर्माण होतो. बिभीषण श्रीरामांकडे

दास्यभावाने आला पण श्रीरामांनी त्याला आपला सखा मानले. "देवासी परम सख्य करावें। प्रेमप्रीतीनें बांधावें॥" असे समर्थ सांगतात. सख्यभाव स्थिर होण्यासाठी भक्ताचे वर्तन कसे असावे? समर्थ म्हणतात, "देवाचें जे मनोगत। तेंचि आपुलें उचित। इच्छेसाठीं भगवंत। अंतरूं नये कीं॥" दासबोध ४.८.२२॥

**(७) कान्तासक्ति** : भगवंताला आपला पति मानून त्याची भक्ती करणे म्हणजे कान्तासक्ति. यालाच मधुर भाव म्हणतात. पतिव्रता स्त्रीला तिचा पति हाच सर्वस्व असतो तसा मधुर भावात भक्ताला भगवंत असतो. व्रजातील गोपींनी हा भाव ठेवून कृष्णाची भक्ती केली. मीराबाईनेही श्रीकृष्णालाच आपला प्रियतम करून मोक्ष साधला. मागे ६६ व्या सूत्रात नित्यकान्ताभावाचा उल्लेख आणि वर्णन दिलेले आहे. भगवंताने गोपींबरोबर केलेल्या रासक्रीडेचे मानवाने अनुकरण करू नये असे श्रद्धेय हनुमानप्रसाद पोद्दारांनी आवर्जून सांगितले आहे. महाराष्ट्रातील संतांच्या वाङ्मयात ह्या भावाचे काही गौळणी आणि विराण्यांखेरीज विशेष वर्णन आढळत नाही.

**(८) वात्सल्यासक्ति** : भक्तीच्या या प्रकाराचे दोन उपप्रकार आढळतात. (१) भगवंताला आपले मूल समजून त्याचे लालनपालन करावयाचे. कश्यप-अदिती, मनु-शतरूपा, दशरथ-कौशल्या, वसुदेव-देवकी इत्यादींनी भगवंताने आपले मूल म्हणून जन्म घ्यावा अशी तपश्चर्या करून प्रार्थना केली होती. भगवंताच्या बाललीलांचा आनंद त्यांना मिळावा म्हणून भगवंताने त्यांच्या पोटी जन्म घेतल्यावर भक्त व भगवंत या संबंधावर विस्मरणाचा पडदा राखला होता. गोपींनाही बालकृष्णाविषयी वात्सल्यभाव होता आणि तो परमात्माही त्यांच्याकडून वाटीभर ताक मिळण्यासाठी त्यांनी सांगितले की नाच करून दाखवत असे! भक्त रसखानि म्हणतात, "जोगी, जती, तपसी अरु सिद्ध, निरन्तर जाहि समाधि लगावैं। ताहि अहीरकी छोहरियाँ, छछियाभरि छाछपै नाच नचावैं॥"

(२) वात्सल्यभक्तीच्या दुसऱ्या प्रकारात भक्त स्वतःला भगवंताचे मूल मानतो आणि त्यानुसार त्याचा भगवंताशी संबंध असतो. नामदेवांच्या "तूं माझी माउली मी वो तुझा तान्हा। पाजी प्रेमपान्हा पांडुरंगे॥" या अभंगात हा भाव आहे.

**(९) आत्मनिवेदनासक्ति** : भक्तीच्या या प्रकारात जीव आणि शिव यांचे अद्वैत अभिप्रेत आहे. मी नाही, तू आहेस म्हणून सच्चिदानंदाला आत्मार्पण करणे हेच आत्मनिवेदन होय. आत्मार्पणात भक्त भगवंताशी अनन्य होतो. ते

समर्पण असते. तेथे भक्ताचे वेगळे व्यक्तिमत्व उरत नाही. मी तूं पणाची बोळवण होते. ज्ञानेश्वर महाराजांनी अमृतानुभवात म्हटले आहे, "सांडोनि मीठपणाचा लोभू। मिठें सिंधुत्वाचा घेतला लाभू। तेवीं अहं देऊनि शंभु। शांभवी झालो॥" समर्थ रामदास म्हणतात. "निरसितां जीवशिव उपाधी। जीवशिवचि कैंचें आधीं। स्वरूपीं होतां दृढबुद्धि। आपण कैंचा ॥२१॥ आपण मिथ्या साच देव। देव भक्त अनन्यभाव। या वचनाचा अभिप्राव। अनुभवी जाणती॥" दासबोध ४.९.२२॥ "या नांव आत्मनिवेदन। ज्ञानियाचें समाधान॥२३॥" भगवद्गीतेत अर्जुनाला भगवंतांनी सांगितले की "सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज। अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः॥"१८.६६॥ (सर्व धर्म म्हणजे सर्व कर्तव्यकर्मे मला अर्पण करून तू मला (सर्वशक्तिमान सर्वाधार अशा) परमेश्वरालाच शरण ये. मी तुला सर्व पापांपासून सोडवीन. शोक करू नकोस.) ज्ञानेश्वर महाराज सांगतात, "पैं आपुलेनि भेदेंविण। माझें जाणिजे जे एकपण। तयाचि नांव शरण। मज येणें गा॥१३९८॥ म्हणौनि घटाचेनि नाशें। गगनीं गगन प्रवेशे। मज शरण येणें तैसें। ऐक्य करीं ॥१३९९॥ सुवर्णमणि सोनया। ये कल्लोळु जैसा पाणिया। तैंसा धनंजया। शरण ये तूं ॥१४००॥ ...अगा प्राकृताही राया। आंगीं पडे जें धनंजया। तें दासिरूंही की तया-। समान होय ॥१४०३॥ मा मी विश्वेश्वरु भेटे। आणि जीवग्रंथी न सुटे। हें बोल नको वोखटे। कानीं लाऊ ॥१४०४॥" ज्ञानेश्वरी अ. १८॥ बली राजाही वामनाला असाच शरण गेला.

**(१०) तन्मयासक्ति** : 'तन्मयाः' या ७० व्या सूत्रात नारदांनी एकांत भक्त परमात्म्याशी समरस झालेले असतात म्हणून सांगितले आहे. याज्ञवल्क्य, शुक, सनकादि ऋषी व सुतीक्ष्ण ही तन्मयासक्त भक्तांची नांवे सांगितले जातात. हे सिद्ध तृप्त भक्त आत्माराम झालेले असतात. त्यांची अवस्था नारदांनी सुरुवातीला ४, ५ व ६ या तीन सूत्रांत सांगितली आहे. आत्मनिवेदनाचे पर्यवसान तन्मयतेमध्ये कसे होते ते श्रीकृष्णांनी उद्धवास सांगितले आहे. "जें बोलिलीं धर्मार्थकाममोक्षार्थ। तें साधनें सांडूनि समस्त। जे अनन्यभावें मज भजत। विश्वासयुक्त निजभावें ॥६२१॥ त्यांसी हे स्वरूपस्थिती। जे त्वां भोगिली आत्मप्रतीती। ते तत्काळ होय प्राप्ती। जाण निश्चितीं उद्धवा ॥६२२॥ ...नाना साधनाभिमान। सांडूनिया जो ये मज शरण। त्यासीही स्वरूपप्राप्ती पूर्ण। उद्धवा जाण सुनिश्चित ॥६३०॥ माझा भक्त जयाकडे कृपें पाहे। तोही माझी भक्ति लाहे। ...काया वाचा मन धन। अवंचूनि, अनन्यशरण। त्यांचा

योगक्षेम जाण। मी श्रीकृष्ण स्वयें सोशी॥६४१॥'' ए. भागवत अ. २९॥
भक्त तन्मय झाला की त्याची काय अवस्था होते ते ज्ञानेश्वर महाराजांनी एका गौळणीच्या स्थितीवरून सांगितले आहे. ''दुडीवरी दुडी गौळणी साते निघाली। गौळणी गोरसु म्हणो विसरली ॥१॥ गोविंद घ्या कोणी दामोदरु घ्या वो। तंव तंव हासती मथुरेच्या वो॥''

**(११) परमविरहासक्ति :** 'तद्विस्मरणे परमव्याकुलता' असे भक्तिलक्षण नारदांनी सांगितले आहे. भगवंताचे विस्मरण होऊन जीव व्याकूळ होण्याचा प्रसंग टाळण्यासाठी कुंतीने श्रीकृष्णाजवळ माझ्यावर नेहमी संकटे येवोत अशी प्रार्थना केली. भगवंताशी मीलन होऊन नंतर जे वेगळेपण अनुभवावे लागते त्याला विरह म्हणतात. प्राकृत जीवांच्या विरहापेक्षा हा विरह वेगळा असतो, दिव्य असतो म्हणून नारदांनी परमविरह असे म्हटले आहे. या प्रकारच्या श्रेष्ठ विरहालाच भक्त चिकटून राहातो हे वरकरणी विचित्र वाटते. तथापि भगवंताशी ऐक्य झाल्यानंतर भक्त व भगवंत दोघांनाही भक्तिसुखाची चटक लागलेली असल्यामुळे ते सुख भोगण्यासाठी पुन्हा वेगळेपणाने राहातात. भक्ताचा देह भगवंतापासून वेगळा राहातो हे तर उघडच आहे. तथापि वेगळा राहूनही भक्ताची भगवंताकडे अनिवार ओढ असते. ह्या परमविरहामुळे त्याला भगवंताखेरीज दुसरे काही सुचत नाही आणि त्यामुळे त्या विरहातही त्याच्या स्मरणाचे सुख तो भोगतो. मधुसूदन सरस्वतींनी भक्तिरसायन ग्रंथात म्हटले आहे ''विरहे यादृशं दुःखं तादृशी जायते रतिः।'' ज्ञानेश्वर महाराजांच्या काही अभंगात व मीराबाईच्या पदात या परमविरहाचे वर्णन आढळते. ''पडलें दूर देशीं मज आठवें मानसीं। नको नको हा वियोग कष्ट होताती जिवासी ॥१॥ दिनु तैसी रजनी मज जालिये वो माये। अवस्था लावुनी गेला अझुनी का नये ॥२॥'' किंवा ''कृष्णें वेधिली विरहिणी बोले। चंद्रमा करितो उबारा गे माय। न लवा चंदनु आंगी न घाला विंजणवारा। हरिविणें शून्य शेजारू गे माय ॥१॥ ...नंदनंदनु घडी घडी आणा। तयावीण न वाचती प्राण वो माये॥'' या अभंगात भगवंताविषयीची ओढ विरहातून व्यक्त होते आणि भगवंताच्या भेटीइतकाच भक्त त्या ओढीमुळे तन्मय होतो. ''घनु वाजे घुणघुणा। वारा वाहे रुणझुणा। भवतारकु हा कान्हा। वेगीं भेटवा कां ॥१॥ चांदवो चांदणें। चापेवो चंदनु। देवकीनंदनु -। वीण नावडे वो ॥२॥ चंदनाची चोळी। माझें सर्व अंग पोळी। कान्हो वनमाळी। वेगीं भेटवा कां ॥३॥ सुमनाची सेज। सितळ वो निकी। पोळे आगिसारिखी। वेगीं विझवा कां ॥४॥'' ही ज्ञानेश्वर महाराजांची

विरहिणी तर प्रसिद्धच आहे. अशा प्रकारच्या विरहिणींमध्ये कान्तासक्ति आणि परमविरहासक्तीचे मिश्रण झालेले आढळते. अशोक वनातील विरहिणी सीतेचे वर्णन एकनाथ महाराज करतात, "त्यजिलें अन्नजीवन। त्यजिलें फळभोजन। त्यजिलें भोगहवन। श्रीरघुनंदन वियोगें॥ त्यजिले वस्त्रालंकार। त्यजिले अभ्यंगपरिकर। माथा वळिला जटाभार। वल्कलांबर परिधान॥ रुधिर शोषिलें समस्त। मांस आटिलें जेथीचे तेथ। चर्म झालें अस्थिगत। श्रीरघुनंदन वियोगें॥" भावार्थ रामायण, युद्धकाण्ड अ. ६७॥

मीराबाईने आपल्या अनेक पदात विरहावस्थेचे वर्णन केले आहे. त्यापैकी काही ओळी पुढे देत आहे.

(१) सूली ऊपर सेज हमारी सोवण किस बिध होय।
गगन मँडलपर सेज पियाकी किस बिध मिलणा होय॥

(२) जो मैं ऐसी जाणती रे प्रीति कियाँ दुख होय।
नगर ढँढोरा फेरती रे प्रीति करो मत कोय॥

(३) कागा सब तन खाइयो चुन चुन खइयो माँस।
दो नैना मत खाइयो मोहें पिया दरस की आस॥

(४) आऊँ-आऊँ कर गया साँवरा, कर गया कौल अनेक।
गिणता-गिणता घस गई म्हारी आँगळिया री रेख॥

## ५.२ : भक्तिआचार्य स्मरण

### सूत्र त्र्याऐंशीवे

**इत्येवं वदन्ति जनजल्पनिर्भयाः एकमताः कुमारव्यासशुक-शाण्डिल्यगर्गविष्णुकौण्डिन्यशेषोद्धवारुणिबलिहनुमद्विभीषणादयो भक्त्याचार्याः ॥८३॥**

**सनत्कुमार, वेदव्यास, शुकदेव, शाण्डिल्य, गर्ग, विष्णु, कौण्डिन्य, शेष, उद्धव, आरुणि, बलि, हनुमान्, विभीषण आदि भक्तीचे आचार्य लोकांच्या निंदा स्तुतीची पर्वा न करता (भीति न बाळगता) एकमताने असेच सांगतात की भक्तीच सर्वश्रेष्ठ आहे.**

**विवरण :** प्रेमस्वरूप अनिर्वचनीय म्हणजे शब्दांनी सांगता येण्यासारखे नाही असे दुसऱ्या सूत्रात सांगितल्यानंतर पुढच्या ८० सूत्रांत नारदांनी ते सांगण्याचा प्रयत्न केला आहे. याचे कारण असे की ज्ञान तीन मार्गांनी होऊ शकते. (१) प्रत्यक्ष - अनुभव हा या प्रकाराचा पाया आहे. तथापि अनुभव

फसवे असू शकतात आणि त्यामुळे त्यांच्यावर आधारलेले ज्ञानही चुकीचे असू शकते. (२) अनुमान - यामध्ये ज्ञातावरून अज्ञाताचा तर्क केला जातो. आणि (३) आप्तवाक्य - ज्यांच्या सांगण्यावर आपला विश्वास आहे त्यांनी जे सांगितले असेल त्याचा सत्य म्हणून स्वीकार करणे. भौतिक आणि पारमार्थिक ज्ञानात या प्रकारामुळे भर पडत जाते. तथापि आप्तवाक्यही खोटे ठरावयाची शक्यता असते. म्हणून पारमार्थिक गोष्टीत तरी ज्याचा आपण आप्त म्हणून स्वीकार करतो तो निःस्वार्थी असला पाहिजे, ज्या बाबतीत तो सांगतो त्या विषयात तो तज्ञ असला पाहिजे, जे सांगतो त्याचा त्याला अनुभव असला पाहिजे आणि ज्यांना तो सांगतो त्यांच्याविषयी त्याच्या मनात हितबुद्धी असली पाहिजे. नारद स्वतः भक्ताशिरोमणि होते. भक्तीचा अनुभव शब्दांनी वर्णन करण्याचे कौशल्य त्यांच्याजवळ होते. भक्तीसंबंधी सांगताना इतर श्रेष्ठ भक्तांशी असलेले मतभेदही त्यांनी सांगितले आहेत. त्यांचे प्रस्तुत सूत्र आप्तवचनावर आधारलेले आहे. पहिल्या सूत्राला त्यांनी अथ या शब्दाने सुरुवात केली तर या सूत्राची इति या शब्दाने सुरुवात करून त्यांनी जे सांगितले आहे तेच अनेक भक्तिआचार्यांनी सांगितले आहे असे म्हणून त्यांपैकी काही आचार्यांची नांवेही त्यांनी दिली आहेत. जगामध्ये आणि विशेषतः भारतात हरिचरण कधीही न सोडणारे अनेक भक्त होऊन गेले आणि आजही आहेत. म्हणून नारदांनी कांहीं आचार्यांच्या नांवांचा उल्लेख करून सूत्रात आदि शब्दाची योजना करून ज्यांच्या नांवांचा उल्लेख केलेला नाही अशा श्रेष्ठ भक्तांचाही सूत्रात समावेश केला आहे. नुसते भक्त न म्हणता आचार्य म्हणण्याचे कारण असे की काही लोकांजवळ -विशेषतः पंडितांजवळ केवळ शब्दज्ञान असते, अनुभव नसतो. काहीना अनुभव असतो पण तो दुसऱ्यांना सांगण्याचे कौशल्य त्यांच्याजवळ नसते. अनुभव आहे, तो दुसऱ्यांना शब्दांच्या सहाय्याने सांगण्याचे कौशल्यही आहे आणि त्याचा उपयोग करून आपल्याला जे मिळाले ते इतरांनाही मिळावे अशी स्वार्थरहित हितबुद्धी असणारे संतच आचार्यपदाला योग्य असतात. अशा आचार्यांमुळे भक्तिपरंपरा निर्माण होते. त्यांना निश्चित ज्ञान झालेले असते, पण तरीही त्या पलीकडे ज्ञान असू शकते अशी त्यांची उदार वृत्ती असते. अशा काही आचार्यांनी नांवे देऊन नारदांनी म्हटले आहे की लोक काय म्हणतात याची त्यांना तमा नसते याचे कारण त्यांना झालेले ज्ञान निःसंशय असते. त्यांच्यामध्ये सर्व दैवी गुणांचा वास असतो त्यामुळे ते निर्भयच नव्हे तर अभय या गुणाने संपन्न असतात.

त्यांचे भगवंताशी तादात्म्य झालेले असल्यामुळे त्यांच्या मुखाने जणु भगवंतच बोलतो. ज्ञान एकच असले तरी ते सांगण्याच्या पद्धती निरनिराळ्या असू शकतात. येथे नारदांनी तेरा आचार्यांच्या नांवांचा उल्लेख करण्याचे कारण असे की नारदांनी सांगितलेले भक्तीचे तत्त्वज्ञान अभिनव नसून त्यांच्या पूर्वीही अनेक आचार्यांनी भक्तिशास्त्र सांगितलेले आहे. त्यांच्या ज्ञानाचा नारदांनाही सूत्रे रचताना उपयोग झाला आहे आणि म्हणून त्यांनी कृतज्ञतापूर्वक काही आचार्यांची नांवे देऊन संस्मरण केले आहे आणि आदि शब्दाची योजना करून इतरांचे ऋणही मान्य केले आहे. नारदांनी ज्यांची नांवे दिली आहेत त्या श्रेष्ठ भक्तांची येथे थोडक्यात ओळख करून घेऊ.

**(१) कुमार** : महाविष्णूंच्या आज्ञेने ब्रह्मदेवाने सृष्टिरचनेचा संकल्प केल्यावर प्रथम सनक, सनंदन, सनातन आणि सनत्कुमार हे चार कुमार प्रकट झाले. ब्रह्मदेवाने त्यांना सृष्टी निर्माण करण्याची आज्ञा केली. पण ते शुद्ध सत्त्वगुणी असल्यामुळे त्यांची अशा प्रकारच्या कार्याची प्रवृत्ती नव्हती. भगवंताखेरीज दुसरा विषय त्यांच्या चित्तात नव्हता. त्यांच्या मुखात सर्वकाळ 'हरिःशरणम्' हा मंत्र होता. त्यांच्यावर काळाचा प्रभाव होत नाही. त्यामुळे पाच वर्षांच्या मुलांच्या अवस्थेत त्यांचा स्वेच्छेने जगाच्या उद्धारासाठी संचार असतो. यांनीच ब्रह्मदेवाच्या दुसऱ्या मानसपुत्राला म्हणजे ही सूत्रे रचणाऱ्या नारदांना आत्मज्ञानाचा उपदेश केला. त्यामुळे नारदांनी पूर्वाचार्यांची नांवे देतांना प्रथम आपल्या गुरूंचे कृतज्ञतापूर्क स्मरण केले आहे.

**(२) व्यास** : व्यास शब्दाचा अर्थ विस्तार करणे. व्यास महाज्ञानी होते. नारदांपासून जशी कीर्तन परंपरा सुरू झाली तशी प्रवचन परंपरा व्यासांपासून सुरू झाली. म्हणून प्रवचनकार ज्या आसनावर बसतात त्याला व्यासपीठ म्हणतात. व्यासांनी वेदांचे वर्गीकरण केले, उपनिषदांचे संकलन करून ब्रह्मसूत्रांची रचना केली, जय नांवाचा इतिहास (महाभारत)लिहिला. पण इतके प्रचंड कार्य-करूनही त्यांच्या मनाला समाधान नव्हते. नारदांनी त्यांना भगवद्गुण वर्णन केल्यावर समाधान लाभेल म्हणून सांगितल्यावर त्यांनी भागवत पुराणाची रचना केली आणि त्यांना समाधानाचा लाभ झाला. भक्तांमध्ये मान्यता असलेल्या भागवंत ग्रंथाची रचना करणारे व्यासही श्रेष्ठ भक्तिआचार्य होते. नारदांनी आपल्या या शिष्याचा गुरूंच्या नंतर उल्लेख केला आहे.

**(३) शुक** : हे व्यासांचे पुत्र जन्मतःच वैराग्यवान होते. जन्मानंतर बालपणीच ते वनात निघून गेले. पुत्रमोहाने व्याकूळ झालेल्या व्यासांनी त्यांना

परत घरी आणले आणि श्रीमद्भागवत सांगून भक्तिप्रेमाची दीक्षा दिली. शुकांनाही नारदांप्रमाणे कीर्तन भक्ती प्रिय होती. परीक्षितीला सात दिवसात तुझा मृत्यू होईल असा ब्रह्मशाप झाला. त्यामुळे अन्नपाणी वर्ज्य करून तो गंगेच्या काठी बसलेला असताना शुकाचार्य तेथे गेले. त्यांनी परीक्षितीला सात दिवस भागवत ऐकविले आणि त्यामुळे त्याचा उद्धार झाला.

**(४) शाण्डिल्य** : १८ व्या सूत्रात नारदांनी यांचा उल्लेख केलेला आहे. शाण्डिल्यांनी रचलेली भक्तिसूत्रे प्रसिद्ध आहेत. हे रघुवंशातील राजा दिलीपाचे पुरोहित होते.

**(५) गर्ग** : 'कथादिष्विति गर्गः' असे भक्तीसंबंधीचे यांचे मत नारदांनी १७ व्या सूत्रात सांगितले आहे. हे शिवोपासक होते. त्यांचा 'गर्ग सिद्धान्त' हा ज्योतिषशास्त्रावरील ग्रंथ प्रसिद्ध आहे. यांचा दुसरा प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे 'गर्गसंहिता'. गर्गांनीही भक्तिसूत्रांची रचना केली होती पण ती आता उपलब्ध नाहीत. श्रीकृष्णाचा नामकरण विधी गर्गमुनींच्या उपस्थितीत झाला. बृहदारण्यकातील ब्रह्मवादिनी वाचक्नवी गार्गी यांची कन्या होती.

**(६) विष्णु** : भक्तपरंपरेत यांच्याविषयी माहिती मिळत नाही.

**(७) कौंडिन्य** : हे कुण्डिन कुलातील मोठे ब्रह्मर्षि होते. धर्मराजाने अश्वमेध यज्ञ केला तेव्हा त्या यज्ञात ते अध्वर्यु होते. हे शाण्डिल्य ऋषींचे पुत्र व शिष्य असल्याचा बृहदारण्यकात उल्लेख आहे. यांची भक्ती 'तन्मयासक्ति' या प्रकारची होती.

**(८) शेष** : कश्यप ऋषींना कद्रूपासून झालेल्या या नागाचे पाताळात वास्तव्य असते. क्षीरसागरात महाविष्णु याच्यावर शयन करतात. हा रात्रंदिवस आपल्या सहस्र मुखांनी भगवंताचे गुणगान करण्यात मग्न आहे. हाच रामावतारातील लक्ष्मण व कृष्णावतारातील संकर्षण होय. पतञ्जलीनांही शेषाचा अवतार मानतात. काहीजण रामानुज हेही शेषावतार मानतात.

**(९) उद्धव** : यादव कुळातील देवभागाचा हा मुलगा. श्रेष्ठ भगवद्भक्त उद्धव हा श्रीकृष्णाचा अंतरंग सखा होता. कृष्णांनी याला धर्म, योग, ज्ञान व भक्ती यांचा उपदेश केला. त्याचा ज्ञानगर्व नाहीसा करण्यासाठी श्रीकृष्णांनी त्याला गोकुळात गोपींकडे पाठविले होते. गोपींचे श्रीकृष्णावरील भक्तिप्रेम पाहून त्याचा ज्ञानाचा गर्व नाहीसा झाला व तो ज्ञानी भक्त बनला. भक्तांची प्रशंसा करताना भगवान श्रीकृष्ण त्याला म्हणाले की तुझ्यासारखे प्रेमी भक्त मला जितके प्रिय आहेत तितके माझा पुत्र ब्रह्मदेव, आत्मा शंकर, बलराम, लक्ष्मी

इतकेच काय पण माझा आत्माही प्रिय नाही. "न तथा मे प्रियतम आत्मयोनिर्न शंकरः। न च संकर्षणो न श्रीर्नैवात्मा च यथा भवान्॥" भागवत ११.१४.१५॥

**(१०) आरुणि :** छान्दोग्य उपनिषदात याचा उल्लेख आहे, तसाच बृहदारण्यकातही आहे. यामध्ये त्याचे नांव उद्दालक आरुणि असे दिलेले आहे. द्वैताद्वैत भक्ति संप्रदायात निम्बार्काचार्य हे आरुणीचे अवतार मानले जातात.

**(११) बलि :** भक्तश्रेष्ठ प्रल्हादाचा पुत्र विरोचन याचा हा मुलगा. हा महाभक्त आणि महाप्रतापी होता. याने स्वर्गावर स्वारी केली तेव्हा युद्ध न करताच देव परागंदा झाले. इंद्र होता यावे म्हणून त्याचे गुरु शुक्राचार्य यांनी त्याला शंभर अश्वमेध यज्ञ करावयास सांगितले तेव्हा अदितीच्या विनंतीवरून श्रीविष्णूंनी वामन रूपाने तिच्या उदरी जन्म घेतला व महादानी बलीकडून तीन पावले भूमी मागून त्याला पाताळात धाडल्याची कथा प्रसिद्ध आहे. तो भगवंतास पूर्ण शरण होता म्हणून त्याला पाताळलोकाचे राज्य देऊन भगवान स्वतः त्याचे द्वारपाल झाले!

**(१२) हनूमान :** 'रामदासी अग्रगण्यू' हनूमान हे दास्यभक्तीचे आदर्श उदाहरण आहे. म्हणूनच तुकाराम महाराजांनी "शरण शरण जी हनुमंता। तुज आलों रामदूता ॥१॥ काय भक्तीच्या त्या वाटा। मज दावाव्या सुभटा ॥२॥ शूर आणि धीर। स्वामिकाजी तूं सादर ॥३॥ तुका म्हणे रुद्रा। अंजनीचिया कुमरा ॥४॥" अशी त्याची स्तुती केली आहे.

**(१३) विभीषण :** रावणाच्या ह्या भावाने उग्र तप करून ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेतले व माझी बुद्धि सदैव सद्धर्मरत राहावी असा वर मागून घेतला. हा परम रामभक्त होता. रामाला शरण गेल्यावर रामाने त्याला लंकेचे राज्य दिले. बलि, व्यास व हनूमानाप्रमाणे हाही चिरंजीव आहे. ह्या सर्व भक्तांचे भक्तीच श्रेष्ठ याबाबतीत एकमत आहे.

या सर्व श्रेष्ठ भक्तांखेरीज जे असंख्य श्रेष्ठ भक्त झाले त्यांचे पुण्यस्मरण करून आपण शेवटच्या सूत्राचा विचार करू.

## ५.३ : भक्ति साधकांना नारदांचे आश्वासन

### सूत्र चौऱ्यांशीवे

**य इदं नारदप्रोक्तं शिवानुशासनं विश्वसिति श्रद्धते,**
**स भक्तिमान् भवति, सः प्रेष्ठं लभते सः प्रेष्ठं लभत इति ॥८४॥**

**इति= अशा प्रकारे (ग्रंथाच्या शेवटाचा निदर्शक म्हणून सूत्राच्या शेवटी इति म्हटले आहे) यः= जो. इदं= हें. नारदप्रोक्तं= नारदांनी**

**निश्चितपणे - ठामपणाने सांगितलेले. शिव अनुशासनं= मंगलदायक शिकवण. (शिवापासून आलेले.) विश्वसिति= विश्वास ठेवतो. श्रद्धते= श्रद्धापूर्वक आचरण करतो. सः= तो. प्रेष्ठम्= भगवंताचा प्रियतम (भगवंताच्या प्रेमाचा) लभते= लाभ होतो. सः= तो भक्तिमान= भगवंताच्या प्रेमाने पूर्ण. भवति= होतो. सः= तो. प्रेष्ठम्= प्रियतम भगवंताचा. लभते= लाभ होतो.**

**अशा प्रकारे जो कोणी शंकरापासून आलेली, नारदांनी सांगितलेली ही मंगलकारी शिकवण विश्वास ठेवून श्रद्धायुक्त अंतःकरणाने आचरणात आणतो तो भगवंताचा प्रियतम होतो आणि जीवनातील सर्वश्रेष्ठ भक्तीचा त्याला लाभ होतो.**

**विवरण** : हे शेवटचे सूत्र उपसंहारात्मक आहे. नारदांनी सांगितलेल्या भक्तीच्या शिकवणीचे सार या सूत्रात आहे. ग्रंथ विषयाचा अधिकारी, ग्रंथाचा विषय, संबंध आणि प्रयोजन किंवा फल या चारही गोष्टींचा या सूत्रात समावेश आहे.

यः म्हणजे जो ह्या संबंधी सर्वनामाला सूत्रात कोणतेही विशेषण दिलेले नाही. म्हणून अधिकाराच्या दृष्टीने पहाता जो कोणी भक्ती करतो त्याला त्याचे फल मिळते हे सूचित केले आहे. भक्ती करण्यासाठी धर्म, जात, लिंग, वय, शिक्षण, संपत्ती, देश इत्यादींपैकी कोणतीही अट नाही. भक्ती कशी करावी हे नारदांनी येथपर्यंत सांगितले. ही भक्ती मानवाचे कल्याण करणारी आहे. आत्तापर्यंत अनेक भक्तांनी ज्या मार्गाने जाऊन समाधानाचा शांतीचा अनुभव घेतला त्या मार्गाने जाणाऱ्या कोणालाही तो अनुभव येईल. माण्डूक्योपनिषदात तुरीय अवस्थेचे वर्णन करताना आत्म्याचे शान्तं शिवमद्वैतं असे वर्णन केलेले आहे. 'शिवानुशासनं'चा शंकरापासून जिची शिकवण मिळाली अशी भक्ती असा अर्थ करता येईल. सर्व ज्ञानाचा आणि भक्तीचा उगम शंकरापासून झालेला आहे. भगवान शंकर वैष्णवांमध्ये सर्वश्रेष्ठ मानले जातात ("वैष्णवानां यथाशम्भुः।"). भगवान विष्णूंच्या पायांपासून निघालेली जान्हवी त्यांनी भक्तिभावाने आपल्या मस्तकावर धारण केली. ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायांत भगवंत म्हणतात, "तरि श्रद्धावस्तूसि आदरु। करिता जाणिजे प्रकारु। जरी होय श्रीगुरु। सदाशिवु ॥२१६॥" शिव म्हणजे मंगल, म्हणून शिवानुशासनं म्हणजे मंगलदायी - कल्याणकारी शिकवण असाही अर्थ घेता येतो

नारदांनी सांगितलेली ही भक्तीसूत्रे ज्यांच्या जीवनात उतरतील त्यांना निश्चितपणे परमात्म्याचा लाभ होईल. नारदांनी स्वतः या भक्तिप्रेमाचा अनुभव घेऊन मग जगाचे कल्याण व्हावे अशा हेतूने भक्ती कशी करावी ते सांगितले आहे. याप्रमाणे जो आचरण करेल त्याला भगवद्दर्शन होईल अशी नारदांची प्रतिज्ञा आहे. म्हणून त्यांनी या सूत्रांमध्ये केलेल्या उपदेशावर विश्वास ठेवून श्रद्धायुक्त अंतःकरणाने त्याचे आचरण केले पाहिजे. विश्वासामध्ये बुद्धीला महत्त्व असते. एखादी गोष्ट बुद्धीला पटल्याखेरीज माणूस त्यावर विश्वास ठेवत नाही. विश्वास म्हणजे भरंवसा. आज ज्या गोष्टीबद्दल किंवा माणसाबद्दल विश्वास वाटतो त्याच्याबद्दल कारणाने अविश्वास निर्माण होणे शक्य असते. श्रद्धा हा अंतःकरणाचा धर्म आहे. श्रत् हे सत्चे वैदिक रूप आहे. त्याची धारणा, सत्याची धारणा म्हणजे श्रद्धा. श्रद्धेच्या उलट संशय होय. सुरुवातीला भगवंताच्या अस्तित्वाबद्दल माणसाला विश्वास असला तरी सत्संगाने, सद्ग्रंथांच्या वाचनाने त्याचे श्रद्धेमध्ये रूपांतर होते. एकदा गुरूंवर किंवा भगवंतावर श्रद्धा बसली की ती माणसाचे मन व्यापते आणि श्रद्धेनुसार आचरण व्हावयाला लागते. ''यो यः श्रद्धः स एव सः'' असे भगवद्गीता सांगते. विचारांना विशिष्ट दिशा दिली की ज्याच्याविषयी आपण विचार करतो त्याच्यापर्यंत ते पोचतात. मनात भगवंताबद्दलचे विचार एकसारखे येऊ लागले की ते भगवंतापर्यंत पोचतात. म्हणून भगवंतावर विश्वास ठेवला की माणूस शांत होतो. आणि श्रद्धा निर्माण झाली की त्याचे मन स्थिर होते. काहीही संकट आले तरी भगवंताच्या इच्छेने जे घडेल ते माझ्या हिताचेच असेल अशी त्याची श्रद्धा असते. अशी अढळ श्रद्धा असणाऱ्या भक्ताला त्याच्या प्रियतमाचा, भगवंताचा लाभ होईल आणि असा भक्त भगवंतालाही प्रिय होईल. मी कर्ता नाही, भगवंत कर्ता आहे अशी भक्ताची श्रद्धा असल्यामुळे भगवंताचा लाभ त्याच्या कृपेमुळेच झाला हे तो जाणून राहील; आणि म्हणून तो भगवंताविषयी कृतज्ञ राहील.

नारदांनी सांगितलेल्या या भक्तिप्रेमाचा लाभ होण्यासाठी सुरुवात कशी करावयाची आणि या मार्गातील प्रगती कशी होत जाते ते समारोप म्हणून आता थोडक्यात पाहू.

(१) प्रथम 'मला भगवंता हवा' हे बीज मनात रुजले पाहिजे. यासाठी श्रवण कीर्तन, नामस्मरण, सत्संग, सगुणपूजा, तीर्थयात्रा इत्यादी गोष्टी करताना, मी हे का करतो आहे याचा म्हणजे ध्येयाचा विसर पडता कामा नये. ध्येय निश्चित झाले म्हणजे ते कसे प्राप्त करावयाचे याचा साधक विचार करू लागतो.

(२) बीज रुजून अंकुर आला व रोप वाढू लागले, साधनात वाढ होऊ लागली की साधनाला विरोधी असणाऱ्या गोष्टी टाळल्या पाहिजेत. भक्ती ही जीवननिष्ठा बनली पाहिजे. श्रीमहाराजांनी एक गोष्ट सांगितली आहे. एका बाईने परसामध्ये तुळशीचे रोप लावले. रोज ती त्याला पाणी घालत असे पण खत म्हणून चुलीतली गरम राख घालत असे. त्यामुळे काही दिवसात ते रोप मेले! तसे लोक रोज नामस्मरण करतात पण मनात गरम राखेसारखे विकार बाळगतात. त्यामुळे त्यांची आध्यात्मिक प्रगती होत नाही. म्हणून साधकाने विकार आवरणे आवश्यक आहे.

(३) परमार्थात तळमळीला महत्त्व आहे. भगवंत हवा म्हणून जरी भक्तीला सुरुवात झाली तरी भगवंताविषयी इतके प्रेम वाटले पाहिजे की त्याच्याशिवाय जगणे अशक्य झाले पाहिजे. जीवनात भगवंत इतका शिरला पाहिजे की त्याच्याशिवाय मी नाहीच असे वाटले पाहिजे आणि त्यासाठी त्याचे अखंड नामस्मरण केले पाहिजे. ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, "गांवा गेलिया वल्लभु। पतिव्रतेचा विरहक्षोभु। भलतेसणी हानिलाभु। न मनीं जेवीं ॥७९॥ तेवीं सत्स्वरूप रूचलेपणें। बुद्धी जें ऐसें अनन्य होणें। ते सत्त्वशुद्धी म्हणे। केशिहंता॥" ज्ञानेश्वरी अ.१६.८०॥ तळमळीतूनच अनन्यता येते.

(४) अनन्यता आली की आपला सर्व आचार भगवंताला अर्पण केला पाहिजे. मी जे जे करेन ते ते त्याच्या साक्षित्वाने करेन. त्याचे विस्मरण झाले तर मी जगू शकणार नाही अशी परम व्याकुळता ही याच्या पुढची पायरी आहे.

(५) 'तत् सुख सुखित्वम्.' भगवंताचे सुख तेच माझे सुख असे वाटू लागले पाहिजे. हृदयात भगवंत साठवणे ही याची प्रक्रिया आहे. तुकाराम महाराज सांगतात, "सांठविला हरी। जींहीं हृदयमंदिरीं ॥१॥ त्यांची सरली वेरझार। झाला सफळ व्यापार ॥२॥ हरी आला हातां। मग कैंची भय चिंता ॥३॥ तुका म्हणे हरी। कांहीं उरों नेदी उरी" ॥४॥ हृदयात हरी साठला की कामक्रोधादि विकार त्या शरीरात राहूच शकत नाहीत. "तुका म्हणे देह भरिला विठ्ठलें। कामक्रोधें केलें घर रितें॥" गोपींच्या विषयी वाटणाऱ्या प्रेमाचे कारण श्रीकृष्ण सांगतात की "निजांगमपि यो गोप्यो ममेति समुपासते। ताभ्यां परं न मे पार्थ निगूढ प्रेमभाजनम्॥" (त्या गोपी आपल्या शरीराचा सांभाळ ते माझे आहे या भावानेच करतात. त्यामुळे माझ्या प्रेमाला त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ असे दुसरे स्थानच नाही.) अशा प्रकारे भगवंत हृदयात भरला की भक्ताचे भगवंताशी तादात्म्य होते.

(६) भक्त आणि भगवंताचे अद्वैत झाल्यानंतर भक्त आणि भगवंत दोघांनाही परस्परांच्या प्रेमाची इतकी चटक निर्माण झालेली असते की मग भक्त "अद्वैतीं तों माझें नाहीं समाधान। गोड हे चरणसेवा तुझी ॥ १ ॥ करूनी उचित देईं हेंचि दान। आवडे कीर्तन नाम तुझें ॥ २ ॥ देवभक्तपण सुखाचा सोहळा। ठेवूनि निराळा दावीं मज ॥ ३ ॥" असे म्हणू लागतो. ज्ञानेश्वर महाराज सांगतात, "तैसी क्रिया कीर न साहे। तऱ्ही अद्वैतीं भक्ति आहे। हें अनुभवाचिजोगें, नव्हे। बोलाऐसें ॥अ. १८.११५१ ॥" म्हणून ही अनुभवाची गोष्ट ज्याला अनुभव नाही तो शब्दात कशी सांगणार?

भक्तीला पंचम पुरुषार्थ मानतात. षड्दर्शनांप्रमाणे भक्तीचा आणि विशेषत: या नारद भक्तिसूत्रांचा प्रेमदर्शन असा उल्लेख केलेला आढळतो.

येथे भक्तिसूत्रांचे विवरण संपले, म्हणून नारदांनी वर्णन केलेल्या मंगलमय भक्तिप्रेमाची प्राप्ती सर्वांना होवो अशी भगवंताच्या चरणांशी प्रार्थना करून लेखणीस विराम देतो.

॥ जानकीजीवन-स्मरण जय जय राम ॥

## श्रीनारद भक्तिसूत्रें - संदर्भ : ध्वनिफिती व ग्रंथ

पू. प्रा. के. वि. बेलसरे यांच्या नारद भक्तिसूत्रांवरील प्रवचनांच्या ध्वनिफिती. (Audio cassettes)

इ. सन. (१) १९७८ (२) १९८६ (३) १९८७ (४) १९८८ (५) १९८९ व (६) १९९०

**ग्रंथ**

(१) श्रीनारद-भक्तिसूत्रें. लेखक : चं. वा. दांडेकर. सारथी प्रकाशन पुणे ३०-१९८७

(२) नारद भक्तिसूत्र विवरण. लेखक : ह. भ. प. धुंडामहाराज देगलूरकर. प्रकाशक भानुदास देगलूरकर. धुंडामहाराज मठ. पंढरपूर. शके १९२०.

(३) नारद भक्ति-सूत्र रहस्य. लेखक : वि. चिं. केळकर. अध्यात्म परिषद सांगली. १९६७.

(४) प्रेमदर्शन-देवर्षि नारद रचित भक्तिसूत्र. लेखक : हनुमानप्रसाद पोद्दार गीताप्रेस, गोरखपूर. संवत् २०४१.

(५) नारद-भक्तिसूत्र. लेखक : स्वामी वेदान्तानन्द. रामकृष्ण मठ, नागपूर.

(६) नारदभक्तिदर्शन. लेखक : स्वामी अखण्डानन्द सरस्वती. प्रकाशक सत्साहित्य प्रकाशन ट्रस्ट. मुंबई ४०० ००६.

(७) Love Divine - Narada Bhakti Sutra - by Swami Chinmayananda. Chinmaya Publication Trust, Madras 600003.

(८) The Gospel of Divine Love or Narada Bhakti Sutras by Swami Tyagishananda, Shri Ramkrishna Math, Madras 600004.

या ग्रंथांखेरीज (१) श्रीमद् भागवत महापुराण (२) सार्थ श्रीएकनाथी भागवत (३) श्रीज्ञानेश्वरी (४) अमृतानुभव (५) सार्थ श्रीदासबोध (६) श्रीनामदेव गाथा (७) श्रीएकनाथ गाथा (८) श्रीसंत तुकाराम महाराजांची गाथा इत्यादी ग्रंथांचाही संदर्भासाठी उपयोग झाला.

याखेरीज लेखनात आलेल्या अन्य संदर्भ ग्रंथांचा त्या त्या ठिकाणी उल्लेख केला आहे.

* * *

# परिशिष्ट पहिले
# श्री नारद-भक्तिसूत्रे क्रमपाठ

| क्र. | सूत्र | पृष्ठ |
|---|---|---|
| १ | अथातो भक्तिं व्याख्यास्यामः। | १८ |
| २ | सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा। | २० |
| ३ | अमृतस्वरूपा च। | २५ |
| ४ | यल्लब्ध्वा पुमान् सिद्धो भवति, अमृतो भवति, तृप्तो भवति। | २६ |
| ५ | यत्प्राप्य न किञ्चिद्वाञ्छति न शोचति न द्वेष्टि न रमते नोत्साही भवति। | ३२ |
| ६ | यज्ज्ञात्वा मत्तो भवति, स्तब्धो भवति, आत्मारामो भवति। | ३७ |
| ७ | सा न कामायमाना निरोधरूपत्वात्। | ४१ |
| ८ | निरोधस्तु लोकवेदव्यापारन्यासः। | ४४ |
| ९ | तस्मिन्ननन्यता तद्विरोधिषूदासीनता च। | ४७ |
| १० | अन्याश्रयाणां त्यागोऽनन्यता। | ४९ |
| ११ | लोके वेदेषु तदनुकूलाचरणं तद्विरोधिषूदासीनता। | ५२ |
| १२ | भवतु निश्चयदार्ढ्यादूर्ध्वं शास्त्ररक्षणम्। | ५४ |
| १३ | अन्यथा पातित्याशङ्कया। | ५४ |
| १४ | लोकोऽपि तावदेव किन्तु भोजनादिव्यापारस्त्वाशरीरधारणावधि। | ५७ |
| १५ | तल्लक्षणानि वाच्यन्ते नानामतभेदात्। | ५९ |
| १६ | पूजादिष्वनुराग इति पाराशर्यः। | ६० |
| १७ | कथादिष्विति गर्गः। | ६९ |
| १८ | आत्मरत्यविरोधेनेति शाण्डिल्यः। | ७१ |
| १९ | नारदस्तु तदर्पिताखिलाचारता, तद्विस्मरणे परमव्याकुलतेति। | ७३ |
| २० | अस्त्येवमेवम्। | ७६ |
| २१ | यथा व्रजगोपिकानाम्। | ७७ |
| २२ | तत्रापि न माहात्म्यज्ञानविस्मृत्यपवादः। | ८१ |
| २३ | तद्विहीनं जाराणामिव। | ८२ |
| २४ | नास्त्येव तस्मिंस्तत्सुखसुखित्वम्। | ८२ |
| २५ | सा तु कर्मज्ञानयोगेभ्योऽप्यधिकतरा। | ८६ |
| २६ | फलरूपत्वात्। | ९३ |
| २७ | ईश्वरस्याप्यभिमानद्वेषित्वाद् दैन्यप्रियत्वाच्च। | ९५ |
| २८ | तस्या ज्ञानमेव साधनमित्येके। | ९९ |

# परिशिष्ट दुसरे
## भक्तिसूत्रांची वर्णानुक्रमानुसार सूचि

'ग'



'त'



'द'



'न'

'ल'



'स'



'व'



'श'